# कान्ता

ग. त्र्यं. माडखोलकर

किंमत पांच रुपये

## चार शब्द

ही माझी चवथी कादंबरी.

कादंबरीला प्रस्तावना लिहिण्याची माझी पद्धत नाहीं. पण कांहीं आवश्यक गोष्टींचा खुलासा करण्यासाठीं मी हे चार शब्द लिहित आहें.

प्रकाशकांनीं जाहीर केल्याप्रमाणें ही कादंबरी ता. १५ फेब्रुवारीलाच खरोखरी प्रसिद्ध व्हावयास हवी होती. पण माझ्या अनेक खाजगी अडचणींमुळें तिचें प्रकाशन लांबणीवर पडलें, याबद्दल खेद वाटतो.

माझे स्नेही, कोल्हापूरचे प्रकाशक, श्री. दत्तोपंत मोघे यांना ही कादंबरी मी प्रथम दिली होती पण पुढें अनेक कारणांमुळें मला ती नागपूरला प्रसिद्ध करणें इष्ट वाटलें; व तशी परवानगी मला तत्परतेनें दिल्याबद्दल श्री. मोघे यांचा मी फार आभारी आहें.

या कादंबरींत कांहीं प्रसिद्ध व्यक्ति आणि संस्था यांचीं नांवें आलीं आहेत. पण त्याचा अर्थ असा मात्र नव्हे कीं, या कादंबरींतील पात्रें वस्तुसृष्टींतील आहेत. कादंबरीचें कथानक जसें कल्पित आहे तशाच त्यांतील व्यक्ति आणि घटना याहि सान्या कल्पित आहेत.

ज्या व्यक्तीच्या प्रेममूलक आग्रहामुळें आठ वर्षांपूर्वीं मी कादंबरी लेखनाला प्रारंभ केला, तिलाच ही कादंबरी मी अर्पण करीत आहें. कथालेखन हा साहित्याचा एकच प्रकार असा होता कीं, ज्यांत आम्हांला आमच्या जीवनाचा पुनःप्रत्यय अनुभवण्याची शक्यता होती; व गेल्या चौदा वर्षांत जे अनेक प्रसंग आमच्या अनुभवांत किंवा अवलोकनांत आले, त्याचें प्रत्यक्षाप्रत्यक्ष प्रतिबिंब माझ्या कादंबऱ्यांतून पडलें आहे. लहान मुलांना आरशासमोर बसवून एकमेकांचीं प्रतिबिंबें पहातांना ज्या प्रकारची मौज वाटते, तशाच प्रकारचा आनंद या कादंबऱ्या लिहिल्या जात असतांना आम्हीं दोघांनीं अनुभवलेला आहे. आणि हाच मी कादंबरी-लेखनापासून मला झालेला सर्वांत महत्त्वाचा लाभ समजतों.

शांता निवास, मॉडेल मिल रोड<br>
नागपूर शहर, २०-२-३९

ग. त्र्यं. माडखोलकर

## पुढील प्रकाशनें

१ स्वप्नांतरिता

ग. त्र्यं. माडखोलकर

२ वटपत्रें

वि. स. खांडेकर

३ तरुण भारताचा बुद्धियोग

ग. त्र्यं. माडखोलकर

४ गुजाताई

ना. धों. ताम्हनकर

# १

# बाप आणि मुलगा

त्यांनीं तें नांव वाचलें आणि ते एकदम दचकले.

**— जयंत कृष्ण चितळे —**

तें नांव वाचून यादवरावांना आपल्या डेक्कन कॉलेजांतील मित्राची आठवण झाली. कृष्णा चितळे ! १८९७ सालच्या जुलैंत टिळकांना ज्या वेळीं पकडण्यांत आलें, त्या वेळीं संतापानें बेफाम झालेला कृष्णा इंग्रजी राज्य उलथून पाडण्याच्या गोष्टी किती आवेशानें बोलत होता आपल्याजवळ ! त्यानंतर १९०८ सालीं टिळकांच्या पाठोपाठ त्याला अटक झाली; व पुढें दोन वर्षांनीं तुरुंगांतून सुटून आल्यावर तो क्षय होऊन वारला.—तेव्हांपासून गेल्या वीस वर्षांत त्याचें नांव कानांवर आलें नव्हतें आपल्या !—त्याच्या आणि आपल्या आयुष्यक्रमांत किती फरक ! १९०८ सालच्या धामधुमीपासूनच आपली बढती व्हावयास सुरवात झाली; व आज आपण डी. एस. पी. होऊन बसलों आहोंत. पण तो तुरुंगांत गेल्यावर त्याचें वर्तमानपत्र बुडालें, वारल्यावर त्याचीं बायकामुलें बेपत्ता झालीं. आणि आज वीस वर्षांनीं अगदीं अचानक या गुप्त रिपोर्टांत त्याचें नांव !

होय.—त्याचाच, कृष्णा चितळेचाच मुलगा असला पाहिजे हा !

आणि त्याचें या रिपोर्टांत दिलेलें वयसुद्धां अगदीं आपल्या जयसिंगाएवढेंच आहे.

त्यांनीं पुन्हां हातांतले कागद वाचावयाला सुरवात केली.

त्यांचे डोळे आकुंचित झाले; उंच कपाळाला टकलापर्यंत आठ्या पडत गेल्या; व ओठांना झांकणाऱ्या झुपकेदार मिशांचीं उजवीकडील टोंकें दांतांखालीं दबलीं गेलीं.

पण ते कागद वाचून पुरे होण्यापूर्वींच त्यांच्या कानांवर मोटारीचा परिचित मृदु मर्मर आवाज आला.

आणि चपराश्यानें त्यांच्या खोलीचें बिलोरी अर्धद्वार हळूच उघडून त्यांना अदबीनें सलाम करीत म्हटलें, " ताईसाब मोटार ले कर आई है—"

" अच्छा ! उनको इधर भेज देव— "

पण त्यांच्या तोंडून हे शब्द बाहेर पडून तो चपराशी परततो न परततो तोंच दार जोरानें ढकललें जाऊन ' ताईसाहेब ' गडबडीनें आंत आल्या.

तिला पाहतांच त्यांच्या चर्येवरील विषादाची झांक पार मावळली; व तोंडांतील चिरूट काढून त्यावर सांचलेली राख झटकीत ते हंसत हंसत म्हणाले—

" कसली धांदल आहे एवढी आज, विजू ? हें ऑफिस आहे. घर नव्हे. टेनिस खेळतां खेळतां तशीच आलेली दिसतेस तूं—"

त्यांनीं कौतुकानें तिच्या कमनीय आकृतीकडे पाहिलें.

त्यांचें तें कौतुक अगदीं स्वाभाविक होतें. टेनिस खेळण्यासाठीं नेसलेला पायजमा, पेहरलेला हाफशर्टवजा फ्रॉक आणि घातलेले हातमोजे—त्या पोषाखांतच ती आली होती त्यांना भेटायला. तिच्या अंगावर कोणतेंच आभरण, कसलाहि अलंकार म्हणून नव्हता. कपाळाला कुंकू नव्हतें, हातांत बांगड्या नव्हत्या किंवा गळ्यांतहि कांहीं नव्हतें; व खालीं जंघांपर्यंत जाऊन भिडलेलें जें वेणीबंधन तिच्या पाठीवर रुळत होतें, त्याची गुंफण सुद्धां इतकी सैल होती कीं, त्यांतून निसटलेल्या स्नेहशून्य, पिंगट कुरळ्या केसांनीं तिच्या कपाळावर आणि गालांवर झेंप घेतली होती. नाहीं म्हणावयाला, आपल्या उन्नत वक्षःस्थलावर मात्र, आकारांच्या बाबतींत उरोजांशीं स्पर्धा करणारें, गुलाबाचें टपोरें फूल तिनें खोंवलें होतें.

यादवराव सारखे तिच्याकडे बघत होते. तिच्या फ्रॉकवरील तो श्वासोच्छ्वासागणिक वरखालीं होणारा गुलाब, त्याला आपल्या कांतीनें लाजविणाऱ्या तिच्या

रेखीव जिवणीभोंवतीं उमललेलें निर्भर हास्य, खोलींतील प्रत्येक वस्तूवर दृष्टिक्षेप करीत असलेल्या तिच्या चंचल नेत्रांतील स्फटिकाची लकाकी किंवा त्या मर्दानी पोषाखामुळें खुलून दिसणारी तिच्या सडपातळ बांध्याची मोहक सुस्पष्टता,— यांपैकीं कोणत्या गोष्टीनें त्यांना मुग्ध केलें होतें कोण जाणें !

"–हो. खेळतां खेळतां मला आठवण केली जयानं, म्हणून तशीच निघालें मी. आज कीं नाहीं आम्हांला तुम्ही गाडी दिली पाहिजे आपली. जया, चारु उमा आणि मी अशीं चौघं स्टार्की पॉइंटवर फिरायला जाणार आहोंत न् तिथून सिनेमाला जायचा बेत आहे आमचा––"

बोलतां बोलतां तिनें आपल्या हातावर रेललेला ससा त्यांच्या टेबलावर सोडला. तो टुणदिशीं उडी मारून त्यांच्या जवळ गेला; व झाडाच्या बुंध्याला घासावें त्याप्रमाणें त्यांच्या रांठ, केंसाळ मनगटाला त्यानें आपलें तोंड घासावयाला सुरवात केली.

त्याला कुरवाळीत यादवराव विजयेला म्हणाले, "गाडी द्यायला हरकत नाहीं. पण मला रात्रीं साडे आठ वाजतां सरसाहेबांकडे जेवायला जायचंय आज––"

"एवढंच ना ! आम्ही तर साडे सहालाच परत करूं गाडी तुमची तुम्हांला. मग चलायचं ना घरीं आतां ?–"

"म्हणजे ? आतां घरीं गेल्या क्षणापासून गाडी हवी आहे तुम्हांला ?"

"हो. नाहीं तर स्टार्की पॉइंटवर फिरायला जाऊन पहिला शो कसा साधतां येईल आम्हांला ?"

"मी मुळीं तुम्हांला आतां एक स्वतंत्रच गाडी घेऊन देणार आहें, विजू !"

"हो !–एक दिवस गाडी मागितली, तर लगेच स्वतंत्र गाडी घेऊन देण्याच्या गोष्टी काढल्यात ! पण, साहेब, उठा ना आतां–"

तिनें त्यांच्या अगदीं जवळ जाऊन त्यांच्या खांद्यावर हात ठेवला. त्याबरोबर त्यांनीं टेबलाचा खण उघडून त्याच्या चोरकप्यांत ते कागद ठेवले; व त्याला कुलूप लावून चपराशाला हांक मारली, आणि त्याला खोली बंद करावयाला सांगून ते तिच्यासह बाहेर पडले.

" आज कांहीं तरी विशेष कार्यक्रम दिसतोय तुमचा, विजू ?"

" हो. आज कीं नाहीं चारूचा वाढदिवस असल्यामुळें तो आम्हांला पार्टी देणार आहे स्टार्की पॉइंटवर छोटीशी–"

हें त्यांना सांगत असतांनाच तिनें मोटारीचें दार उघडलें.

पण आंत जाऊन न बसतां ते एकदम तिच्याकडे वळून उद्गारले, " विजू, माझी एक गोष्ट ऐकशील ? तुम्ही त्या बंगाल्याशीं इतका स्नेहसंबंध ठेवलेला आवडत नाहीं मला–"

" तुमचं आपलं कांहीं तरीच साहेब ! काय करणार आहे हो तो बंगाली आम्हांला ?"

" जयाला मी तुझ्या समक्ष सांगितलं होतं ना त्याचा थोरला भाऊ काकोरी कटाच्या खटल्यांत पकडला गेला होता म्हणून ?–"

" पण तो सुटला ना लगेच ?"

" सुटला म्हणून काय झालं ? कटांत सामील असल्याचा वहीम त्याच्यावर यावा हें काय चांगलं लक्षण आहे वाटतं ?"

" तुमचा कीं नाहीं भारीच संशयखोर स्वभाव ! चारूच्या भावावर कटांत सामील झाल्याचा आळ आला असला, म्हणून तो कसा हो वाईट ठरतो ?— पण आंत बसा ना गडे तुम्ही आतां ! आम्हीं दोघं आतां इतकीं मोठी झालों, तरी सुद्धां आम्हांला स्वतंत्रपणानं वागूं द्यायला धीर नाहीं होत तुमचा—"

ती त्यांच्या शेजारीं बसून गाडी सुरू करतां करतां म्हणाली.

तिच्या त्या उद्गारांवर ते कांहीं बोलले नाहींत. त्यांना पुन्हा मघांशीं वा चलेल्या त्या रिपोर्टाची आठवण झाली; व कांहीं तरी अगदीं चमत्कारिक कल्पना मनांत येऊन त्यांच्या अंगावर शहारे आले. आणि गाडी चालविण्याच्या नादांत गर्क असलेल्या विजयेला ते म्हणाले—

" तूं कधीं गेली आहेस का ग त्या बंगाल्याच्या घरीं ?—"

" हें काय हो ? एकसारखं 'बंगाली' 'बंगाली' कां म्हणतां तुम्ही त्याला एखाद्या तिऱ्हाइताप्रमाणं ? चांगलं चारुचंद्र म्हणा ! आमचा दोघांचा मित्र म्हणजे स्वतःच्या मुलासारखाच नाहीं का तुम्हांला तो ?—"

तिनें एकदम त्यांच्याकडे वळून किंचित् रोषानें म्हटलें.

" बरं बरं ! पण तूं त्या चारुचंद्राच्या घरीं गेली होतीस का कधीं ? "

" हो ! किती तरी वेळां ! जया तर आतांशा मधून मधून राह्यला सुद्धां जातो अभ्यासासाठीं त्याच्याकडे !--त्याची आई माशांचे किती सुंदर पदार्थ करते साहेब ! "

ती हें सांगत आहे, तोंच गाडी त्यांच्या बंगल्याच्या आवारांत शिरली. चपराश्यानें लगेच पुढें येऊन गाडीचें दार उघडलें व तीं दोघें खालीं उतरलीं.

" तुम्हीं टेनिस कोर्टावर नाहीं येत चहा घ्यायला आमच्याबरोबर साहेब ? " विजयेनें त्यांना विचारलें.

" नाहीं. आज मी थकलों आहे फार बेटा ! तूं माझ्या खोलींतच चहा पाठवून दे मला--"

विजया धांवतच टेनिस कोर्टाकडे गेली.

ते तडक आपल्या खोलींत आले; व नोकराच्या साहाय्यानें कपडे बदलून खिडकीजवळ असलेल्या आरामखुर्चीवर जाऊन पडले. टेनिस कोर्टावरील हंसणें खिदळणें सारखें त्यांच्या कानांवर येत होतें. पण तो आवाज ऐकून आज त्यांच्या मनाला आल्हाद वाटला नाहीं. उलट मघांशीं वाचलेल्या त्या नांवाची आठवण होऊन त्यांच्या मनांत असा विचार आला कीं, कृष्णा चितळेचा मुलगा आपल्या बापाप्रमाणें ज्वलज्जहाल निपजला; पण आपला जयसिंग--तो मात्र आपल्यासारखा निपजण्याची आशा नाहीं. बाप आणि मुलगा यांच्या आयुष्याला आपल्या बाबतींत अशा रीतीनें वेगळ्या वाटा कां फुटाव्यात ? आपली इच्छा धुडकावून लावून स्वतःसाठीं वेगळा मार्ग काढण्याची धडपड आपल्या मुलानें कां करावी ?

गेल्या दहा वर्षांतील मनस्तापाचे अनेक प्रसंग त्यांच्या डोळ्यांपुढें उभे राहिले.--असहकारितेच्या चळवळीच्या वेळीं जयानें आपल्या इच्छेविरुद्ध शाळा सोडली. आपल्याला न कळवितां निरोधनामध्यें भाग घेतला; व त्याच्या या वर्तनाची कागाळी स्मिथसाहेबांच्या कानांपर्यंत जाऊन, आपला मुलगा; आपल्या आवाक्यांत नाहीं, असा उपमर्दकारक खुलासा करण्याची पाळी आपल्यावर आली.

साहेबाला भेटून परत आल्यावर त्या संतापाच्या भरांत आपण रक्ताच्या चिळकांड्या फुटेपर्यंत त्याला हंटरनें मारलें. त्याच्या आईच्या जिवाची तळमळ झाली. विजूनें रडून आकांत केला. पण त्याच्या तोंडांतून हुंदका निघाला नाहीं कीं डोळ्यांतून टिपूस पडलें नाहीं !—

त्यानंतर तो इंटर सायन्स झाल्यावर त्याला इंजिनिअरिंगचें शिक्षण घेण्याच्या निमित्तानें आपण इंग्लंडला पाठविण्याचें ठरविलें. पण तेंहि त्यानें ऐकलें नाहीं; व उलट सायन्सचा अभ्यासक्रम सोडून देऊन तो बी. ए. झाला.

त्याच्याविषयींच्या आपल्या साऱ्या आकांक्षांना त्याने विरोध केला आहे. आपण घराण्याच्या गेल्या दोन पिढ्यांनीं सरकारी नोकरींत मोठ्या रुबाबानें दिवस काढले. आपले वडील मेजर होऊन निवृत्त झाले; व आपण डी. एस. पी. च्या जागेपर्यंत चढलों. पण आपला हा एकुलता एक मुलगा !—हा जर उद्यां त्या बंगाल्याच्या नादानें कृष्णा चितळेच्या मुलाप्रमाणें—

पण, ती कल्पना मनांत येतांच जणुं कांहीं तिला आपलें मन व्यापण्याला या वेळीं अवकाश द्यावयाचा नाहीं अशा उद्देशानें, यादवरावांनीं एकदम जवळच्या मेजावरली घंटा दाबली—

त्याबरोबर चपराशी हुक्का घेऊन आंत आला.

" छोटा साबकू बुला देव ! "

ते त्याच्याकडे पाहून उद्गारले; व त्या चांदीच्या हुक्याची जरतारी फुलांनीं मढविलेली नळी तोंडांत घालून त्यांनीं धूम्रपानाला सुरवात केली.

पण, त्यांना कळेना, जयसिंगाला आपण कशासाठीं बोलावला व तो आल्यावर आपल्याला त्याच्याशीं काय बोलावयाचें आहे, तें !

तोंच जयसिंग आंत आला व समोर असलेल्या खुर्चीवर हात ठेऊन अदबीनें उभा राहिला.

ते तोंडांतली हुक्याची नळी काढून त्याच्याकडे न पाहतांच म्हणाले, " विजूनं किती घाई केली मघांशीं न् तुम्ही तर अजून निघालां नाहींत. मला माडी मिळाली पाहिजे साडे सहाला—"

" जरूर मिळेल ! —आतांच चहा घेऊन झाला आमचा; न् पांच मिनिटांत निघूं आम्ही. आपण चहा नाहीं घेतलेला दिसत अजून —"

" विजू विसरून गेली माझ्यासाठीं चहा पाठवण्याचं गडबडींत ! पण जया, तुमच्या कॉलेजांतलं वातावरण कसं काय आहे ?—"

" कां बरं ? "

" नाहीं.—बंगालमधल्या विद्यार्थीदिनाची धामधूम वाचलीस ना तूं पत्रिकेंत ? "

" हो. पण आमच्या कॉलेजांत तरी थंड आहे अगदीं. विद्यार्थी परीक्षांच्या मागं लागले आहेत आतां—"

" मला नाहीं वाटत गांधींचं कायदेभंगाचं खूळ इथल्या विद्यार्थ्यांत बोकाळेल असं !—"

" बरं, मी जाऊं आतां ? " त्यांच्या त्या प्रश्नार्थक विधानावर कांहींच न बोलतां जयसिंगनें विचारलें.

आपल्याशीं या विषयावर बोलण्याचें तो टाळीत तर नसेल ना ?—यादवरावांच्या मनांत झटकन् शंका येऊन गेली. पण लगेच ते उद्गारले—

" जातोस ? ठीक ! बरोबर साडे सहाला गाडी मिळाली पाहिजे हं मला—"

" हो, लक्षांत आहे माझ्या—"

आणि तो खोलींतून बाहेर पडला.

यादवरावांना स्वतःच्या वर्तनाबद्दल आश्चर्य वाटून राहिलें !—

—" त्या बंगाल्याशीं तूं कशाला इतका स्नेह ठेवला आहेस ?—"

—हा प्रश्न त्यांच्या अगदीं ओठापर्यंत येऊन ठेपला होता.

पण तो जयसिंगाला विचारण्याचा हिय्या मात्र त्यांना झाला नाहीं.

# २

# सर महादेव ठाकूर

सर महादेव ठाकूर यांच्याकडे दर शनिवारीं रात्रीं होणारा खाना हा नागपुरांतील बऱ्याच लोकांच्या स्पृहेचा आणि जिज्ञासेचा एक विषय होऊन बसला होता.

आणि त्याला कारणहि पण तसेंच होतें. मध्यप्रांत—वऱ्हाडच्या गव्हर्नर-पदाचा चार महिने उपभोग घेऊन त्यांनीं गृहमंत्र्याची जागा सोडल्याला अद्याप पुरतें वर्षसुद्धां झालें नव्हतें. ‘ सागर व्हिला ’ या नांवानें सर्व नागपुरांत प्रसिद्ध असलेला त्यांचा सिव्हिल लाइन्समधील भव्य बंगला हेंच गव्हर्नमेंट हाऊसच्या ऐवजीं गेलीं सात आठ वर्षें मध्यप्रांतीय राजकारणाचें केंद्र होऊन बसलें होतें. गोविंदपंत बुंदेल्यांच्या घराण्याशीं त्यांचा कांहीं नातेसंबंध खरोखरीच होता कीं नाहीं, कोण जाणे. पण, सागरी कऱ्हाड्यांच्या ठिकाणीं सामान्यतः आढळणारा आपल्या राजरक्ताचा अभिमान त्यांच्याहि ठिकाणीं उत्कटतेनें जागृत होता; व मध्यप्रांताचे गव्हर्नर सर मॉंटेग्यु बटलर यांनीं जेव्हां आपल्या कौन्सिलांतील भाषणामध्यें, त्यांच्या कारकीर्दीचा गौरव करण्याच्या भरांत, ‘ बुंदेलावंशाचा कुलदीपक ’ ( *Scion of the Bundela Family* ) या शब्दांनीं त्यांचा उल्लेख केला, तेव्हां आपल्या आयुष्याचें सार्थक झाल्यासारखें त्यांना वाटलें.

त्यांचे वडील ई. ए. सी. च्या जागेपर्यंत चढले होते. पण, वयाला चाळिशी उलटण्यापूर्वींच त्यांचा अंत झाल्यामुळें, सर महादेव यांना विद्यार्थी-दशेंत असतांनाच स्वतःच्या भवितव्याविषयीं विचार करण्याची संवय लागली.

त्यांनीं कायद्याच्या परीक्षेंत पहिला नंबर मिळविल्याचें कळतांच कमिशनरनें त्यांना मुद्दाम भेटीला बोलावून सरकारी नोकरींत येण्याचा आग्रह केला. पण, आपल्या वडिलांच्या मित्राचा हा कृपाप्रसाद साभार नाकारून, त्यांनीं सागरला वकिलीला सुरवात केली. आपल्या जन्मभूमीविषयीं त्यांना निरतिशय अभिमान होता. तथापि, सागरला राहून आपल्या बुद्धीचें तेज फांकणार नाहीं, याची त्यांना जाणीव होती. म्हणून, आपला धाकटा भाऊ शंकर याची कायद्याची परीक्षा उतरतांच, त्याला ई. ए. सी. ची जागा मिळवून देऊन ते स्वतः वकिली करण्यासाठीं नागपूरला आले. वकिलीच्या धंद्यांत यश यावयाला अवश्य असलेले, तेजस्वी मुद्रा, कुशाग्र बुद्धि आणि घणाघाती ( *hammering* ) वक्तृत्व हे तिन्हीं गुण त्यांच्या ठिकाणीं होते. त्यामुळें नागपुरास आल्यावर लवकरच त्यांची गणना वकिलांच्या पहिल्या श्रेणींत होऊं लागली.

पण वकिलींतील यशावर संतुष्ट होण्याचा सर महादेव यांचा स्वभाव नव्हता. आपल्या पूर्वजांनीं एका काळीं मध्यहिंदुस्थानांत प्रभुत्व गाजविल्याची त्यांना तीव्र जाणीव होती. ते केव्हां केव्हां हिंदी वळणावर गेलेल्या आपल्या अपभ्रष्ट, सानुनासिक मराठींत आवेशानें म्हणत असत, " पेशव्यांचे वंशज म्हणून पुण्याच्या चित्पावनांना जितका महाराष्ट्रावर सत्ता गाजविण्याचा हक्क आहे, तितकाच बुंदेल्यांचे वंशज म्हणून सागरच्या कऱ्हाड्यांना मध्यप्रदेशावर सत्ता गाजविण्याचा हक्क आहे ! " संपत्तीपेक्षां त्यांना सत्ता अधिक प्रिय होती. किंबहुना, सत्ता मिळविण्याचें केवळ एक साधन म्हणूनच ते संपत्तीकडे पहात असत. त्यामुळें वकिलीचा जम चांगला बसतांच त्यांनीं नागपुरांतील राजकीय आणि सामाजिक चळवळींत भाग घ्यावयाला सुरवात केली; व नेमस्त पक्षाच्या पदवी नसलेल्या दुय्यम पुढाऱ्यांत त्यांना लवकरच स्थान मिळालें. सत्ता संपादन करण्याच्या बाबतींत संपत्तीप्रमाणें लोकप्रियतेचेंहि महत्त्व ते ओळखून होते. म्हणून, इतर नेमस्त पुढाऱ्यांप्रमाणें जुन्या समाजापासून फटकून दूर न रहातां, गोरक्षण आणि गणेशोत्सवाच्यासारख्या लोकप्रिय धार्मिक चळवळींतहि ते सामील होत असत. नेमस्त पक्षांतील आणि वकिलींतीलहि त्यांचे आश्रयदाते असलेले सर बिपिन कृष्ण बोस यांना त्यांचा जहाल राजकारणाशीं असलेला हा

संसर्ग आवडत नसे. पण, नागपूरच्या राजकारणांत असलेलें सर बिपिन यांचें प्रस्थ मोडण्यासाठीं चाललेल्या स्थानिक जहाल मुत्सद्यांच्या डावपेंचांना तोंड देण्याकरितां या तरुण वकिलाची हिंमत आणि हिकमत त्यांना उपयोगी पडत असल्यामुळें, सर महादेव यांचा हा मर्यादातिक्रम ते सहन करीत; व केव्हां केव्हां असें बोलूनहि दाखवीत कीं, " आमचा महादेव हा नेमस्त आणि जहाल या दोन पक्षांच्या सरहद्दीवरील प्राणी आहे ! "

सर महादेव यांची ही दुहेरी तपस्या मध्यप्रांत—वऱ्हाडला मॉटफोर्ड सुधारणा लागू झाल्याबरोबर फळाला आली. कॉंग्रेसनें कायदेमंडळांवर घातलेल्या बहिष्काराचा फायदा घेऊन ते कौन्सिलांत निवडून आले; व मध्यप्रांताचे पहिले शिक्षणमंत्री होण्याचा मान त्यांनीं पटकावला. मंत्रिपद स्वीकारल्यानंतर सर महादेव जेव्हां सर बिपिन यांना भेटावयाला गेले, तेव्हां सरसाहेबांनीं त्यांना असा पोक्त उपदेश केला कीं, " हिंदी लोकांना प्रांतिक राज्यकारभाराच्या जबाबदारीचा वांटा हा प्रथमच मिळत असल्यामुळें युरोपियन अधिकाऱ्यांशीं गोडीगुलाबीनें वागून तूं आपली कारकीर्द यशस्वी करून दाखीव ! " पण सर महादेव यांचें वर्तन या उपदेशाच्या अगदीं उलट झालें. त्यांच्याकडे सोंपविण्यांत आलेल्या खात्यांपैकीं एका खात्याच्या गोऱ्या सेक्रेटरीनें त्यांनीं मागितलेली एक गुप्त फाईल त्यांना देण्याचें नाकारलें; व त्याला या वर्तनाबद्दल त्यांनीं जाब विचारला असतां, " मी या बाबतींत गव्हर्नरला जबाबदार आहें, " असें उत्तर त्याच्याकडून मिळालें ! सर महादेव यांच्या हिंदी सहकाऱ्यांनीं त्यांना हा अपमान मुकाट्यानें गिळण्याचा सल्ला दिला. पण, त्यांनीं गव्हर्नरपर्यंत हें प्रकरण नेऊन, त्या सेक्रेटरीला आपल्यापुढें नाक घासावयाला लावलें. इतकेंच नव्हे, तर आपल्या खोलीमध्यें फक्त स्वतःपुरती एक खुर्ची ठेवून आपल्याकडे येणाऱ्या गोऱ्या अधिकाऱ्यांना आपल्यासमोर थोडा वेळ तरी उभें रहाणें भाग पडावें, अशीहि व्यवस्था त्यांनीं नंतर केली ! पण त्यांच्या कर्तबगारीमुळें गव्हर्नरचा त्यांच्यावर लोभ जडला; व स्वराज्यपक्षानें निवडणुकी लढविण्याचें ठरविल्यावर, आपण उभें रहावें कीं नाहीं या विवंचनेंत ते पडले असतां, त्यांची

गृहमंत्रिपदावर नेमणूक करून मध्यप्रांत सरकारनें आगामी लढाऊ लोकपक्षाला तोंड देण्याची उत्कृष्ट तयारी केली.

गृहमंत्रिपदावर असतांना सर महादेव यांची मुत्सद्देगिरी आणि संघटना-चातुर्य हीं सरकार आणि लोक यांच्या प्रत्ययाला आलीं. 'खुल्या मेजा' च्या धोरणावर ( *Open Table Theory* ) सर महादेव यांचा फार विश्वास होता; व गृहमंत्री झाल्यावर त्यांनीं अशी पद्धत सुरू केली कीं, आपल्या सहकाऱ्यांना, कौन्सिलच्या सदस्यांना आणि हाताखालच्या अधिकाऱ्यांना दर शनिवारीं रात्रीं खाना द्यावयाचा. लोकपक्षाच्या पुढाऱ्यांनाहि ते या खान्यांना पुष्कळदां बोलावीत असत. कौन्सिलची बैठक चालू असतां तर कधीं कधीं अर्धे अधिक कौन्सिल या खान्याला हजर रहावयाचें! लोकांची अशी समजूत होती कीं, कौन्सिलपुढें येणाऱ्या बिलांचें आणि ठरावांचें भवितव्य या खान्याच्या वेळीं होणाऱ्या वाटा-घाटींत निश्चित होतें. कारण सर महादेव यांनीं आणलेल्या कोणत्याहि बिलाला विरोध सहसा कधीं होत नसे; व यदाकदाचित् झालाच, तर प्रत्यक्ष मतदानाच्या वेळीं मात्र निम्यापेक्षां जास्त लोकनियुक्त सभासद त्यांच्या गोटांत दाखल झालेले दिसत. त्यांच्याकडील या खान्यांमुळें कौन्सिलचें 'मोरेल' ( Morale ) बिघडतें, अशी तक्रार एकदां लोकपक्षाच्या अग्रणींनीं आपल्या भाषणांत पर्यायानें केली. तेव्हां, सरसाहेबांनीं हंसत हंसत त्यांना असा टोमणा मारला कीं, "खुद्द माझे मित्र लोकपक्षाचे सन्मान्य पुढारी हेसुद्धां मला आपल्या पंक्तीचा लाभ केव्हां केव्हां मोठ्या सौजन्यानें देत असतात. पण म्हणून त्यांचें स्वतःचेंहि मोरेल बिघडलें आहे, असें कौन्सिलनें समजावें काय? खान्याच्या वेळीं एकत्र आल्यानें कोणाचाहि नैतिक खंबीरपणा कमी होत नाहीं. उलट खाजगी स्नेहसंबंध कायम राहून कौन्सिलांतील वादविवादांचा उच्च दर्जा टिकावयाला मात्र मदत होते!" त्यांच्या कारकीर्दींत मध्यप्रांतीय कौन्सिल म्हणजे त्यांच्या टेबलावरील जणुं कांहीं बुद्धिबळाचा केवळ खेळ होऊन बसला होता.

सर महादेव निवृत्त झाल्यापासून या खात्याचें राजकीय महत्त्व आतां अर्थातच कमी झालें होतें. पण, बहुतेक बाबतींत गव्हर्नर अजूनहि त्यांचा सल्ला घेतो, असा लोकप्रवाद असल्यामुळें, प्रांतांतील राजकीय घटनांचा संबंध

केव्हां केव्हां या खान्याशीं जोडला जात असे. कौन्सिलचे सभासद् किंवा बडे अधिकारी हे खान्याला आलेले आतां क्वचितच दृष्टीस पडत. तथापि सर महादेव यांची निवडक मित्रमंडळी मात्र या प्रसंगीं नियमानें हजर असे.

'सागर व्हिला'च्या विस्तीर्ण आवारांत जेव्हां यादवरावांची मोटार शिरली, तेव्हां साडे आठला पांच मिनिटें कमी होतीं. आवारांतील अंतर्भागाच्या द्वाराशीं गाडी थांबतांच सर महादेव यांचे ज्येष्ठ चिरंजीव बॅ. राधामोहन यांनीं पुढें येऊन त्यांचें स्वागत केलें.

गाडींतून खालीं उतरून शुभ्र वालुकापथावर पाऊल ठेवतांच त्यांनीं राधामोहनला, किंचित् काळजीच्या आवाजांत, घाईघाईनें इंग्रजींत विचारलें, "काय राधा, दद्दा खालीं तर नाहीं ना आले अजून ?—"

"नाहीं. अजून पांच मिनिटं अवकाश आहे ना साडे आठला ? पण येतलिच इतक्यांत खालीं—"

"मला सारखी भीति वाटत होती आपल्याला उशीर होतो की काय म्हणून !—थँक गॉड !"

ते दोघे बोलत बोलत बंगल्याच्या कमानीसमोरील प्रशस्त पटांगणावर आले. तिथें अर्धवर्तुलाकार ठेवलेल्या खुर्च्यांवर खान्यासाठीं आलेली निमंत्रित मंडळी बसली होती. यादवरावांना पाहिल्याबरोबर एक टक्कल पडलेले किंचित् स्थूल गृहस्थ आपल्या तोंडांतील पाईप बाहेर काढून इंग्रजींत उद्गारले, "या कदमसाहेब ! आज फार उशीर केलात तुम्हीं यायला ! काय मीनफचा डाव रंगला होता की एकाद्या कटाचा सुगावा लावण्यांत गुंतला होतां ?—"

त्यांचा तो प्रश्न कानांवर पडतांच यादवरावांच्या चेहऱ्यावर विषादाची छटा झरकन् उमटून गेली. पण ते हंसत हंसत म्हणाले, "त्याचं असं आहे गुप्तासाहेब ! आम्हीं जेव्हां एकाद्या कटाचा शोध लावूं, तेव्हां तुम्हांला काम मिळेल—"

"कसलं आलंय काम ? तुम्हीं गुप्त कटाचें अस्तित्व सिद्ध करण्यासाठीं जो बनावट पुराव्याचा कट रचतां त्याचा पोकळपणा झांकतांना त्रेधा उडते

आमची! सरकारी ॲडव्होकेट म्हणजे जसा कांहीं सी. आय. डी. चा साथीदारच !——"

यादवराव बॅ. गुप्ता यांच्या समोरच्या खुर्चीवर बसले. त्याबरोबर शुभ्र पोषाख केलेल्या हुजुऱ्यानें सिगारेटचा डबा असलेलें चांदीचें तबक त्यांच्यापुढें अदबीनें धरलें. पण, त्यांतील सिगारेट घेण्याचें आभारपूर्वक नाकारून, त्यांनीं आपल्या खिशांतील हस्तिदंती डबी काढली; व तिच्यांतील एक चिरूट शिलगावला.

त्याचा झुरका घेऊन ते गुप्तासाहेबांना उत्तर देणार, तोंच विजेच्या घंटीचा खणखणीत आवाज झाला——

——आणि खान्याच्या वेळचा काळा पोषाख घातलेले सर महादेव ठाकूर ताठरपणानें पावलें टाकीत तेथें आले.

त्याबरोबर सर्व मंडळी उभी राहिली.

तेव्हां त्यांना इंग्रजी पद्धतीनें अभिवादन करून चोंहोंकडे नजर टाकीत ते हिंदींत म्हणाले, "राधा, अरे प्रिया नाहीं आलेला दिसत अजून ?"

"होय दद्दा! पण अजून आपल्याला जेवायला बसायला पंधरा मिनिटं आहेत. तेवढ्यांत येईल बहुधा तो——"

"माझ्या स्वभावाला उशीर झालेला अगदीं खपत नाहीं हें माहित आहे त्याला. तरीसुद्धां हा पोरगा वेळेवर येत नाहीं कधीं——"

हे शब्द अर्धवट स्वतःशीं पुटपुटत सर महादेव किनखापी गिरद्या घातलेल्या मधल्या खुर्चीवर येऊन बसले.

"काय यादव, कांहीं विशेष बातमी ? आतां पुन्हां दगदग वाढणार तुमची——"

ते यादवरावांकडे पाहून म्हणाले.

"आपल्याला खरोखरीच वाटतं, दद्दा, गांधींची ही मिठाच्या सत्याग्रहाच्या चळवळीची कल्पना यशस्वी होईल असं ? काल डी. सी. च्या बंगल्यावर पार्टीला गेलें होतें मी! तिथें जो तो थट्टा करीत होता त्या कल्पनेची——"

बॅ. गुप्ता यांच्या शेजारच्या खुर्चीवर बसलेली तरुण स्त्री त्यांच्याकडे वळून म्हणाली.

तिनें तोंड वळविल्याबरोबर तिच्या मस्तकावरील ओढणी किंचित् मागें झुकून विद्युद्दीपाचा झगझगीत प्रकाश तिच्या मनोहर चेहऱ्यावर पडला. सरसाहेबांना प्रश्न विचारून होतांच तिनें ओढणी नीट करण्यासाठीं म्हणून हात वर केला. त्याबरोबर, तिच्या त्या हाताचा किंचित् पिवळसर छटा असलेला उज्ज्वल गौरवर्ण आपल्या कांतीनें तिच्या दंडांतील केयूराला जणुं लाजवीत आहे, असा भास झाला.

" या आय्.सी.एस्. अधिकाऱ्यांना कल्पनाशक्ति मुळीं कशी ती नसतेच! कोणतीहि नवीन राजकीय चळवळ निघाली म्हणजे प्रथम तिची थट्टा करायची न् ती आटोक्याबाहेर गेली म्हणजे कायद्याचीं असतील नसतील तीं जुनीं गंजलेलीं कलमें उपयोगांत आणून ती दडपून टाकण्याचा प्रयत्न करायचा, एवढंच त्यांना ठाऊक आहे! लोक एकादी चळवळ उचलून धरायला कां प्रवृत्त होतात, याचा विचार करण्यासाठीं ते आपल्या डोक्याला कधींतरी शीण देतात का? मिठावरील कराचा चाप हिंदुस्थानांतल्या अगदीं गरीबांतल्या गरीब माणसाला सुद्धां जाणवतो; न् गेलीं चाळीस वर्षें कॉंग्रेसहि तो कर रद्द व्हावा म्हणून सारखी मागणी करीत आली आहे. त्या करापासून आपल्या कायदेभंगाच्या चळवळीला प्रारंभ करण्यांत गांधींनीं खरोखरीच मोठी कल्पकता प्रकट केली आहे—"

" मग यशस्वी होईल म्हणायची तर ही चळवळ?" तिनें मध्येंच विचारलें.

" होय. माझा तरी अंदाज असाच आहे, हिमा. लोकांच्या कल्पनाशक्तीला झुलविण्याचं गांधींचं सामर्थ्य अचाट आहे! ये प्रिया, किती उशीर केलास तूं?—"

समोरून येणाऱ्या खादीचा शुभ्र पोषाख केलेल्या तरुणाला उद्देशून सरसाहेब म्हणाले.

" अद्याप पावणे नऊ झाले नाहींत, दद्दा!" त्यानें हातांतील घड्याळाकडे पहात हंसून पण विनयानें म्हटलें, " प्रांतिक कांग्रेस कमिटीची तांतडीची सभा असल्यामुळें वेळ लागला मला—"

" काय ठरलं आजच्या कमिटींत?" यादवरावांनीं मध्येंच मोठ्या उत्सुकतेनें विचारलें.

" तुम्हांला कळेलेंच की काय ठरलं तें मागाहून काका !" तो हंसून म्हणाला.

" गांधींचं अनुकरण करून ते जर मिठाचा सत्याग्रह सुरू करणार असतील या प्रांतांत, तर तें मूर्खपणाचं प्रदर्शन होईल त्यांच्या !"

सरसाहेब आवेशानें उद्गारले. ते आणखी कांहीं बोलणार, तोंच पांढरा पोषाख केलेल्या खानसाम्यानें पुढें येऊन खान्याची वेळ झाल्याचें जाहिर केलें. त्याबरोबर सर्व मंडळी उठून खान्याच्या खास दिवाणखान्यांत गेली. दिवाणखान्याच्या मध्यभागीं लावलेल्या सुंदर झुंबराचा विद्युत्प्रकाश टेबलावर पडल्यामुळें चांदीचे काटे, चमचे आणि प्लेट्स चकाकत होते; व टेबलावर ठेवलेल्या पुष्पपात्रांतील फुलांचा गंध हवेंत दरवळला होता. टेबलाच्या दोन बाजूंना दोन परिचारक हुकमाची वाट पहात उभे होते.

आजच्या खान्याला हजर असलेली मंडळी ही सर महादेव यांचें ' राजकीय कुटुंब ' म्हणून सर्व मध्यप्रांत—वऱ्हाडांत प्रसिद्ध होती. त्यांच्या उजव्या हाताला बसलेली स्त्री हिमगौरी व तिच्या शेजारीं बसलेले तिचे पति बॅ. हेमंतकुमार गुप्ता यांचा सरसाहेबांशीं जवळ जवळ वीस वर्षें अत्यंत निकट संबंध होता. नागपुरांत आपला जम बसल्याबरोबर त्यांनीं सागरच्या या तरुण बॅरिस्टरला मुद्दाम बोलावून घेऊन आपल्या हाताखालीं ठेवलें. बॅ. गुप्ता हे बंगाली ब्राम्हो होते. त्यांच्या पत्नीचें कुळ, जात किंवा धर्म यांच्याविषयीं निश्चित विधान करणें सोपें नव्हतें. हिमगौरीशीं लग्न करून जेव्हा गुप्ताबाबू कलकत्त्याहून एका नाताळांत नागपुरास परत आले, तेव्हां ती त्यांच्याप्रमाणेंच बंगाली ब्राम्हो असावी अशी लोकांची समजूत झाली. पण नागपुरास आल्यावर पहिल्याच रविवारीं सकाळीं ती युरोपियन पेहराव करून एकटीच ख्रिस्ती देवळांत जातांना लोकांच्या दृष्टीस पडली; व ती ब्राम्ही असल्याचा आपला समज चुकीचा ठरल्याचें त्यांच्या लक्षांत आलें. पुढें, असहकारितेची चळवळ सुरू झाल्यावर ती नागपूरच्या कॉंग्रेसला जेव्हां, कधीं आपल्या भांगाच्या वक्र रेषेंत तर कधीं विशाल भालपटलावर कुंकुम धारण करून, नेहरूंच्या मुलीबरोबर हजर राहिली, तेव्हां तिनें हिंदु धर्मांत प्रवेश केला आहे असें वाटून लोकांत तिच्याविषयीं आदर उत्पन्न झाला. ती हिंदी आणि इंग्रजी या दोन्ही भाषांत चांगलें बोलत असे; व गेल्या

वर्षीं सरकारनें तिची कौन्सिलांत नेमणूक केल्यावर तिनें जें पहिलेंच ठसकेदार भाषण पुरवणी अंदाजपत्रकावर केलें, तें चालू असतां लोकपक्षाच्या रसिक पुढाऱ्यांचें मस्तक कौतुकानें सारखें डोलत होतें. बॅ. गुप्ता हे सरकारी वकील होते. पण, लोक त्यांना जरी सरसाहेबांचे मानसपुत्र म्हणत असत, तरी हिमगौरीला मात्र त्यांची सून मानण्याची लोकांची तयारी नव्हती.

सर महादेव यांच्या डाव्या हाताला बसलेली स्त्री प्रियंवदा देशमुख नागपुरांतील निमसरकारी चळवळींत प्रामुख्यानें भाग घेणारी जुन्या, संस्कृत घराण्यांतील तरुण विधवा होती. लोकप्रवाद असा होता कीं, हिमगौरी आणि प्रियंवदा यांची सरसाहेबांचा स्नेह संपादन करण्याच्या बाबतींत अतिशय चुरस असून, हिमगौरी जरी प्रियंवदेपेक्षां जास्त सुंदर आणि शिकलेली होती, तरी प्रियंवदेचें वैधव्यमूलक स्वातंत्र्य सरसाहेबांचें साहचर्य तिला अधिक लाभावयाला सहाय्यक झालें होतें. सरसाहेब शिक्षणमंत्री आणि गृहमंत्री असतांना कौन्सिलच्या गॅलरींत, लायब्ररींत किंवा लॉबींत प्रियंवदा नेहमीं दृष्टीस पडावयाची; व त्यामुळें कौन्सिलचे कांहीं वात्रट सभासद तिला 'सरकारचा बिनसरकारी प्रतोद' म्हणत असत. हिमगौरीप्रमाणें ती वक्तृत्वकुशल नव्हती, हें खरें. पण, आपल्या मधुर भाषणानें आणि चतुर वर्तनानें दुसऱ्याचा मनोनुनय करण्यांत ती अत्यंत निपुण असून, कौन्सिलांतील लोकनियुक्त सभासदांचीं मतें फोडण्याच्या किंवा नाजुक प्रसंगीं दौत्य करण्याच्या कामीं सर महादेव यांना तिचा फार उपयोग होत असे. म्हणून, एकदां कौन्सिलची बैठक चालू असतां उपहाराच्या सुटींत लोकपक्षाच्या रसिक पुढाऱ्यांनीं, चहाचे घुटके घेतां घेतां, कालिदासानें केलेल्या उर्वशीच्या वर्णनांत थोडा फरक करून, "प्रियंवदा, लोकपक्षपरिशंकितस्य सुकुमारं प्रहरणं महादेवस्य । प्रत्यादेशः रूपगर्वितायाः हिमगौर्याः ! अलंकारः कौन्सिलस्य ।" असे उद्गार जेव्हां प्रियंवदेविषयीं काढले, तेव्हां सभासदांत एवढा मोठा हशा उसळला कीं, पलिकडच्या बाजूला एका युरोपियन सभासदाशीं चर्चा करीत बसलेले सर महादेव, हा काय प्रकार आहे हें पाहण्यासाठीं, विस्मयानें तेथें आले !

प्रियंवदेच्या शेजारीं बसलेले यादवराव कदम हे सरसाहेबांच्या धाकट्या बंधूचे सहाध्यायी असल्यामुळें त्यांचें यादवरावांवर बंधुतुल्य प्रेम होतें. बॅ. गुप्ता

यांच्या पलिकडे वृद्ध रावबहादूर हे नागपूर विद्यापीठाचे कोशाध्यक्ष असून, शिक्षणखात्यांत इन्स्पेक्टरच्या हुद्यापर्यंत चढून नंतर निवृत्त झाले होते. सर महादेव यांच्याशीं त्यांचा स्नेह कॉलेजांत असल्यापासून होता.

सरसाहेबांच्या समोर त्यांचे चि. बॅ. राधामोहन, त्यांची पत्नी मालिनी, सरसाहेबांची कन्या ऊर्मिला आणि त्यांच्या धाकट्या भावाचा एकुलता एक मुलगा——तो मधांशीं उशीरा आलेला खादीधारी तरुण– प्रियदर्शन बसला होता. राधामोहन यांची मध्यप्रांत सरकारनें नुकतीच मजूर सभासद म्हणून कौन्सिलांत नेमणूक केली होती. प्रियदर्शननें गेल्याच वर्षी वकिलीला प्रारंभ केला होता. त्याच्या शेजारीं राधामोहनचे एक ज्यू स्नेही बेंजामिन व सरसाहेबांचा मद्रासी चिटणीस राघवय्या हे बसले होते.

खान्याला सुरवात झाल्यावर सर महादेव प्रियदर्शनला हिंदींत म्हणाले, "काल लखनौला व्हाइसरॉयानं केलेलं भाषण वाचलंस तूं, प्रिया?–मला वाटतं, गांधींनीं निष्कारण गोष्टी निकरावर आणल्या आहेत. इर्विन हा चांगला मनुष्य आहे. पण, तो कितीहि भला असला, तरी एकदम कांहीं साऱ्या गोष्टी बदलूं शकत नाहीं. गांधींनीं त्याला संधि द्यायला हवी होती——"

"मला तें लखनौचें भाषण म्हणजे धमकी वाटली निव्वळ! काय म्हणे स्वातंत्र्याच्या ध्येयाला कवटाळल्यानं हिंदुस्थानचा विनाश होईल! असल्या धमक्यांनीं लोक कांहीं दबायचे नाहींत आतां! गांधींनीं संधि दिली होती; पण ती व्हाइसरॉयानं घालवली——"

"नाहीं! मला उलट वाटतं! गांधींना जर त्यांच्या मताप्रमाणं वागण्याचं धैर्य झालं असतं, तर गेल्या डिसेंबरांत व्हाइसरॉयाशीं झालेल्या वाटाघाटींच्या वेळींच त्यांनीं राऊंड टेबलला संमति दिली असती. पण मोतीलाल नेहरूंचा तो उद्दाम अविचारी पोरगा आड आला! तुम्हीं जर वाटेल ती बेकायदेशीर भाषा बोलूं लागलांत, तर तुम्हांला जरब देणं हें कायद्यानं स्थापन झालेल्या सरकारचं कर्तव्यच आहे मुळीं!"

सरसाहेबांचा आवाज बोलतांना इतका चढत गेला कीं, त्यांच्या त्या विधानाला उत्तर देऊन त्यांना अधिक डिवचणें प्रियदर्शनला इष्ट वाटलें नाहीं.

इतक्यांत प्रियंवदा विषय बदलण्याच्या उद्देशानें म्हणाली, "काय रे प्रिया, तूं व्याख्यान कधीं देणार आहेस सोशॅलिझमवर आमच्या भगिनी-समाजांत ?—"

"सोशॅलिझम !—भगिनीसमाजापर्यंत येऊन पोंचला का इतक्यांत तुमच्या ?—"

सरसाहेबांनीं एकदम रागानें प्रियंवदेकडे वळून म्हटलं. त्यांच्या लालसर गोऱ्यापान कपाळावरील मधली शीर फुगून ताठ झाली होती; व कानाशिलाच्या दोहों बाजूंनीं घर्मबिंदु तरारून उठले होते.

"बायकांपुढं सोशॅलिझमवर व्याख्यान करणं हें खरोखरीच फार अनिष्ट आहे, प्रियंवदाबाई !" वृद्ध रावबहादुर उद्गारले.

"कां बर ?" हिमगौरीनें विचारलें, "बायकांनीं वेदांचं श्रवण करूं नये असं सांगणाऱ्या मनूच्या कोटींतलं दिसतंय आपलं हें मत मला —"

"मनु काय मूर्ख होता असं वाटतं का तुला, हिमा ?" बॅरिस्टरसाहेब मध्येंच इंग्रजींत म्हणाले. "तुम्हांला जर व्याख्यान करायचंच असलं, तर इंग्लंडां-तल्या ट्रेड युनियन्सवर राधाचं व्याख्यान करा ना तुम्हीं !—"

"तसलं व्याख्यान हवंय कुणाला आजच्या काळांत ? जास्तींत जास्त जहाल भाषा ऐकायला हपापले आहेत लोक सारे ! हा तरी एक मनोगंडच आहे !" राधामोहन इंग्रजींत म्हणाला.

"होय. पारतंत्र्यामुळं उत्पन्न झालेला !" प्रियदर्शननें किंचित् आवेशानें म्हटलें. "परतंत्र माणसाला स्वातंत्र्याविषयींच्या जहाल कल्पना ऐकायला आवडाव्यात यांत कांहीं आश्चर्य नाहीं !—"

"पण म्हणून काहीं जबाबदार माणसांनीं जिभा मोकाट सोडतां कामा नयेत, प्रिया ?" सरसाहेब मध्येंच इंग्रजींत उद्गारले. त्यांच्या आवाजांत खिन्नतेची झांक स्पष्ट उमटली होती. "तूं कॉंग्रेसला मिळालास याबद्दल मला म्हणायचं नाहीं कांहीं. आमच्या पिढीपेक्षां तुमचीं मतं अधिक जहाल असावींत हें साहाजि-

कच आहे. पण मला वाटतं, या नव्या चळवळीपासून तूं प्रयत्नपूर्वक दूर राहिलं पाहिजेस—"

" पण मी आजच सत्याग्रहांत सामील होण्याचा माझा निश्चय कमिटींत सांगून आलों, दद्दा !—"

" मला विचारल्याशिवाय ! मला विचारल्याशिवाय ! !" सरसाहेब त्याच्याकडे पाहून जोरानें उद्गारले.

त्यांच्या हातांतील कांटा आणि चमचा थरथरा कांपत होता.

" नाहीं दद्दा ! तसं नव्हे ! मी आपल्याशीं आधीं बोलून घेणार आहे सगळं न् मगच प्रतिज्ञापत्रक भरणार आहे—"

त्यांचा तो मनःक्षोभ पाहून घाबरलेल्या प्रियदर्शननें अत्यंत नम्रतेनें म्हटलें.

" नाहीं ! नाहीं ! तुझ्याशीं मी कांहींहि बोलूं इच्छित नाहीं आतां या बाबतींत ! कमिटींत स्वतःचा निश्चय जाहिर केल्यावर आतां तूं मला नुसतं औपचारिक विचारणार,—माझी परवानगी मागण्याचं नुसतं सोंग करणार ! मला वाटलं नव्हतं तूं इतका वाहवशील म्हणून, प्रिया ! दांडीला तर जाण्याचा विचार नाहीं ना तुझा ?—"

सरसाहेबांचा क्षोभ थोडा कमी झाला होता. पण त्यांच्या आवाजांत आतां मनोवेदनेची तीव्रता मात्र स्पष्ट उमटली होती.

" नाहीं, नाहीं ! आपली परवानगी घेतल्याशिवाय मी कसा जाईन दद्दा ?—"

" तुझा कांहींहि भरंवसा वाटत नाहीं मला. तुझे आजोबा ई. ए. सी. पर्यंत चढले; तुझे वडील जगले वांचले असते, तर आज डी. सी. झाले असते. आणि मी गेल्याच वर्षीं या दिवसांत हंगामी गव्हर्नर होतों ! तूं उद्यां सत्याग्रहांत सामील झालास, म्हणजे मध्यप्रांताच्या माजी हंगामी गव्हर्नरचा पुतण्या सत्याग्रही झाल्याबद्दल साऱ्या हिंदुस्थानांत तारा फडकतील ! छे, छे ! प्रिया, ही गोष्ट कधींहि घडतां कामा नये—"

त्यांनीं हातांतील चमचा आणि कांटा खालीं ठेवला.

खाना संपवून मंडळी कॉफीपानासाठीं बाहेरच्या दिवाणखान्यांत आली, त्या वेळीं वातावरण अगदीं गरम आणि गंभीर होतें. कॉफी घेतल्यावर चपराश्यानें पुढें केलेल्या तबकांतला विडा प्रियदर्शननें तोंडांत घातला; व तो हळूच वेताच्या खुर्चीवर रेलून कॉफी घेत असलेल्या सरसाहेबांच्या मागें येऊन उभा राहिला.

त्याला पाहातांच त्यांनीं अर्धवट प्यालेला कॉफीचा कप चपराश्याच्या हातीं दिला; व ते अत्यंत दुःखपूर्ण आवाजांत त्याला म्हणाले, " प्रिया, निघालास तूं ? माझ्या मघांचच्या बोलण्याचा राग नाहीं ना आला तुला ? खरोखरी, माझी मनोदेवता मला असं सांगते कीं, या मार्गानं जाण्यांत आपलं कल्याण नाहीं, आपल्या देशाचं कल्याण नाहीं ! निदान तूं तरी हा अविचार करतां कामा नयेस—"

बोलतां बोलतां त्यांनीं आपला उजवा हात कपाळाला लावला. भोंवतालीं बसलेली सारी मंडळी स्तब्ध होऊन त्यांच्याकडे आणि प्रियदर्शनकडे पहात होती.

पण तो कांहींच बोलला नाहीं.

" कांताला सांग मी भेटायला बोलावलंय उद्यां म्हणून—"

शेवटीं तेच थोडा वेळ वाट पाहून उद्गारले. त्या उद्गारांत त्यांची दारुण मनोव्यथा ओतप्रोत भरली होती.

त्यांना नमस्कार करून प्रियदर्शन बाजूला झाला.

पण तो जावयाला निघणार, तोंच यादवरावांनीं त्याचा हात धरून हळूच त्याला म्हटलें, " माझ्या गाडींतूनच चल, प्रिया !—"

" नाहीं. माफ करा काकासाहेब ! मी सायकल आणली आहे आपली—"

आणि, त्यांना एक शब्दहि बोलण्याची संधि न देतां, तो खालीं मान घालून झपझप पाउलें टाकीत दिवाणखान्यांतून बाहेर पडला.

३

# चांदण्यांतील सांवल्या

सागर व्हिलाच्या विस्तीर्ण आवारांतून बाहेर पडून प्रियदर्शन रस्त्यावर येतांच वाऱ्याची गार झुळूक एकदम त्याच्या अंगावर आली. ती झुळूक म्हणजे आपल्या सोसाट्यानें झाडांना झोडपून निष्पर्ण करून सोडणाऱ्या शिशिराचा दीर्घ निःश्वासच होता जणुं कांहीं. चंद्राचें अर्धबिंब बरेंच खालीं उतरलें होतें; व धुकें आणि चांदणें यांची सरमिसळ होऊन सृष्टीच्या कृश गात्रांवर एक प्रकारचा सुस्तपणा आला होता. पर्णहीन झाडांतून जोरानें वहाणारी ती वाऱ्याची झुळूक स्वस्थ झोंप न लागलेल्या माणसाच्या कण्हण्यासारखा आवाज करीत होती. त्या धूसर चंद्रप्रकाशांत तेलंखेडीच्या लगत असलेल्या राखीव जंगलाची क्षितिजा-वरील सांद्र रेषाकृति पाहून आकाशाच्या त्या बाजूला दाट ढग सांचले अस-ल्याचा भास होत होता. चांदण्यामुळें मागें हटत गेलेल्या सृष्टींतील साऱ्या काळो-खानेंच जणुं कांहीं त्या जंगलाच्या आसऱ्यानें क्षितिजाच्या त्या कडेला दडी दिली होती. झाडांच्या उंच, उवडयावाबडया फांद्या हिंवाळ्यानें सारीं आभरणें हिरावून घेतलेल्या सृष्टीच्या दुर्दशेची कहाणी आपल्या निःशब्द आंदोलनानें सांगत होत्या.

थंड पाण्याचा हबका तोंडावर मारतांच मनुष्य जसा मूर्च्छेतून सावध व्हावा, त्याप्रमाणें तो वाऱ्याची गार झुळूक अंगावर येऊन आदळतांच प्रियदर्शन आपल्या विचारांच्या तंद्रींतून जागा झाला. त्यानें सायकलचा वेग कमी करून सभोंवतीं बघितलें. चंद्राच्या धूसर प्रकाशानें युक्त असलेली ती शांत आणि भयाण रात्र!—त्या प्रकाशांत क्षीण भासणारे दूर दूरचे पिवळसर विजेचे दिवे

म्हणजे त्याच्याकडे अनुकंपेनें पहाणारे त्या रात्रीचे डोळेच होते जणुं कांहीं. झाडांच्या लांबवर झुकलेल्या सांवल्या, चंद्रकिरण पिऊन सुस्त झालेल्या नागिणीप्रमाणें, रस्त्यावर वेडच्यावांकडचा पसरलेल्या होत्या. तें उदासरम्य दृश्य पाहून प्रियदर्शनला वाटलें कीं थोडा वेळ तेलंखेडीवर जाऊन बसावें. पण, लगेच त्याला आठवण झाली, कांता कदाचित् घरीं एकटीच असेल. आपल्याला आज दद्दांकडे खान्याला जावयाचें आहे, ही गोष्ट उमाच्या लक्षांत होती. तरीसुद्धां तो निशाचर लवकर घरीं परत येईलच, असा काय नेम ? हा विचार मनांत येतांच त्यानें जास्त जोरानें सायकल चालवावयाला सुरवात केली

पण त्या सायकलपेक्षांहि मघांचच्या प्रकारानें चाळवलेलें त्याचें मन अधिक वेगानें भ्रमण करीत होतें.

ज्या संतप्त पण हताश मुद्रेनें सरसाहेबांनीं मघांशीं हातांतला कांटा आणि चमचा खालीं ठेविला होता, ती त्यांची मुद्रा सारखी त्याला आपल्या डोळ्यांपुढें दिसत होती. त्यांच्या आपल्यावरील निरतिशय प्रेमाची आठवण होऊन त्या प्रेमाची साक्ष देणारे अनेक प्रसंग झरझरा त्याच्या दृष्टीपुढून गेले. वयाच्या पांचव्या वर्षी तो पितृहीन झाल्यावर सरसाहेबांनीं त्याच्या आईसह त्याला जवळपुराहून नागपुरास आणलें; व धंतोलीवर मुद्दाम नवा बंगला विकत घेऊन तेथें त्यांची स्वतंत्र व्यवस्था करून दिली. राधामोहन हा त्यांचा स्वतःचा मुलगा. पण, त्याच्यापेक्षां सुद्धां जास्त प्रेम त्यांनीं आपल्या या पोरक्या पुतण्यावर केलें होतें. होमरूलच्या चळवळीच्या वेळीं ते नेमस्त पक्षाच्या शिष्टमंडळांतून जेव्हां विलायतेस गेले तेव्हां राधाप्रमाणेंच प्रियदर्शनलाहि त्यांनीं आपल्याबरोबर नेला होता. पण, त्याला स्वतःपासून दूर ठेवण्याची त्याच्या आईची इच्छा नसल्यामुळें, ते येतांना त्याला आपल्याबरोबर परत घेऊन आले. इंग्लंडांत सात वर्षें राहून राधानें जे गुण उधळले, त्यामुळें त्यांचें मन त्याच्याविषयीं अजिबात विटलें; व प्रियदर्शन हा त्यांच्या प्रेमाचेंच केवळ नव्हे, तर आकांक्षांचेंहि केंद्र होऊन बसला.

त्याला तो हृदयस्पर्शी प्रसंग आठवला.

त्या वेळीं तो नुकताच बी. ए. झाला होता; व राजकारणाचें प्रत्यक्ष शिक्षण देण्याच्या हेतूनें सरसाहेबांनीं त्याला मुद्दाम आपल्या हाताखालीं घेतलें होतें.

त्या दिवशीं शनिवार होता. सरसाहेब आपल्या अभ्यासिकेंत ( Study ) फेऱ्या घालीत होते; व विलायतच्या डाकेनें आलेलीं तीन पत्रें त्यांच्या टेबलावर उघडींच पडलेलीं होती. तो आंत आल्यावर ते त्याला म्हणाले, "प्रिया, तीं पत्रें वाच तूं. म्हणजे तुझ्या थोरल्या भावाचे प्रताप कळतील तुला!" त्यानें तीं पत्रें वाचलीं आणि तो अगदीं सुन्न होऊन गेला. त्यांपैकीं एका पत्रांत राधानें आपला हिंदुस्थानांत परत न येण्याचा निश्चय कळविला होता; व दुसऱ्या दोन पत्रांतून सरसाहेबांच्या लंडनला रहाणाऱ्या दोघां मित्रांनीं त्याच्या तेथील चंडोल जीवनाची माहिती दिली होती. त्यानें तीं पत्रें वाचून खालीं ठेवल्यावर ते त्याच्याकडे वळून म्हणाले, 'वाचलींस तीं पत्रें सारीं नीट!'

त्यानंतर कांहीं वेळ ते अगदीं स्तब्ध होते. अखेर एकदम ते त्याच्या-जवळ आले; व आपले दोन्ही हात त्याच्या खांद्यावर ठेवून इंग्रजींत उद्गारले, "आपल्या घराण्याचं राधानं घालवलेलं नांव पुढें चालवण्याची सारी जबाबदारी तुझ्यावर आहे आतां, प्रिया! माझ्या या उतारवयांत तूं तरी निराशा करतां कामा नयेस माझी!"

त्यांनीं कांपऱ्या आवाजांत उच्चारलेले ते शब्द त्याला आठवले आणि त्याच्या हृदयाचा थरकांप झाला.

त्यानंतर इतके क्षुब्ध झालेले त्यानें आजच पुन्हा पाहिले होते त्यांना.

आणि त्यांच्या त्या मनःक्षोभाचें कारणहि अगदीं उघड होतें.

गेलीं दहा वर्षें त्यांनीं ज्या आकांक्षा त्याच्याविषयीं आपल्या मनांत बाळगल्या होत्या आणि ज्या उद्देशानें गृहमंत्री असतांना त्याला आपल्या हाता-खालीं ठेवून सरकारी कामकाजाची प्रत्यक्ष माहिती करून दिली होती, त्या आकांक्षा आणि तो उद्देश यांचा आज त्यानें चक्काचूर केला नव्हता काय? त्यांनीं आपलें स्वतःचें आयुष्य सर्वच बाजूंनीं अत्यंत यशस्वी केलें होतें. पण पराक्रमी पुरुषांचें समाधान नुसतें त्यांचें स्वतःचें आयुष्य यशस्वी झाल्यानें होत नाहीं; त्या यशाची परंपरा आपल्या वंशजांनीं अधिक उज्ज्वलतेनें पुढें चाल-वावी, अशीहि त्यांची उत्कट इच्छा असते.—ती दहांची इच्छा सहा वर्षांपूर्वी राधानें धुळीला मिळविली, आज आपण तिच्या ठिकऱ्या उडविल्या आहेत.

स्वतःच्या कर्तृत्वाची परंपरा स्वतःच्या डोळ्यांदेखत खंडित झालेली पहाण्याचा प्रसंग हा कर्तबगार पुरुषाला मृत्यूपेक्षांहि अधिक दुःसह वाटत असतो.

या विचारांत गर्क असतांनाच तो बंगल्याच्या फाटकापाशीं येऊन पोंचला. त्यानें खालीं उतरून सायकलचा दिवा मालवला; व फाटकाची कडी काढतांना सहज समोर बघितलें—

तों त्याला भास झाला कीं बगीचाच्या अगदीं टोकाशीं असलेल्या बकुळीच्या झाडाच्या सांवलींत काजवे चमकत आहेत—

पण लगेच त्याच्या लक्षांत आलें,—ते काजवे नव्हते; तीं सिगारेटचीं तीन जळतीं टोकें होतीं.

बकुळीच्या सावलींत ते तिघे उभे असल्यानें त्याला काजवे चमकत असल्याचा भास झाला.

फाटक उघडून तो आंत आला व त्यानें तें पुन्हा लावून घेतलें.

आणि बकुळीखालीं कोण उभे आहे तें पहावें, या हेतूनें तो बंगल्याकडे न जातां बागच्या त्या कोपऱ्याकडे वळला.

पण, तो थोडा पुढें जातो न जातो, तोंच समोरून आलेल्या तरुणान त्याला म्हटलें—

" प्रिया, तूं आज लवकर कसा आलास इतक्या ?..."

" उमा, आणखी कोण होते तुझ्याबरोबर ते दोघे ? "

" जया आणि चारु-- "

" आणि अंधारांत बसून काय चाललं होतं तुमचं ? "

" तूं जें पाह्यलंस तेंच ! "

" उमा, ही उत्तर देण्याची रीत नव्हे !—आणि मला आलेला पाहिल्यावर ते दोघे परस्पर मागच्या फाटकानें कां गेले ? तूं त्यांना का जाऊं दिलेंस ? "

" त्याचं कारण तुला माहीत आहे, प्रिया ! "

" तुमचे हे सारे उद्योग जर काकांच्या कानांवर गेले, तर जड जाईल तुम्हांला हें फार ! मला कांहीं वर्तन पसंत नाहीं त्या मुकर्जीचं—"

" तूं जें त्या मुकर्जींविषयीं बोलतोस, तेंच दद्दा तूं सत्याग्रहांत गेल्यावर तुझ्याविषयीं बोलतील ! दद्दांच्यापेक्षां तुझा मार्ग निराळा आणि तुझ्यापेक्षां आमचा निराळा ! "

" पण हा मार्ग शहाणपणाचा नाहीं, उमा—"

" प्रत्येक जण दुसऱ्याविषयीं हेंच बोलत असतो ! दद्दांना तरी तुझा मार्ग कुठं शहाणपणाचा वाटतो ? त्यांना सांगितलास तूं सत्याग्रहांत जाण्याचा आपला बेत ? काय म्हणाले ते ?—"

" अतिशय रागावले ते !—"

" अगदीं तूं जसा अलिकडे माझ्यावर रागावतोस तसे !—"

उमाकांत प्रियदर्शनच्या हातांतली सायकल घेत त्याला हंसत हंसत म्हणाला.

" उमा, मी पंडितजींना पत्र घालून कळवणार आहे तुझ्या डोक्यांत शिरलेलं हें नवं वेड—"

" तुझी निराशा होईल, प्रिया ! ते जरी स्वतःला कॉंग्रेसचे प्रचारक म्हणवीत असले, तरी मनानें आमचेच आहेत ते खरोखरी. "

ते दोघे बोलत बोलत बंगल्याजवळ येऊन पोंचले. त्याबरोबर गाण्याचे आर्तमधुर सूर त्यांच्या कानांवर पडले.

*वाटलें नाथ हो, तुम्हीं उतरतां खालीं*
*दे असहकारिता हाक तुम्हां ज्या कालीं*
*हंबरडा फोडी आर्त महात्मा जेव्हां*
*आघात झेलिले घोर उरावर तेव्हां*
*त्या यशें द्रवुनी गमे धांवला देवा*
*ऐकिली आर्त किंकाळी*

ते पायऱ्यापाशींच उभे राहून ऐकत होते. प्रियदर्शन कदाचित् मुळींच हलला नसता पण उमानें त्याला म्हटलें, " तुला वर जायचं नाहीं ? तूं वर

गेल्याशिवाय गाणं थांबायचं नाहीं ताईचं ! ती दिलरुबा घेऊन बसल्याला तास झाला असेल आतां--"

" तूं नाहीं चलत वर ? "

" नको. रात्र बरीच झाली आहे. मी सायकल ठेवतों- "

" -आणि बाहेर जातों. असंच कीं नाहीं ? रस्त्याच्या कडेला कुठं तरी एखाद्या पुलावर जया न् चारु वाट पहात बसले असतील तुझी !- "

" नाहीं रे ! मी आतां स्वस्थ झोंप घेणार आहे खोलींत जाऊन माझ्या-"

प्रियदर्शन पायऱ्या चढून व्हरांड्यांत आला व पायांतल्या चपला काढून आवाज न करतां हळूच वर गेला.

गाणें अद्याप थांबलें नव्हतें. त्याचे अत्यंत करुणपूर्ण सूर त्याच्या कानांवर आले.

*परि हाय ! कोणतें पाप आडव आलें ?*
*हा कपाळ फुटलें, संचित तें ओढवलें !*
*परतली माउली, स्वार्थानें अडवीलें*
*आशेची माती झाली !*

ते आर्त सूर ऐकत असतां त्याला वाटलें, आपलें हृदय भरून येत आहे. तो दारापाशींच थबकून तें भावगीत म्हणण्यांत तन्मय झालेल्या कांते-कडे पहात उभा राहिला.

टेबलावर ठेवलेल्या विद्युद्दीपाचा प्रकाश तिच्या अंगावर पडला होता. त्या उज्ज्वल प्रकाशांत मांडीवर दिलरुबा घेऊन कोचावर बसलेली गानमग्न कांता तिच्या दिलरुब्यावरून फिरत असलेल्या हातांची हालचाल जर त्याला दिसत नसती आणि मुखांतून निघणारे मधुर सूर जर त्याच्या कानांवर येत नसते, तर त्याला अत्यंत सुंदर शिल्पकृतीच वाटली असती ती एक ! तिच्याकडे बघितल्यावर त्याला नेहमींच वाटत आलें होतें कीं, नुसत्या सौंदर्यापेक्षां तिच्यांत कांहीं तरी विशेष, कांहीं तरी अनिर्वचनीय आहे. अष्टमीच्या चंद्रकलेसारखें अतिशय उंच

कपाळ, त्याच्या उंचपणाला शोभणारे विशाल काळेभोर डोळे, चेहऱ्याच्या लांबट-पणामुळें किंचित् मोठें वाटणारें रेखीव नाक आणि ओठांच्या आंत मुरडलेल्या आरक्त पाकळ्या—त्या सौंदर्यात मनाला मोहित करण्यापेक्षां स्वतःविषयीं आदर उत्पन्न करण्याचीच शक्ति जास्त नव्हती का? विशेषतः आपले डोळे पूर्ण विस्फारून तिनें पाहिलें असतां, पापण्यांच्या दाटपणामुळें एरवीं न जाणवणाऱ्या त्यांच्या तेजःछटा जेव्हां तिच्या मुखावर पसरत, तेव्हां तिच्या सौंदर्यापेक्षां बुद्धिमत्तेचेंच आकर्षण मनाला अधिक घडत असे. या वेळीं मात्र, कानांतील माणकांच्या कुंडलांची प्रभा गालांवर पडल्यामुळें तिच्या गौरवर्णातील फटफटीतपणा जसा लोपून गेला होता, तशीच तिच्या सौंदर्यांत एरवी भासणारी एक प्रकारची कठोरताहि संगीताच्या मार्दवामुळेंच बहुधा मावळून गेली होती. उलट, तिचे डोळे पूर्ण उघडलेले नसतां पापण्यांच्या दाटपणामुळें आंसवांनीं ओथंबलेले दिसावे अशी त्यांची ठेवण असल्यामुळें, त्या भावगीतांतील सारें कारुण्य तिच्या मुद्रेवर या वेळीं प्रकट झाल्यासारखें दिसत होतें.

तिची ती गानमग्न, करुण मूर्ति पाहून त्याच्या मनांत आलें—हिच्या आणि उमाच्या स्वभावांत किती फरक! ही जितकी गंभीर तितकाच तो थिल्लर, ही जितकी निश्चयी तितकाच तो चंचल. वास्तविक उमाकांत हा तिचा सख्खा भाऊ. पण त्याच्यापेक्षां आपल्याच स्वभावाशीं तिचा स्वभाव जास्त जुळता कां असावा? तिचा स्वभाव तिच्या आत्यासारखा,—आपल्या आईसारखा तर नाहीं? आईनें आपल्यावर अलोट प्रेम केलें, पण हुकमतहि अतिशय गाजवली. तिनें आपल्याला शिक्षणासाठीं विलायतेंत राहूं दिलें नाहीं; कांता आज आपल्या कायदेभंगाच्या चळवळींत सामील होण्याच्या आड येत आहे. स्त्री ही काय पुरुषाच्या जीवनांतील त्याच्या साहसी वृत्तीला पायबंद घालणारी प्रतिबंधक शक्ति आहे? आपली आई बोलून चालून अशिक्षित होती. पण कांता,—बी. ए. पर्यंत शिकलेली आणि स्त्रियांच्या साऱ्या चळवळींत भाग घेणारी कांता, तिची सुद्धां दृष्टि संसारापलिकडे, कुटुंबाच्या स्वास्थ्याच्या आणि घराण्याच्या प्रतिष्ठेच्या पलिकडे जाऊं नये का? स्त्री आणि स्त्रीचें प्रेम हे काय केवळ निसर्गाचे पुरुषाला कुठल्या तरी एका रूढ परिस्थितीला जखडून ठेवण्याचे मृदुसूक्ष्म पाश आहेत?—

तो या विचारांत गर्क असतांनाच तिचें गायन थांबलें आणि दिलरुबा बाजूला ठेऊन ती सज्जांत जाण्यासाठीं उभी राहिली.

त्याबरोबर त्यानें हळूच आंत येऊन हांक मारली--

"कांता!—"

त्याचा आवाज कानांवर पडतांच ती दचकून मागें वळून उद्गारली, "हें काय? तुम्ही केव्हां आलांत?—"

"असहकारितेच्या अपेशावरलं तें रडगाणं तूं म्हणत होतीस तेव्हां!—"

तो अगदीं तिच्याजवळ गेला; व तिचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन म्हणाला, "कांता, आजच तुला हें तांब्यांचं भावगीत कां म्हणावंसं वाटलं?"

"आज सकाळपासून आपण सारखी गांधींच्या नव्या चळवळीसंबधीं बोलत आहों. तुम्ही गेल्यावर मला दहा वर्षांपूर्वी घडलेल्या प्रसंगाच्या आठवणी राहून राहून येत होत्या. त्यामुळं मन अतिशय बेचैन झालं माझं; न् कांहीं तरी विरंगुळा वाटावा म्हणून दिलरुबा घेऊन बसलें होतें मी!"

"भावनोत्कट कवीनं एखादी चळवळ फसल्यावर देवाच्या नांवानं टाहो फोडावा हें ठीक आहे, कांता! पण तुला तो टाहो आळवीत बसण्याची बुद्धि व्हावी—"

"हें साहाजिक आहे अगदीं! स्त्रीचं जीवन भावनामय असतं. तुम्ही पुरुष ज्या एकाद्या गोष्टीचं रहस्य शास्त्रीय दृष्टीनं उलगडण्याचा प्रयत्न कराल, त्याचा उलगडा स्त्री भावनेच्या दृष्टीनं करीत असते! आपला भावी पति आंधळा आहे हें कळल्याबरोबर स्वतःच्या हातांनीं स्वतःच्या डोळ्यांवर पट्टे बांधून घेऊन आजन्म अंधत्व पत्करणारी गांधारी ही जीवनाकडे पाहण्याच्या स्त्रीच्या दृष्टीचं प्रतीक आहे मूर्तिमंत! स्त्री आणि कवि यांची सारखीच असते जगाकडे पहाण्याची दृष्टि!"

"पण कवीच्या असल्या भाबड्या दृष्टीनं जगाकडे पहाणं चुकीचं आहे, कांता! त्यामुळं कोणत्याहि साहसांत उडी घ्यायला मन कचरतंन् दैववादाच्या आहारीं जातं—"

"कुणाला ठाऊक तुमची शास्त्रीय दृष्टि चुकीची आहे की आमची भावनेची दृष्टि चुकीची आहे तें! पण, तुम्हीं सुद्धां आज जे या नव्या चळ-

वळींत भाग घ्यायला तयार झालां आहांत ते भावनेच्याच भरीं जाऊन नव्हे का ? गांधींच्या तत्त्वांवर तुमचा तरी विश्वास कुठं आहे ?—"

"नसेल ! पण या चळवळीमुळं दुसरं जरी कांहीं झालं नाहीं, तरी लोकांची निर्भयता न् झगडण्याची शक्ति वाढेल, हें काय थोडं आहे ?"

"आणि एवढ्याचसाठीं तुम्ही या चळवळींत उडी घेणार आहां ?"

"होय. वाटल्यास तसं समज तूं ! पारतंत्र्याचा नायनाट करण्याच्या चळवळींत तत्त्वांचा प्रश्न नसतो. कारण पारतंत्र्य नष्ट करण्याची बुद्धि जागृत होणं,—त्यासाठीं वाटेल तो त्याग करायला आणि पडतील ते कष्ट भोगायला बहुजन–समाजाचं मन तयार होणं हाच आज मुख्य प्रश्न आहे—"

"मग उमाला तुम्ही नांव का ठेवतां ? त्याच्या साहसी कल्पनांची उडी गांधींच्याहि पलिकडची आहे !"

"पण साहसासाहसांतहि व्यवहार्यता पहावी लागते, कांता ! गांधींचा कार्यक्रम असा आहे कीं, त्याचं आचरण कोट्यवधी लोकांना उजळ माथ्यानं करतां येईल ! तसं उमाच्या कल्पनांचं आहे का ? आज जर जास्त आवश्यकता कशाची असेल, तर ती सरकारच्या नजरेला नजर देऊन उजळ माथ्यानं जास्तींत जास्त झगडण्याची प्रवृत्ति लोकांत उत्पन्न करण्याची आणि तोहि झगडा असा कीं, ज्यांत जास्तींत जास्त लोक उत्साहानं सामील होऊं शकतील, त्या झगड्याचं आव्हान अगदीं सामान्य माणसाच्या हृदयाला सुद्धां उत्कटतेनें होऊं शकेल ! अशा प्रकारचा झगडा गांधी सुरू करीत आहेत म्हणून त्यांत सामील व्हायचं—"

"आपला हा विचार सांगितलात तुम्ही दद्दांना ?"

"हो."

पण हें उत्तर देतांना प्रियदर्शनच्या आवाजांतील सारा आवेश अगदीं ओसरून गेला होता.

"मग काय म्हणाले ते ?"

"ते अतिशय संतापले, कांता !—त्यांनीं तुला भेटीला बोलावलं आहे—"

"मी भेटीला जाऊन काय करणार ?"

" कदाचित् ते तुला सांगणार असतील मी सत्याग्रहांत जाऊं नये म्हणून माझं मन वळवायला—"

" व्यर्थ आहे तो प्रयत्न, असं कां नाहीं सांगितलं तुम्ही त्याच वेळीं दद्दांना ? पुरुष ज्या वेळीं एकाद्या हट्टाला पेटतात, तेव्हां स्त्रीचे समजुतीचे किंवा विनवणीचे शब्द निरुपयोगी ठरत असतात त्यांना आळा घालायला ! जलवेलीचं काम फक्त पाण्याच्या प्रवाहाला आपल्या फुलांनीं शोभा आणण्याचं असतं. तो प्रवाह जेव्हां पुरानं तुफान होऊन सैरावैरा धांवायला लागतो, तेव्हां त्याला आवरण्याची आशा धरण्याऐवजीं स्वतःच छिन्नविच्छिन्न व्हायला तयार झालं पाहिजे तिनं ! साहसी पुरुषांच्या आयुष्यांत स्त्री ही केवळ शोभेची वस्तु आणि उपभोगाचा विषय असतो एक—"

" असं कां भलतंच बोलतेस तूं, कांता ? " प्रियदर्शन तिच्या तोंडावर हात ठेवून म्हणाला, " मी तुझ्याकडे अशा दृष्टीनं कधीं तरी पाहिलंय ? तुझ्या विचाराबाहेर मी कधीं तरी गेलोंय का ? "

" आजपर्यंत प्रसंगच आला होता कधीं तसा ? "

" असं कां म्हणतेस ? तीन वर्षांपूर्वीं दद्दांनीं जेव्हां मला सरकारी नोकरींत येण्याचा आग्रह केला, तेव्हां तूं सुद्धां अनुकूल होतीस प्रथम त्यांच्या त्या विचाराला—"

" होय. पण सरकारी नोकरींत शिरून रूढ मार्गानं एका विशिष्ट मर्यादेपर्यंत वर चढण्यापेक्षां स्वतंत्रपणानं कर्तबगारी गाजविणारांच्या महत्त्वाकांक्षेला अधिक मोठं क्षेत्र मिळतं असं जेव्हां तुम्ही मला दद्दांचंच उदाहरण दाखवून पटवून दिलंत तेव्हां मीच जाऊन तुमच्या वतीनं बोललें नाहीं का त्यांच्याशीं ? —पण तो प्रसंग निराळा न् हा निराळा !—"

" तूं थोडा व्यापक दृष्टीनं विचार केलास, तर तुला निराळेपणा जाणवणार नाहीं हा फारसा ! दद्दांनीं ज्या परिस्थितींत आयुष्याला सुरवात केली, त्या वेळीं जीवित आणि राजकारण यांच्या विषयींच्या कल्पना निराळ्या होत्या, आजच्या निराळ्या आहेत. हिंदी माणसाला गृहमंत्रिपद गांठतां येतं हीच मुळीं त्या वेळीं एक क्रांतिकारक घटना समजली जात असे ! आज आपण अशा

परिस्थितींत आहों कीं, आपल्या राजकीय आकांक्षांचं क्षितिज असल्या कोण-त्याहि एका क्षुद्र लाभावर टेकलेलं नाहीं. जीवित आणि राजकारण यांच्या विष-यींच्या कल्पना जशा बदलल्या, तसेंच त्यांना अनुसरण्याचे मार्गहि बदलले. तूं जर थोडा विचार केलास तर तुला त्या वेळीं जसं माझं म्हणणं पटलं, तसंच याहि वेळीं पटेल.—मला केवढी आशा होती, कांता, तूं जाऊन दद्दांचा माझ्या-विषयींचा राग कमी करशील म्हणून ! ”

“ मी काय सांगूं जाऊन त्यांना ? भाऊजींच्या त्या तसल्या वर्तनामुळं घराण्याचा लौकिक राखण्याच्या बाबतींत त्यांची सारी भिस्त तुमच्यावर आहे आतां—”

“ हा तुझा समज चुकीचा आहे, कांता! राघा परत आल्यापासून गेल्या तीन वर्षांत पुष्कळ निवळलंय् वर्तन त्याचं—”

“ त्याचं वर्तन निवळलंय् कीं नाहीं हें तुम्ही वहिनींना विचारून पहा एकदां आपल्या !—पहांटे तीनच्या आंत ते कधीं तरी घरीं येतात का ? न् आल्यावर त्यांना एक शब्द तरी नीट बोलायची शुद्ध असते का ? खरोखरी असलीं दुःखं बायकांनींच सोसावींत निमूटपणानं !—दद्दा बोलत नाहींत. पण त्यांना माहित आहे हें सगळं. अशा स्थितींत तुम्ही कायदेभंगाच्या चळवळींत पडावं हें कसं बरं वाटेल त्यांना ? तुमच्या या कृत्यामुळं तुमचं न् तुमच्या बरोबर साऱ्या घराचं अकल्याण होणार आहे—”

“ घर ! बायकांना घरापलिकडे दिसतंय का कधीं दुसरं कांहीं ?—”

“ पण त्यामुळें पुरुषांना केव्हांहि डोकं टेकायला हक्काचा आसरा मिळतो ना ?—”

“ पण घराला तुरुंगाचं स्वरूप येतं स्त्रियांच्या या वृत्तीमुळं, कांता ! ”

त्याचे ते शब्द ऐकतांच ती त्याच्या अगदीं जवळ गेली; व त्याच्या करुण दृष्टींत आपली स्निग्ध दृष्टि मिसळून म्हणाली—

“ माझा सहवास हा तुला खरोखरीच तुरुंगासारखा वाटतो का, प्रिया ? आजपर्यंत तुझ्या कोणत्या तरी विचाराच्यां आड मी गेलें आहे का कधीं ? अगदी लहानपणापासून, सागरला आपण आजोळीं एकत्र रहात होतों तेव्हांपासून

आठवण कर ! तुझी कड घेऊन मीं आत्याबाईशीं किती तरी वेळां रदबदली केली आहे—"

बोलतां बोलतां तिचे डोळे पाण्यानें भरून आले.

त्यानें तिला आपल्या सुदीर्घ बाहूनें लपेटून जवळ घेतली; व तिच्या त्या अवनत साश्रु नेत्रांना ओठांनीं हळूच स्पर्श करून तो म्हणाला—

" म्हणूनच मला वाटतं कीं, याहि वेळीं तूं माझी कड घ्यावीस न् दद्दांचं मन वळवावंस—"

" तुझा जर इतका आग्रहच असेल, तर माझी हरकत नाहीं, प्रिया ! मी उद्यां दद्दांना जाऊन भेटतें न् त्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न करतें. पण तूं तुरुंगांत गेल्यावर उमा माझं ऐकेल, माझ्या ताब्यांत राहील असं वाटतं का तुला ?—"

तिचा तो प्रश्न ऐकतांच त्याला मघांशीं बकुळीच्या झाडाखालीं बघितलेल्या त्या दृश्याचें स्मरण झालें.

आणि त्याच्या प्रसन्न मुद्रेवर एकदम विषादाची छाया पसरली.

# ४

# श्यामासुंदरी

श्यामासुंदरीचें मिष्टान्नभांडार हें बर्डी–धंतोलीच्या भागांत अनेक कारणांमुळें प्रसिद्ध होतें.

तिच्या भांगाची सिंदूरमंडित वक्ररेषा, डोळ्यांचे कज्जलयुक्त कटाक्ष किंवा तांबूलसेवनानें रंगलेल्या ओठांवरील मधुर हास्य यांपैकीं तिच्या रूपरचनेचा कोणता विशेष अधिक मोहक होता, हें सांगणें कठीण होतें. मिष्टान्नभांडाराच्या सर्वच आश्रयदात्यांना तिचें दर्शन घडत असे, असें नाहीं. त्या भांडाराचे दोन भाग होते. त्याच्या दर्शनी भागांतील कांचेच्या सुबक कपाटांतून निरनिराळीं मिष्टान्नें विक्रीसाठीं ठेवलेलीं असून, भांडाराचे चालक कृष्णकांत बसु हे तिथें एका मेजाजवळ बसलेले असत. भांडाराच्या अंतर्भागांत बंगाली पद्धतीचें जेवण किंवा उपाहार घेणारांची खास सोय केलेली होती. श्यामासुंदरीचा संचार याच भागांत होत असे; व लोकवार्ता अशी होती कीं, बर्डी–धंतोलीवरील कांहीं तरुण विद्यार्थी जे रात्रीं उपाहार करावयाला त्या भांडारांत नेमानें जात, ते कांहीं लवंगलतिका, रसमलई किंवा माच्छेर झोला यांच्या मिष्टतेवर लुब्ध होऊन नव्हे; तर श्यामासुंदरीच्या संभाषणाचा आनंद उपभोगण्याच्या उद्देशानें.

धंतोलीवर रहाणाऱ्या बंगाली भद्रलोकांचा त्या दोघांवर एका परीनें बहिष्कारच होता म्हटलें तरी चालेल; व श्यामासुंदरीला तर ते बंगाली म्हणावयालाहि तयार नव्हते. ते ती केव्हां बिहारी तर केव्हां उडिया असल्याचें भासवीत असत. श्यामासुंदरी ही कवयित्री होती. पण, ती आपल्या कविता

बंगालींतून न लिहितां हिंदींतून लिहित असे. या तिच्या हिंदी कवित्वाचा फायदा घेऊन तिच्यावर नाराज असलेल्या भद्रलोकांनीं तिला बिहारी ठरविलें होतें. तिच्याबद्दल दुसरा लोकप्रवाद असा होता कीं, ती कृष्णकांताची लग्नाची बायको नसून कुठून तरी पळून येऊन त्याच्या आश्रयाला राहिली होती. कृष्णकांताला गेलीं वीस वर्षें निरनिराळ्या परिस्थितींत पहात आलेले अनेक लोक नागपुरांत होते. श्यामासुंदरी ही मात्र तीन वर्षांपूर्वी एक दिवस अचानक त्याच्या भाडारांत लोकांच्या दृष्टीस पडली. ती कोठून आली किंवा त्या दोघांचे वास्तविक संबंध काय आहेत, याचा कोणालाच त्यांनीं पत्ता लागू न दिल्यामुळें, चौकस लोकांच्या अतृप्त राहिलेल्या जिज्ञासेनें नाना प्रकारच्या प्रवादांना जन्म दिला.

श्यामासुंदरीप्रमाणें कृष्णकांताच्याहि पूर्वचरित्राविषयीं लोक साशंक होते; व माणिकतोळ्याच्या कटांतील जे अनेक बंगाली तरुण नामांतर करून बेपत्ता झाले होते, त्यांपैकीं एक तो असावा अशीहि कुणकुण केव्हां केव्हां भद्रलोकांच्या अड्ड्यांतून कानांवर पडत असे. हा प्रवाद अगदींच निराधार नव्हता. महायुद्ध सुरू होण्याच्या सुमारास कृष्णकांत नागपूरला येऊन सर बिपिन बोस यांच्याकडे नोकरीला राहिला. त्यानंतर दोन वर्षांनीं, 'हॅरि अँड सन्स कंपनी'या नांवानें मानवेंद्र रॉयप्रभृति क्रांतिकारकांनीं रचलेल्या कटाचा परिस्फोट झाल्यावर, बंगालच्या सी. आय्. डी. खात्याचे दोन अधिकारी एक दिवस सकाळीं अचानक सर बिपिन यांच्या बंगल्यावर हजर झाले; व खिशांतून एका काळ्या सांवळ्या तरुण मुलाचा फोटो काढून, हा मुलगा आपल्या घरांत रहात असल्याचा आम्हांला वहीम असल्यामुळें, आपले सर्व नोकर आपण आमच्या समोर आणून उभे करावे, अशी मागणी त्यांनीं सरसाहेबांजवळ केली. सर बिपिन नेमस्त खरे, पण त्यांच्या वैयक्तिक मानापमानाच्या कल्पना फार हळव्या होत्या. एका क्रांतिकारकाला आपण घरांत आश्रय दिला असल्याचा संशय पोलिसांनीं आपल्यासारख्या राजनिष्ठ पुढाऱ्याविषयीं घ्यावा, ही गोष्ट त्यांना सहन झाली नाहीं; व आपल्या नोकरांना पोलिसांपुढें उभें करण्याचें त्यांनीं साफ नाकारलें. शेवटीं हें प्रकरण त्या वेळचे चीफ कमिशनर सर बेंजामिन रॉबर्टसन यांच्यापर्यंत गेलें. पण, सर बिपिन यांच्या राजनिष्ठेचा महिमा असा विलक्षण कीं, "माझ्या घरीं राजकीय दृष्ट्या संशयित

चारित्र्याचा मनुष्य असणेंच मुळीं शक्य नाहीं," या त्यांनीं काढलेल्या उद्गारांवर विश्वास ठेवून, सर बेंजामिन यांनीं त्या बंगाली अधिकाऱ्यांना वाटेस लाविलें.

सर बिपिन यांच्याकडे कांहीं वर्षें नोकरी केल्यानंतर, त्यांच्याकडून थोडेंसें भांडवल घेऊन, कृष्णकांतानें हें भांडार काढलें; व अशा रीतीनें स्वतंत्र जीवनाला सुरवात केली. त्याची स्वामिभक्ति इतकी उत्कट होती कीं, त्याच्या भांडाराच्या दर्शनी दालनामध्यें आंत पाऊल ठेवल्याबरोबर दृष्टीस पडावें अशा तऱ्हेनें सर बिपिन यांचें सुंदर तैलचित्र लाविलेलें होतें. दुर्गापूजा आणि नाताळ या दोन्ही सणांच्या वेळीं त्याच्या भांडारांत तयार होणाऱ्या उत्कृष्ट मिठाईच्या डाल्या सर-साहेब आणि त्यांचे पुत्रपौत्र यांच्याकडे नियमानें जात असत. त्याच्या चारित्र्या-विषयीं जरी भद्रलोक साशंक होते, तरी त्याचें भांडार मात्र रात्रीं दहा वाजेपर्यंत गजबजलेलें असे; व स्थूलोदरावरून घसरणारें पोकळ धोतर सांवरीत आणि बंगाली उच्चारांत हिंदी भाषा बोलत इकडून तिकडे तुरुतुरु फिरणारी त्याची ती डुबरी मूर्ति पाहून गिऱ्हाइकांना मोठी गंमत वाटे.

रीजंटमधून सुटलेल्या पांच सहा विद्यार्थ्यांचें टोळकें ज्या वेळीं मोठ-मोठ्यानें बडबडत भांडारामध्यें शिरलें, त्या वेळीं समोरच्या खुर्चीवर बसलेला कृष्णकांत पेंगत होता.

त्यांपैकीं एका विद्यार्थ्यानें त्याला विचारलें, "मॉशय, जेवणाची सोय होईल का आमच्या ?"

त्यावर कृष्णकांतानें किंचित् खेदयुक्त आवाजांत म्हटलें, "माफ करा, दहा वाजायला आले आतां. भांडार बंद व्हायचीच तर वेळ झाली—"

तेव्हां दुसऱ्या एका वात्रट विद्यार्थ्यानें कानोसा घेतल्यासारखें करून म्हटलें, "मॉशय, आंतून तर कांट्या–चमच्यांचा आवाज येऊन राहिला आहे !—"

"हां हां, खरी गोष्ट !" महाशय यत्किंचितहि न वरमतां उद्गारले. "आंत स्पेशल ऑर्डरच्या मंडळीचं जेवण चालू आहे. तेंहि संपेलच इतक्यांत—"

त्याबरोबर ते विद्यार्थी नाराज होऊन बाहेर पडले. रस्त्यावर येतांच त्यां-तला तो वात्रट विद्यार्थी म्हणाला, "श्यामासुंदरीच्या दर्शनाचा योग आज

बहुतां आपल्या नशिबीं ! जसजसा हा ढेरपोटच्या म्हातारा होत चालला आहे, ततसा श्यामासुंदरीवरला पहारा वाढतोय त्याचा—"

त्या विद्यार्थ्यानें अंदाजानें म्हटल्याप्रमाणें खरोखरीच भांडाराच्या अगदीं आंतल्या दालनांत या वेळीं चार तरुण उपाहार करित होते; व टेबलाभोंवतीं मांडलेल्या खुर्च्यांपैकीं मधल्या खुर्चीवर बसून श्यामासुंदरी त्यांच्याशीं गप्पा मारीत होती.

" मग तुम्हीं आमच्या परिषदेला हजर सुद्धां नाहीं रहाणार का, दिदी ? "

" हजर राहीन कदाचित्; पण म्हणणार मात्र नाहीं कांहीं—"

" माझी तर फार इच्छा आहे तुम्हीं ' चांद ' मध्यें आलेली आपली ती नवीन कविता आमच्या परिषदेंत गाऊन दाखवावी अशी—"

" तुझा आग्रह कां इतका निशी, त्यांची इच्छा नसतांना ?—"

" आग्रह वास्तविक आहे अगदीं, उमा ! नागपुरांतील युवकांचं पद्धतशीर संघटन करण्याचा पहिलाच प्रयत्न आहे आमचा हा. त्याला आरंभापासून क्रांतिकारक वळण लागावं म्हणून मुद्दाम कमलादेवींना अध्यक्ष केलंय् आम्हीं; न् या तर आमच्या परिषदेला हजर राह्यलाहि तयार नाहींत—"

" आणि त्यांचा असल्या परिषदांवर विश्वास नसला तर ? " जयानें मध्येंच विचारलें.

" तसं स्पष्ट सांगावं त्यांनीं. पण तेंहि त्या सांगत नाहींत. काय दिदी, तुम्हांला या परिषदेचा कांहींच उपयोग नाहीं असं वाटतं का ?"

" उपयोग करून घ्यायचा म्हटला, तर घेतां येण्यासारखा आहे. पण तुमच्या कार्यकारिणींत त्या दृष्टीचीं माणसं कुठं आहेत ? जयसिंगानं म्हटलं तें खरं आहे. हा दृष्टिकोनाचा प्रश्न आहे—"

" तुम्हांला अजूनहि वाटतं तुमच्या त्या गुप्त कटाच्या मार्गानं देश स्वतंत्र करतां येईल असं ? मूठभर मध्यमवर्गीय तरुणांच्या चोरटच्या अत्याचारी कार्यपद्धतीवर अजूनहि विश्वास आहे तुमचा ? तुमच्या चळवळीच्या गेल्या वीस वर्षांच्या इतिहासावरून जर कोणती गोष्ट निर्विवाद सिद्ध झाली असेल, तर ती ही कीं, देशांतील सर्व जनसमूहाला ज्यांत सामील होतां येत नाहीं, असा

दुरवडे आणि अत्याचार यांच्यासारख्या तुरळक कृत्यांनीं देश स्वतंत्र होणें अशक्य आहे. देशाला दास्यमुक्त करण्याचा मार्ग व्यक्तिगत अत्याचार हा नव्हे; तर सामुदायिक क्रांति हा आहे. मग ती सशस्त्र होवो वा निःशस्त्र होवो!"

" तुरळक अत्याचारांनीं देश स्वतंत्र होणं अशक्य आहे हें आम्हांला समजत नाहीं असं नाहीं; न् तुरळक अत्याचारांवर संतुष्ट रहाण्याचा आमचा विचारहि नव्हता. महायुद्धाच्या आरंभीं जतीन, नरेंद्र, जयगोपाळ प्रभृतींनीं बंडाच्या उठावणीचा जो प्रयत्न जर्मनीच्या पाठिंब्याच्या आशेवर केला, त्याला काय तुम्ही तुरळक अत्याचार म्हणाल ? ज्या आयर्लंडांतील सिनफेनांच्या चळवळीचे तुम्हीं एवढे पोवाडे गात असतां तिच्यांतसुद्धां गुप्ततेचा आणि अत्याचारांचा भाग होताच कीं नाहीं ? कायद्याचीं सगळीं बंधनं पाळून सामुदायिक क्रांतीला देश तयार करण्याची भाषा जे बोलतात, त्यांना क्रांतीचीं तत्वंहि समजलीं नाहींत न् मार्गहि माहित नाहींत—"

बोलतां बोलतां श्यामासुंदरीचे लांबट, मीनाकृति डोळे विस्फारित होऊन त्यांत विजेची चमक खेळूं लागली; व अंचलाच्या अग्राला बांधलेल्या किल्ल्यांच्या जुडग्याशीं इतका वेळ खेळत असलेले तिचे मेंदीनें रंगविलेले लहान नाजूक हात तो चाळा थांबवून एकांत एक घट्ट आंवळले गेले.

ते चारी तरुण तिच्याकडे विस्मयानें आणि उत्कंठेनें पहात होते. पण तिच्या दृष्टींत मात्र एक प्रकारची शून्यता, शोकसंमिश्र शून्यता उत्पन्न झाली होती. जणुं कांहीं एकादें अघोर दृश्य तिच्या त्या विस्फारलेल्या, कसल्या तरी दीप्तीनें तांबारून धगधगणाऱ्या डोळ्यांना दिसत होतें. त्या दीप्तींत शोक होता; पण करुणाची कोमलता मात्र नव्हती. प्रतिकार करण्याचा प्रयत्न यशस्वी न होतां उलट प्राणांतिक जखमा होऊन पडलेल्या नागिणीच्या जिवाची तडफड त्या शोकांत सांठविलेली होती. इतका तो शोक निष्करुण, दाहक आणि मूक होता.

तिचें तें त्वेषपूर्ण मौन त्यांना असह्य झालें.

आणि उमा हळूच तिला म्हणाला, " दिदी, हा प्रश्न ज्याच्या त्याच्या विश्वासाचा आहे. निशीचा जर आपल्या विचारांवर आणि मार्गावर विश्वास नसेल—"

" मी विश्वास नाहीं असं म्हणत नाही—"

" फक्त तसं पर्यायानं बोलून दाखवितो आहेस—"

" छगन, मला पुरतं बोलूं तर देशील ! दिदी, तुमच्या मनाला लागण्यासारखं कांहीं मी बोललों असेन तर क्षमा करा मला—"

" क्षमा कसली करायची त्यांत ? सध्यांचं युग सत्य आणि अहिंसा यांच आहे ! तुम्हांला महाभारतांतला प्रसंग आठवतो का तो ? अज्ञातवासाला निघतांना पांडवांनीं आपलीं शस्त्रास्त्रं शमी वृक्षाच्या ढोलींत लपवून ठेवलीं होतीं. आज गांधीजींच्या विरुद्ध बोलण्याची कोणाची हिंमत आहे ? तेव्हां अशा स्थितींत गप्प बसणं हेंच बरं नाहीं का खरोखरी ? मी हजर राहीन तुमच्या परिषदेला, निशी !—म्हणजे युवकसंघाच्या चळवळीचं स्वरूप तरी कळेल एकदां काय आहे तें—"

तिच्या त्या उद्गारांतला उपरोध त्यांना बोंचल्याशिवाय राहिला नाही; व छगन तिला शांत करण्याच्या उद्देशानें म्हणाला—

" दिदी, तुम्हीं गाणं म्हणाल ना तें ? "

" कोणतं ? मी परिषदेंत म्हणावं असा निशीचा आग्रह चाललाय तें का ?—"

" नाहीं. तुमच्या भाईनं फांसावर जातांना म्हटलं तें बंगाली गीत—"

" आजपर्यंत किती तरी वेळां ऐकलंय् तुम्हीं तें—"

" होय. पण आपल्या आतांच्या बोलण्यामुळं वीरेंद्र बाबूंच्या वीर-मरणाचा तुम्हीं अनेकदां वर्णन केलेला तो रोमांचकारी प्रसंग डोळ्यापुढं उभा राहिला न् तें गाणं ऐकावंसं वाटलं, " छगनलालनें उत्तर दिलें.

" त्या गीतांत इतकी दिव्यता आणि स्फूर्ति भरलेली आहे कीं, तें कितीहि वेळां ऐकलं तरी पुन: ऐकावंसं वाटेल ! " उमा म्हणाला, " तुमच्या मनाला जर त्रास होण्यासारखा नसेल, तर—"

" छे, छे ! त्रास कसला आला आहे त्यांत ? तें गीत म्हटल्यावर माझं मन कितीहि होरपळलेलं न् चाळवलेलं असलं, तरी शांत होऊन जातं एकदम; एक प्रकारचा धीर येतो त्याला पुन्हां– "

आणि आपल्या किंचित् किनऱ्या पण भेदक आवाजांत तिनें तें गीत म्हणायला सुरवात केली.

*स्वदेशेर धूलि स्वर्णरेणू बोलि,*
*देखो रेखो मने एई ध्रुव ज्ञान*
*जाहार सलिले मंदाकिनी ढाले*
*मलय मारुत सदा वहमान*
*पितामहोदेर अस्थिमज्जाजात*
*धूलिरूपे आछे इहाते मिश्रित*
*एहि धूलिहोवे हबेरे उत्थितो*
*भाविकालजात भविष्य संतान ॥१॥*
*कंसकारागारे देवकीर मत*
*कक्षेबंदी पाषाणलोहशृंखलित*
*मातृभूमि तव रोएछे पतित*
*परिचय तूमि ताहार संतान ॥२॥*
*कोरिबो रोपन मोरा अभिमाने*
*स्वाधीनतालता निज रक्तदाने*
*शुकाते दिओना सिंचि प्राणपणे*
*करो सावे निज आत्मबलिदान ॥३॥*

त्या गीताचा शेवटला भाग म्हणत असतां तिचे डोळे पाण्यानें भरून आले; व ओथंबलेल्या आभाळांतून जसे पावसाचे चार दोन टपोरे थेंब पडावे, त्याप्रमाणें त्यांतून दोन तीन आंसवें ठिबकलीं.

तिचें गायन संपलें, त्या वेळीं पूर्ण शांतता पसरलेली होती. जणुं कांहीं, त्या गीतांतून व्यक्त झालेल्या भावनांनीं इतर सर्व भाव निशब्द करून सोडले.

कांहीं वेळानें छगन म्हणाला, " मग जाऊं या, निशी, आतां आपण? तूं चलतोस, उमा, आमच्याबरोबर ? "

" चलूं या. पण कुठं जाणार आपण?" त्यानें जयाकडे पहात विचारलें.

जयानें काय खूण डोळ्यानें केली कोण जाणें. पण उमा लगेच खुर्चीवरून उठला.

त्याबरोबर छगन त्याला म्हणाला, ' तें बाहेर पडल्यावर ठरवूं. जातों आम्ही, दिदी– "

ते तिघे तिला नमस्कार करून बाहेर पडले.

ते बाहेर जातांच जयसिंगानें श्यामासुंदरीचा हात घट्ट धरला; व तो म्हणाला, ' श्यामा, किती लवकर भान जातं तुझं ? "

" त्या हत्येचं स्मरण रात्रंदिवस जळतंय माझ्या मनांत! लेनिनला आपल्या भावाच्या खुनानं क्रांतिकारक बनवलं असं तूंच नव्हतं का सांगितलंस मला? तूं तरी दोष देतां कामा नयेस मला या बाबतींत. "

" दोष देण्याच्या दृष्टीनं नाहीं बोललों मी हें! पण इतकं भावनावश होणं शोभंत नाहीं तुला! बरं, पण कांहीं पत्र आलंय का जयंताचं ? "

" हो, मी वाटच पहात होतें निशी न् छगन उठून जाण्याची."

तिनें ब्लाऊझच्या आंतल्या खिशांतून पत्र काढून त्याच्या हातांत दिलें.

जयसिंग तें पत्र वाचीत असतां ती चारूला म्हणाली, " मग पिस्तुलं मिळालीं का तुम्हांला ? "

" नाहीं अजून. शिवकुमारावर सोंपवलंय तें काम आम्हीं."

" पण हें धाडस अंगलट आलं तर ? "

" नाहीं यायचं. बापाला कधीं तरी स्वतःच्या मुलाचा संशय येईल का?"

" येईलहि कदाचित्. तुला माहितच आहे आमच्या साहेबांना कांहीं मी तुझ्याशीं स्नेह ठेवलेला आवडत नाहीं." जयसिंगानें तें पत्र चारुचंद्राच्या हातांत

देतांना हंसत हंसत म्हटलें, " शिवाय तें नाहीं जमलं तरी चालण्यासारखं आहे आपलं. जयंताकडून उद्यांच पेटारा येणार आहे. "

" पण तो पेटारा फोडला किंवा तपासला जाणार नाहीं अशी खात्री आहे तुझी ? "

" हो. ए. डी. एस. पी. च्या मुलाच्या नांवानं येणारं पार्सल फोडून पाहाण्याची कुणाची हिंमत आहे ? "

" शिवकुमाराची चोरी पचूं शकणार नाहीं न् तुझं पार्सल मात्र तपासलं गेल्याशिवाय येईल ? मला पटत नाहीं हा तर्कवाद ! "

" बापाच्या खाजगी खोलींत बायको व मुलगा यांच्याशिवाय कोण जाऊं शकणार ? म्हणून मला वाटतं शिवकुमारानं ती गोष्ट करूं नये. त्याच्या पिताजींना लगेच संशय येईल त्याचा ! तसं पेटाऱ्याचं नाहीं. शिवाजी महाराजांच्या काळापासून चालत आलेली आहे ही पेटाऱ्याची युक्ति. "

" मला स्वतःला फार धोक्याचे वाटतात तुमचे हे मार्ग—"

" धोका नाहीं कोणत्या मार्गांत ? " चारूनें तें पत्र तिला परत देतांना म्हटलें, " क्रांतीचा सारा मार्गच मुळीं धोक्याचा न् धाडसाचा आहे. शिवाय यश नच आलं, तरी त्याचंहि कांहीं दुःख नाहीं मोठंसं—"

" तुम्हांला नसेल. पण मला आहे. मामावर देशोधडीला लागून हलवायाचं दुकान काढण्याची पाळी आली; भाई ऐन तारुण्यांत फांसावर गेला; न् आई त्याच्या वियोगानं झिजून पिचून मेली. आमच्या साऱ्या कुटुंबाची अगदीं वाताहत होऊन गेली या क्रांतिवादामुळं !—माझ्यांत आतां आवडत्या माणसांचं मरण पाहण्याची शक्ति उरलेली नाहीं, चारु !—"

तिचे डोळे पुन्हा पाण्यानें भरून आले.

" दिदी, तुला इतकं संशयी न् निराश होण्याचं कारण नाहीं. रक्ताचा मोबदला रक्तानं घेतला जाईल न् मगच आम्ही फांसावर जाऊं—"

# ५

# द्वौ आचार्यौ जटिलकुटिलौ

' केव्हां आलांत स्वामीजी आपण ? " जयसिंगानें आश्चर्यानें विचारलें. त्या आश्चर्याच्या भरात त्याच्या ही गोष्ट लक्षांत आली नाहीं कीं, ज्या व्यक्तीला आपण प्रश्न विचारला ती ध्यानमग्न असून तिचे डोळे मिटलेले आहेत.

तो जिमखान्यावरून टेनिस खेळून उमाला भेटण्यासाठीं तिथें आला होता. बंगल्याच्या आवारांत शिरल्याबरोबर उजव्या हाताला असलेल्या सुबक दगडी चौथऱ्यावर अशोकाच्या झाडाखालीं बसलेली स्वामीजींची ती ध्यानस्थ मूर्ति त्याच्या दृष्टीस पडली. त्यांच्या काळ्या सांवळ्या, पीळदार शरीरयष्टीवर हिवाळ्यांतील बालसूर्याचें कांहीं वेळ तरी सुखोष्ण वाटणारें फिकट ऊन पडलें होतें; व अकालीं पिकलेल्या केसांत जी एक चमत्कारिक रुपेरी चमक असते, तिच्यामुळें त्यांच्या खांद्यावर लोळणाऱ्या करड्या जटा आणि छातीवर रुळणारी दाढी यांतील पांढरे केंस त्या उन्हांत चमचम करीत होते. त्यांच्यापुढें असलेल्या चांदीच्या छोट्या डबीवर दुर्वांची जुडी ठेवलेली होती.

तो प्रश्न विचारल्यावर जया आदरभावानें थबकला. तोंच स्वामींनीं डोळे उघडून त्याच्याकडे स्मितपूर्वक पाहिलें; व हातानें त्याला थोड्या वेळानें येण्याची खूण केली.

त्यांना अभिवादन करून हातांतील टेनिसची रॅकेट गरगरा फिरवीत तो झपझप पायऱ्या चढून व्हरांड्यांत आला. तों समोरच्या दिवाणखान्यांत मधोमध ठेवलेल्या प्रशस्त टेबलाभोंवतीं बसून मंडळी प्रातरुपहार ( *Break-fast* ) करित असल्याचें त्याला दिसलें.

" केव्हां आलांत पंडितजी आपण ? आतांच सभेमध्यें स्वामीजींचं दर्शन घडलं अन् इथं आलों तों आपण बसलेले ! एकाच वेळीं दोघां आचार्यांच्या दर्शनाचा योग कसा काय आला बुवा आज हा ?—"

जयाला हा प्रश्न विचारावासा वाटावा अशा तऱ्हेचा फरक त्यानें पांच मिनिटांच्या अंतरानें पाहिलेल्या त्या दोन व्यक्तींत खरोखरीच होता. स्वामीजींची ती कृश, उघडी आणि जटिल मूर्ति बघून हिवाळ्यांत पालवी झडून जाऊन निष्पर्ण झालेल्या झाडाची आठवण होत असे. उलट पंडितजींचें गौरवर्ण, धिप्पाड शरीर, टक्कलांत मिसळून गेलेलें उंच कपाळ, पोपटी रंगाचे चपटे उग्र डोळे, गुळगुळीत रुंद चेहऱ्यावर खेळणारें आत्मप्रत्ययाचें हास्य,——अनेक वादळें आणि गारठा यांना टक्कर देत आपल्या निळसर गर्द पर्णराजीनें आकाशाचा सतेज नीलिमा आत्मसात् करणाऱ्या प्रचंड आम्रवृक्षासारखी मूर्ति होती त्यांची ! त्यांनीं या वेळीं अंगांत घातलेल्या निळया रंगाच्या लोकरी वरकोटामुळें त्यांच्या शरीराची कांति आणि भव्यता खुलून दिसत होती. निराशेचे दारुण आघात त्यांनीं आपल्या आयुष्यांत कमी अनुभविले होते, असें नाहीं. पण, अंगावर आलेली लाट डोक्यावरून जाऊं देऊन ती फुटून पसरतांच तिच्या फेसावर हंसत मुखानें हात मारीत पोहणाऱ्या धाडसी माणसासारखी त्यांची वृत्ति होती.

स्वामीजी आणि पंडितजी यांच्यामधला हा एकंदर फरक लक्षांत घेऊन त्यांच्या एका उमरावतीच्या रसिक मित्रानें त्यांच्यावर पुढील श्लोक रचिला होता—

" द्वावाचार्यौ जटिलकुटिलावप्रबुद्धातिबुद्धौ
कृष्णाकृष्णौ तनुपृथुतनू गूढवादप्रसक्तौ
तत्र ज्येष्ठो भवति कुटिलः शाख्यतंत्रप्रवीणः
पाश्चात्यानामगमदथ यः शिष्यतां तत्र वासात् "

हें वर्णन खरोखरीच अत्यंत मार्मिक आणि समर्पक होतें; व त्यामुळें वऱ्हाडांतील राष्ट्रीय पक्षाच्या अड्ड्यांतून हा श्लोक लोकप्रिय झाला होता. दोघांहि आचार्यांचें पूर्व चरित्र एका परीनें अद्भुत असून, एकाच पर्वताच्या कुशींत उगम

पावून कांहीं काळ समांतर प्रवास केल्यावर पुढं परस्परविरुद्ध दिशेनें वहात गेलेल्या नद्यांसारखी त्यांच्या आयुष्याची अवस्था आतां झालेली होती. दोघेहि समर्थ विद्यालयाचे विद्यार्थी; नाशिक कटांत सामील असल्याचा आरोप दोघांवरहि आला; व स्वामीजी तर कांहीं दिवस कच्च्या कैदेंतहि होते. पंडितजी मात्र पोलिसांच्या तावडींतून निसटून वेषांतर करून सीलोनला गेले. तेथें एका जपानी बोटींत कोळसे भरणाऱ्या मजुराचें काम मिळवून त्यांनीं प्रवेश केला; व ते जपानां- तून पुढें अमेरिकेला गेले. अमेरिकेंत त्यांनीं दहा वर्षें कशा रीतीनें घालविलीं, हें कधींच कोणाला कळलें नाहीं. पण, गद्दर पक्षाच्या क्रांतिकारक चळवळीशीं त्यांचा घनिष्ठ संबंध असावा, असा मात्र अनेकांचा समज होता.

पंडितजींच्या मानानें स्वामीजींचें चरित्र कमी साहसपूर्ण होतें. नाशि- कच्या कटाच्या खटल्यांतून सुटल्यावर ते अण्णासाहेब पटवर्धनांचा उपदेश घेऊन सप्तशृंगीला गले. सामान्य बुद्धीला अगोचर अशा तपस्येच्या आत्मिक बलानेंच झाला तर या अभागी देशाचा उद्धार होईल, अशी त्यांची भावना झाली; व त्या भावनेनें त्यांनीं बारा वर्षें सप्तशृंगीवर दुर्धर अनुष्ठान केलें. पुढं तेथून पांदिचरीला जाऊन अरविंदबाबूंच्या आश्रमांतहि ते वर्षभर राहिले होते. त्यानंतर एक वर्ष त्यांचा अजिबात पत्ता नव्हता. अशा रीतीनें चवदा वर्षें वनवासांत काढल्यावर उमरावतीस वकिली करित असलेल्या आपल्या बंधूंच्या घरीं ते एक दिवस अचा- नक येऊन उभे राहिले; व तेव्हांपासून थोड्या निराळ्या प्रकारच्या सार्वजनिक जीवनाला त्यांनीं प्रारंभ केला. घरीं परत आल्यावर पहिल्याच आठवड्यांत उमरा- वतीच्या ब्रम्हविद्यामंदिरांत त्यांचीं दासबोधावर ओजस्वी प्रवचनें झालीं. त्या प्रवचनांना दादासाहेब खापर्डे हजर होते; व शेवटच्या दिवशीं स्वामीजींचे आभार मानतांना वृद्ध दादासाहेबांनीं, त्या वेळीं नुकत्याच स्थगित झालेल्या असहकारितेच्या चळवळीचा उपहासात्मक उल्लेख करून, स्वामीजींसारख्या समर्थांच्या परंपरेंतल्या तपस्वी पुरुषांनीं देशभर संचार करून महाराष्ट्र धर्माचें पुनरुज्जीवन केल्याशिवाय लोकांच्या क्षात्रवृत्तीचा नाश करणारें हें अहिंसेचें पाखंड मोडणार नाहीं, असे उद्गार जेव्हां तळतळून काढले, तेव्हां सर्वांची अंतःकरणें हलून गेलीं. प्रवचनाच्या वेळीं स्वामीजींच्या डोळ्यांत धगधगणारी

आवेशाची दीप्ति पाहिल्यावर त्यांचें पूर्वचरित्र माहीत असलेल्या श्रोत्यांना असा भास झाला कीं, त्यांच्या अंतःकरणांतील क्रांतिकारक मतांचा अंगारच जणुं त्यांतून उफाळून प्रकट होत आहे.

पंडिजीनींहि त्याच सुमारास अमेरिकेहून परत येऊन काँग्रेसच्या चळवळींत भाग घ्यावयाला सुरवात केली होती. गांधींचें तत्त्वज्ञान त्यांना अर्थातच मान्य नव्हतें. पण, देशांतील त्यांतल्या त्यांत पुरोगामी आणि समाजाच्या अगदीं खालच्या थरापर्यंत पोंचलेली अशी चळवळ काँग्रेसचीच असल्यामुळें, तिच्या आश्रयानें आपल्या मतांचा प्रचार करणें सोईचें आहे, असें त्यांना वाटत असे; व काँग्रेसच्या सभांतून बोलतांना ते अहिंसा आणि सत्य यांच्या ऐवजीं सिनफेन, तरुण तुर्क किंवा फॅसिस्ट यांच्या अत्याचारी कार्यपद्धतीविषयींच पुष्कळदां अधिक आत्मीयतेनें बोलत असत. अमेरिकेंतून परत आल्यावर उमरावतीच्या जोग चौकांत वीर वामनराव यांच्या अध्यक्षतेखालीं त्यांची सिनफेन चळवळीवर जीं पांच व्याख्यानें झालीं, त्यामुळें तरुण विद्यार्थी त्यांच्यावर अगदीं लुब्ध होऊन गेले. शिवाजीराव पटवर्धनांच्यामुळें त्यांची प्रियदर्शनशीं ओळख झाली; व लौकरच त्या ओळखीचें पर्यवसान कौटुंबिक स्नेहांत झालें.

स्वामीजी आणि पंडितजी हे मूळचे सहाध्यायी असले, तरी मधल्या तेरा चौदा वर्षांत त्यांचे संबंध तुटल्यासारखे झाले होते; व उमरावतीला जरी दोघांचेंहि वर्षांतून पांचसहा महिने वास्तव्य असे, तरी दृष्टिकोनांच्या आत्यंतिक भिन्नतेमुळें त्यांच्या भेटीचा योग सहसा येत नसे. पण रेल्वेचे वेगवेगळ्या दिशांनीं जाणारे दोन फांटे जसे एकाद्या जंक्शनच्या ठिकाणीं एकत्र यावे, तसें प्रियदर्शनच्या घरीं मात्र त्यांचें वर्षांतून तीन चारदां तरी एकत्र रहाणें घडत असे.

जयानें तो प्रश्न विचारल्याबरोबर पंडितजींनीं त्याचें मनगट धरून त्याला आपल्या शेजारच्या खुर्चीवर बसवला; व ते किंचित् कठोर आवाजांत उद्गारले—

" तो योग कसा आला हें मागाहून सांगतों ! पण, जया, तुझ्या या रुंद न् बळकट मनगटांत टेनिसचा हा जनानी झारा कांहीं शोभत नाहीं ! चांगले मर्दानी खेळ खेळायचे सोडून हा बायकी खेळ कसला रे खेळतां सकाळच्या प्रहरीं ? "

" मुसोलिनीनें बंदी केली आहे कीं काय अलिकडे टेनिसला इटलीमध्यें, पंडितजी ? " प्रियदर्शननें मध्येंच हंसून विचारलें.

" मुसोलिनीपासून कशाला शिकायला हव्यात असल्या साध्या साध्या गोष्टी ? आपलं आपल्यालाच कळलं पाहिजे आपल्या पोरांनीं काय खेळावं न् काय नाहीं तें ! मला तुमचे हे क्लब न् जिमखाने अगदीं आवडत नाहींत. ज्यांच्या मनांत चुकूनहि कधीं देशकार्याचा विचार यायचा नाहीं, अशा रिकामटेकड्या लोकांचे अड्डे असतात हे ! गांवांतल्या चांभरचौकश्या करायच्या, पत्त्यांवर पैसे लावून जुगार खेळायचा, टेनिस न् बॅडमिंटन यांच्या सारखे जनानी खेळ खेळायचे आणि चहापासून दारूपर्यंत शरीराची खराबी करणारीं वाटेल तीं पेयं प्यायचीं ! खरोखरी कायद्यानं बंद केले पाहिजेत हे जुगारी, व्यसनी न् खुशालचेंडू लोकांचे अड्डे ! मी आमच्या शिवाजीराव पटवर्धनांना बजावून ठेवलंय कीं, आपल्या मंडळांत कांहीं जनानी खेळांचे चोचले शिरूं द्यायचे नाहींत ! या वयांत धांवावं, पोहावं, हॉकी-फूटबॉलसारखे खेळ खेळावे, बंदूक उडवावी, शिकारीला जावं, हें सारं राह्यलं बाजूला न् आपले झारे घेऊन तरुण मुलं खेळतात हीं—"

" आपल्याच भीतीनं आज उमा आला नाहीं वाटतं जिमखान्यावर ? " जयानें मध्येंच विचारलें.

आणि, तो आणखी कांहीं पुढें बोलणार, तोंच कांता उद्गारली—

" पंडितजींच्या बोलण्याचा न् त्याच्या न येण्याचा कांहीं संबंध नाहीं. काल रात्रीं घरीं यायला दोन वाजल्यामुळं आतांच निजून उठलाय तो ! जया, कुठं होतात न् काय करित होतात रे रात्रीं इतका वेळ ?—"

" तूं आमच्यावर आतां किती दिवस पहारा करणार, ताई ? पंडितजी आपण तरी सांगा हिला कांहीं ! घरीं आल्यावर अगदीं खानेतलाशी घेत सुटते आमची—"

" अरे, बायकांचा जन्म हा पहारा करण्यासाठींच आहे मुळीं पुरुषांवर ! ज्या पुरुषाला आयुष्यांत धडाडीनं कांहीं कार्य करायचं असेल, त्यानं लग्न करून कधींहि आपल्यावर हा कायमचा पहारा बसवून घेतां कामा नये—"

" खरं आहे आपलं म्हणणं, पंडितजी! बर्नार्ड शॉचं सुद्धां असंच मत आहे अगदीं! त्यानं असं म्हटलंय, विवाहहोमांत जर खरोखरी कसली आहुति द्यावी लागत असेल तर ती जीविताकडे पहाण्याच्या साहसी दृष्टीची! फरक इतकाच कीं, इतकं सगळं लिहूनहि शॉनं लग्न केलं न् आपण मात्र अविवाहित राहिलां आहांत, पंडितजी, आपल्या मताप्रमाण— "

" उमा, तुझ्या वात्रटपणाला कांहीं सुमार आहे का? पंडितजी, आपण आतां इथं असेपर्यंत उमावर चांगली नजर ठेवा न् कांहीं तरी शिस्त लावा त्याच्या वर्तनाला—"

" अग, या वयांत मुलं हूडच असायचीं न् असलीं पाहिजेत, ताई! जीं मुलं या वयांत हूडपणा करतील, घरांतल्या वडीलधाऱ्या माणसांचं न ऐकतां स्वतंत्र बुद्धीनं विचार करतील, त्यांच्याच हातून पुढं कांहीं तरी पराक्रम घडण्याचा संभव असतो—"

" चांगली बाजू अंगावर आली, ताई, तुझ्या! स्वतः घरांतून पळून जाऊन समर्थ विद्यालयांत राहिलेले न् खिशांत एक पैसा नसतांना सारं नवीन जग पायांखालीं घालून आलेले पंडितजी आमच्या सारख्या तरुण मुलांना पहाऱ्यांत ठेवावं असं म्हणायला कसे तयार होतील?—"

" पुरे पुरे, उमा! धाडस न् बेछूटपणा यांतला फरक कळतो बरं का पंडितजींना—"

" अग, पण उमाशीं वाद न घालतां तूं आधीं जयासाठीं ताजा टोस्ट तर तयार करून आणशील? किती तरी दिवसांनीं तो आज आलाय आपल्याकडे चहाला—"

" कशाला येईल तो? आल्या क्षणापासून ही सारखी पिच्छा पुरवीत राहणार त्याचा न् नाना प्रकारचे प्रश्न विचारणार त्याला! तो कांहीं माझ्यासारखा तिचा पाठचा भाऊ थोडाच आहे असला सासुरवास सोसायला?—"

" उमा, सासुरवास कसला आला आहे रे त्यांत? ताई तुझ्या वर्तनावर नजर ठेवीत असली, तरी ती तुमच्या हितासाठींच ठेवते ना? त्याच्या कागाळ्या काय करतास उठल्या सुटल्या?—"

" कागाळ्या करून माझ्या धाकांत रहाता, तर कांहीं तरी अर्थ होता त्याला—"

" मी कां म्हणून वागेन ग तुझ्या धाकांत ? माझ्यापेक्षां तूं फार तर चार पावसाळे जास्त बघितले असशील. पण मी तुझ्यापेक्षां जग खास अधिक पाहिलेलं आहे—"

" बरं, ताई, टोस्ट तर तयार करून आण तूं आधीं थोडासा ! मात्र साखर पेरून नको आणूं मघांच्या सारखा ! तूपमिठावर परतलेला आण !—"

" प्रियाला गोड आवडतं म्हणून हीं भाज्यासुद्धां गोड करून ठेवते, पंडितजी ! त्याच्याशिवाय घरांत दुसरं कोणी माणूस आहे असं वाटतं का तिला कधीं तरी ? "

" काय करायचंय् वाटून ? तूं घरीं असतोस का कधीं तसं वाटायला ? सदोदित जयाकडे, नाहीं तर त्या नव्या बंगाली दोस्ताकडे मुक्काम असतो तुझा——"

कांता उठतां उठतां म्हणाली.

" कुठला रे हा बंगाली दोस्त, उमा ? मी तर कधीं बघितलेला आठवत नाहीं."

" या वर्षांतच फार बंड माजलंय त्याचं, पंडितजी ! बाकी, जया, मी एकदां साऱ्या गोष्टी स्पष्ट स्पष्ट बोलणार आहे बरं का पंडितजींशीं !—"

" जें काय बोलायचं असेल, तें आमच्या समक्ष बोल, प्रिया ! आम्हांला मुळींच भीति नाहीं तुझ्या बोलण्याची ! पंडितजी आतां जरी कांग्रेसमध्यें शिरले असले तरी मूळचे ते आमच्याच पंथांतले आहेत. लेनिन्, मुसोलिनी, व्हॅलेरा न् कमालपाशा यांच्यावर जे सारख्याच ईर्ष्येनं न् आवेशानं व्याख्यानं देतात, त्यांच्या डोळ्यांपुढें फक्त एकच ध्येय असूं शकतं;——त्यांच्या बुद्धीला फक्त एकच तत्त्व पटलेलं असतं;——देशाचं दास्यमोचन ! मग तें शस्त्रांनीं होवो वा शांततेनं होवो; सत्यानं होवो वा शाठ्यानं होवो ! तरुणांच्या ठिकाणीं धाडस न् क्षात्रतेज उत्पन्न व्हावं, म्हणूनच लेनिन, मुसोलिनी किंवा व्हॅलेरा यांच्यासारखे अगदीं वेगवेगळ्या विचारांचे पण एकाच बेदरकार वृत्तीचे आदर्श पंडितजी त्यांच्यापुढं ठेवतात."

" खरं आहे, उमा, तुझं म्हणणं ! मला पुष्कळ लोक विचारतात,—

" मुसोलिनी, लेनिन, व्हॅलेरा यांच्यासारख्या निरनिराळ्या विचारांच्या क्रांतिकार-

कांवर तुम्हीं व्याख्यानं देतां, मग तुमचा स्वतःचा पक्ष कोणता ? तुम्ही फासिस्ट आहां कीं सोशॅलिस्ट ? तुमचं प्रत्येक व्याख्यान इतकं चांगलं रंगतं कीं, तुम्ही मुसोलिनीवर बोलतांना फासिस्ट असावेत असं वाटतं व लेनिनवर बोलतांना बोल्शेव्हिक असल्याचा भास होतो ! तेव्हां तुमचीं खरीं मतं तरी कोणतीं ? "
यावर मी एकदां एका समाजवाद्याला सांगितलं होतं,—आधीं दास्यमोचन आणि मग इतर सारे वाद ! पहिल्यांदा आपण या साम्राज्यशाहीच्या पाशांतून सुटू या न् मग युरोपांतलं कोणतं तत्त्वज्ञान आपल्या फायद्याचं आहे तें ठरवूं ! नागपुरांत सदा न् कदा संपाची उठावणी करण्याच्या उद्योगांत असलेल्या एका भाईला मी स्पष्टच सांगितलं होतं एकदां कीं, " गिरणीकामगारांच्या दृष्टीला आठ दहा रुपये तरी पडतात महिन्याकांठीं ! पण, आमच्या वऱ्हाडांत आज शेतकरी इतका कांहीं नागवला गेला आहे कीं, उभ्या वर्षांत चांदीचं नाणं दृष्टीस पडत नाहीं त्याच्या ! तुमच्यांत हिंमत असेल तर—तर तुम्हीं खेड्यांत चला, करबंदीची चळवळ करा न् हर्रास करायला पोलिस पाटील येतील त्या वेळीं त्यांना आपल्या क्रांतिकारक मतांचा जोर दाखवा ! पण, या सुटाबुटांत मिरवणाऱ्या न् नाकातोंडांतून सारखा सिगारेटचा धूर काढणाऱ्या ज्वालामुखींना शहर कसं तें सोडायला नको ! वर्कर्स न् पेझंट्स हे दोन शब्द तेवढे आहेत त्यांच्या कागदी कार्यक्रमावर ! पण शेत-कऱ्याचं तोंड कधीं पहात असतील तर शपथ ! म्हणूनच मी म्हणतों कीं, युरोपांतला कोणताहि वाद इथं माजवून आपल्यांतल्या अर्धवट लोकांचा आपण बुद्धिभेद करणं मुळींच इष्ट नाहीं—"

" पण पंडितजी, आपल्या देशांतल्या चळवळीचा धागा आंतरराष्ट्रीय चळवळींशीं जोडायचा, म्हणजे जगांतले राजकीय विचारप्रवाह लक्षांत घेतल्या-शिवाय कसं चालेल आपलं ? "

" न चालायला काय झालं, प्रिया ? जगांतलं एक तरी राष्ट्र निरपेक्ष बुद्धीनं आपल्याला मदत करील असं वाटतं तुला ? तुला माहित नाहीं,—आम्हीं अमेरिकेंत असतांना महायुद्ध सुरू झाल्यावर जेव्हां हिंदुस्थानांत सशस्त्र क्रांति घडवून आणण्याच्या उद्देशानं जर्मन कॉन्सलला जाऊन भेटलों न् जर्मनीकडून

मदत देवविण्याची त्याला विनंति केली, तेव्हां त्यानं आम्हांला पहिला प्रश्न असा केला कीं, 'जर्मनीनं जर तुम्हांला स्वतंत्र व्हायला साह्य केलं, तर तुम्ही त्याला व्यापारी सवलती काय द्याल ?' जगांतलं कोणतंहि राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राला निरक्षेप बुद्धीनं कधीं मदत करित नसतं ! तुम्हां समाजवादी तरुणांना रशियाचा फार भरंवसा वाटतो, नाहीं रे ? पण, साम्यवादाच्या लाल झेंड्याखालीं जगाला आणण्याची रशियाची जी आकांक्षा आहे, तो सुद्धां साम्राज्यवादाचाच एक प्रकार नाहीं काय ? मेकॉलेनं आपल्या इंग्रजी शिक्षणावरच्या मिनिटांत "एम्पायर ऑफ आयडियाज्' असा जो शब्दप्रयोग वापरला आहे, तो कांहीं उगाच नव्हे ! हिंदुस्थानाला आज कोणताहि वाद नको,—त्याला प्रथम स्वतंत्र होऊं दे—"

"पण 'स्वातंत्र्य' म्हणजे तरी काय ? स्वातंत्र्य म्हणजे काय, निव्वळ ज्या देशांत आपण राहतों, त्यावर स्वकीयांचा ताबा असणं, एवढंच ! एवढाच जर, पंडितजी, आपला स्वातंत्र्य या शब्दाचा अर्थ असेल, तर त्या स्वातंत्र्याच्या प्राप्तीसाठीं आपले प्राण धोक्यांत घालून लढायला एकहि मनुष्य तयार होणार नाहीं आज ! जुन्या राष्ट्रीय पक्षाच्या असल्या संदिग्ध शब्दप्रयोगांवर लोकांना झुलविण्याचे दिवस आतां उरले नाहींत ! 'स्वातंत्र्य' या शब्दाचा अर्थ जर इतका संकुचित असता, तर इंग्लंडांतील जनतेनें आपल्या राजाला सुळावर दिला नसता आणि रशियांतील जनतेनें आपल्या सम्राटाचें सिंहासन फोडलें नसतें ! हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यावर अंतर्गत युद्धाचा प्रसंग उद्भवूं नये अशी जर आपली इच्छा असेल, तर आपण आपल्या ध्येयाचं तात्त्विक आणि व्यावहारिक स्वरूप एव्हांपासून निश्चित केलं पाहिजे ! म्हणूनच समाजवादी इतक्या आग्रहानं म्हणत आहेत कीं, समाजसत्तावादाच्या पायावर राष्ट्रीय चळवळीची पुनर्घटना करा ! देश म्हणजे कांहीं नुसती जमीन नव्हे. त्या जमिनीची जी नाना प्रकारची उत्पादनशक्ति तिच्या स्वामित्वाच्या अभिलाषानें आणि अभिनिवेशानें मनुष्य जें प्रेम तिच्यावर पिढ्या न् पिढ्या करीत आलेला असतो, त्याला आपण देशभक्ति आणि देशाभिमान हीं उदात्त नांवें दिलीं आहेत. त्या उत्पादनशक्तीचा समान उपभोग प्रत्येक माणसाला घेतां येईल अशी समाजरचना जोंपर्यंत आपण करीत

नाहीं, तोंपर्यंत देश स्वतंत्र झाला असें म्हणणं शक्य नाहीं; व असल्या दिखाऊ स्वातंत्र्याविषयीं लोकांना ईर्ष्या वाटणंहि शक्य नाहीं."

" प्रिया, तुझं हें सारं तत्त्वज्ञान कबूल आहे मला ! पण राष्ट्रीय सभेचे सध्यांचे पुढारी असल्या व्यापक स्वातंत्र्याच्या प्राप्तीसाठीच झगडत आहेत का ? वर्गवैमनस्य नको म्हणणारे, आपल्या मुठींतल्या अमदाबादच्या कामगारसंघाला कामगारांच्या आंतरराष्ट्रीय चळवळीपासून अलिप्त ठेवणारे आणि देशांतील साऱ्या लहान थोर वतनदारांना आत्मीयतेनें अभयवचन देणारे गांधी समाजवादाचा कधीं तरी स्वीकार करतील का ? बजाज किंवा बिर्ला यांच्या सहाय्यानें ज्यांचा चरितार्थ चालला आहे, ते राष्ट्रीय सभेचे पुढारी उत्पादन शक्तीच्या समान वांटणीचें तत्त्वज्ञान उचलून धरतील अशी अपेक्षा करण्यांत काय अर्थ ? सध्यांच्या राष्ट्रीय सभेंत सहारा वाळवंट लागवडीला आणण्याच्या आशेनें त्याच्यांत कालवा आणून सोडण्यासारखं आहे ! मद्रासच्या राष्ट्रीय सभेंत स्वातंत्र्याची घोषणा करायला जवाहरलाल तयार झाले. पण सोशॅलिस्ट रिपब्लिक स्थापन करण्याच्या कल्पनेला मात्र त्यांनीं विरोधच केला ! राष्ट्रीय सभेंतील सगळ्यांत प्रगमनशील आणि तेजस्वी म्हणून गाजलेल्या पुढाऱ्याची ही अवस्था—"

" त्यांना कां दोष देतोस, जया ? सोशॅलिस्ट रिपब्लिक स्थापन करण्याच्या नुसत्या गप्पा मारायला कांहीं लागत नाहीं. पण उद्यां तें ध्येय राष्ट्रीय सभेनं मान्य केल्यावर आयरिश रिपब्लिकन आर्मीसारखं हिंदुस्थानी सोशॅलिस्ट रिपब्लिकन आर्मी काढण्याची न् जरूर पडल्यास गनिमी काव्यानं लढण्याची तयारी आहे तुमची ? "

" हो, न असायला काय झालं ? आयर्लंडांत जें शक्य झालं तें हिंदुस्थानांत कां शक्य होऊं नये ? "

" अरे, पण हत्यारांचा कायदा आहे ना ? "

" ज्यांना मिठाचा कायदा मोडतां येतो, त्यांना हत्यारांचा कायदा मोडतां येत नाहीं काय, प्रिया ?—"

" कोण मोडणार हत्यारांचा कायदा ? उमा, तू मोडणार ?–"

टोस्टनें भरलेली प्लेट हातांत घेऊन आलेल्या कांतानें विचारलें. आणि नंतर ती पंडितजींकडे वळून म्हणाली, " अलिकडे या डोक्यांत काय वेड भरलंय याची कल्पना नाहीं तुम्हांला, पंडितजी ! "

" कसलं वेड, ताई ? अग, ज्यांना एकाद्या कल्पनेचं वेड लागतं त्यांच्याच हातून अचाट कृत्यं घडत असतात..."

समोरून आंत आलेल्या स्वामीजींनीं म्हटलें.

६

# नव्या जीवनाचा निर्माता

ते गंभीर शब्द कानांवर पडतांच जयाच्या कपांत चहा ओतीत असलेल्या कांतेनें दचकून वर पाहिलें.

आणि तिच्या भुंवया किंचित् विस्फारल्या जाऊन तिच्या तोंडांतून उद्गार निघाला, " अगबाई, मामा आले ! आज लवकर आटपलेलं दिसतंय आन्हिक."

" या स्वामीजी ! आपल्याला तर कांहीं चालणार नाहीं यांतलं ? " पंडितजींनीं त्यांना स्मितपूर्वक म्हटलें.

' कां बरं? संत्री चालायला तर कांहींच हरकत नाहीं.' प्रियदर्शन म्हणाला.

" आणि मी दूध आणतें, मामा, तुमच्यासाठीं गाईचं. "

टोस्टची बशी पंडितजी आणि जयसिंग यांच्या मध्यें ठेवून कांता उद्गारली.

" माझ्यासाठीं सध्यां कांहीं आणण्याची गरज नाहीं, ताई ! आज सोमवार आहे. संध्याकाळपर्यंत पाणीसुद्धां घालायचं नाहीं तोंडांत मला ! बरं, पण तुझी तक्रार काय आहे उमाच्या विरुद्ध ? "

" तसं विशेष कांहीं नाहीं. हत्यारांचा कायदा मोडण्याच्या गोष्टी चालल्या होत्या यांच्या. "

" वा ! चांगलं ! तरुण वयांत मनाला सुचावी न् अंमलांत आणावीशी वाटावी अशीच कल्पना आहे ही ! "

" पण मिठाचा कायदा मोडण्याच्या महात्माजींच्या कल्पनेमध्यें जें एक सामुदायिक आवाहन आहे, तें आहे का हत्यारांच्या कायद्यांत ? "

" सरहद्दीपलिकडे थोडासा जाऊन एखाद्या पठाणाला विचारून पहा हा प्रश्न ! तुमच्या आमच्या सारख्यांच्या निःसत्त्व जीवनांत जी मिठाला जागा, ती त्यांच्या जयिष्णु जीवनांत शस्त्राला ! तरी बरं हिंदूंमध्यें जाट, रजपूत, शीख, गुरखा वगैरे कांहीं जाती अशा आहेत कीं, शस्त्राचार हें ज्यांच्या धर्मजीवनाचं आवश्यक अंग गणलं जातं ! व आपल्या महाराष्ट्रांतहि प्रभु, मराठा वगैरे क्षत्रिय जातींत शस्त्रधारणाशिवाय लग्नाचा संस्कार होऊं शकत नाहीं ! आणि तरी तूं विचारतोस हा भाबडा प्रश्न, प्रिया ? हिंदुस्थानांतले समुद्र, सरोवरें आणि डोंगर हे खंडोगणती मीठ प्रसवतात. तुमचा मिठाचा सत्याग्रह फार चिवट आहे असं इंग्रजांना वाटलं, तर ते एकादे वेळीं स्वतःपुरतं मीठ पिकविण्याचा व्यक्तिगत हक्क देऊनहि टाकतील तुम्हांला. त्यांना माहित आहे, तसला हक्क दिल्यानं कांहीं धक्का बसणार नाही त्यांच्या साम्राज्याला काडी इतकासुद्धां ! पण, सत्तावनच्या स्वातंत्र्ययुद्धानंतर त्यांत झालेल्या आपल्या ससेहोलपटीचा दंश मनांत ठेवून ज्यांनीं चाकूकात्र्याशिवाय न् विळ्याकोयत्याशिवाय जास्त धारेची वस्तु तुम्हांला घरांत ठेवूं दिली नाहीं, ते या पाऊणशें वर्षांत निष्प्रभ झालेलं तुमचं जीवन पुन्हा तेजस्वी करण्याची संधि तुम्हांला मिळूं देतील असं वाटतं तुला, प्रिया ? शस्त्राचाराचा एकदां गमावलेला हक्क पुन्हा मिळवायला कदाचित् शस्त्रांचाच अवलंब करावा लागेल आपल्याला ! ' सामुदायिक आवाहन ! ' त्या शब्दाच्या उपयोगावरून एवढंच दिसतं कीं, युरोपांतील राजनैतिक वाङ्मय तूं फार चांगलं वाचलं आहेस ! पण सामुदायिक आवाहन कोणाला ? मेंढरांना आणि हरणांना सामुदायिक आवाहन करून काय फायदा ? मिठाच्या कायदेभंगांत तूं म्हणतोस तसलं सामुदायिक आवाहन असेल कदाचित् ; पण तो सत्याग्रह आणि तो समुदाय या दोघांतहि तेज नाहीं दिसत मला. "

" पण चळवळीचा कोणताहि मार्ग ठरवितांना शक्याशक्यतेचा विचार नको का करायला, स्वामीजी ? हिंदुस्थानासारखा अवाढव्य देश, लोक निःशस्त्र आणि देशाभिमानाला पारखे असलेले; अनेक धर्मांचा आणि जातींचा बुजबुजाट ! त्यांच्याकडून जें होण्याची थोडी बहुत शक्यता आहे, तेंच त्यांना करायला सांगणं शहाणपणाचं नाहीं का ? "

" शक्याशक्यतेचा विचार करायचा म्हणजे आपली नेमस्तांची भिक्षांदेहीची कार्यपद्धति बरी ! पोटांतलं पाणी हलायला नको, अंगावर ओरखडा उठायला नको ! सुसंस्कृत दैववाद आहे तो ! मिठावरला कर आणि हत्यारांचा कायदा यांच्याविरुद्ध सारख्याच कंठरवानं निषेध करीत आली आहे गेली चाळीस वर्षं राष्ट्रीय सभा. पण, कायदेभंगाला प्रारंभ करितांना फक्त मिठावरील कर तेवढा ग्राह्य वाटावा न् हत्यारांच्या कायद्याचं स्मरणहि होऊं नये याच्यामागं एक मनोवृत्ति आहे, प्रिया ! "

" खरं आहे, स्वामीजी, आपलं म्हणणं ? जातीनं बनिया आणि वृत्तीनं जैन असलेल्या गांधींना शस्त्रांचं वावडं असावं यांत नवल नाहीं कांहीं ! माफ कर, प्रिया ! पण तुमच्या त्या महात्म्याची रहाणी न् तत्वज्ञान यांचा विचार जों जों करावा, तों तों मानवी विकृतीचा तो एक अजब नमुना आहे असं वाटायला लागतं मनाला ! एकीकडे स्वतःला दरिद्रनारायण म्हणवून पंचा उघड्या अंगानं हिंडायचं न् दुसरीकडे कोट्यधीशांच्या तंत्रानं राजकारणाची सूत्रें हलवायची ! एकीकडे उठल्या सुटल्या सत्याचे देव्हारे माजवायचं न् दुसरीकडे अनेक प्रकारच्या गुप्त मसलती करायच्या ! एकीकडे ब्रह्मचर्यावर प्रवचनं झोडायची आणि दुसरीकडे तरुण शिष्यिणींकडून शरीरसेवा करून घ्यायची ! एकीकडे अहिंसेचा पुरस्कार करायचा न् दुसरीकडे नफेबाज भांडवलवाल्यांची तळी उचलून धरायची, असं गांधींचं सारं तत्त्वज्ञान न् आचरण म्हणजे विसंगतीचं न् विकृतीचं गांठोडं आहे एक ! त्यांच्या चारित्र्यांतला हा सारा विसंगतपणा पाहिला म्हणजे डुकराचं मांस खाल्ल्यानं अजीर्ण होऊन मेलेल्या अहिंसावादी बुद्धाची आठवण होते मला ! बुद्धाच्या तत्त्वज्ञानानं ग्रस्त केलेल्या हिंदु धर्माची जगाकडे पहाण्याची जी विकृत आणि दांभिक दृष्टि आहे, तिचा हा महात्मा हें मूर्तिमंत प्रतीक आहे एक ! "

" गांधींची नुसती टवाळी केल्यानं, जया, परिणाम व्हायचा नाहीं कांहीं ! त्यांच्यापेक्षां जास्त तेजस्वी असं राजकीय तत्त्वज्ञान न् कार्यक्रम जोंपर्यंत तुम्ही लोकांपुढं ठेवीत नाहीं, तोंपर्यंत लोक तुम्हांला तुच्छ समजून दुर्लक्ष करतील तुमच्याकडे ! "

" खरं आहे तुझं म्हणणं, प्रिया ! पण, जयाला कुठं लोकांनीं हुच्च म्हटलं तरी परवा आहे त्याची ? सकाळीं टेनिस खेळावं, दुपारीं कॉलेजांत प्रोफेसरांची टिंगल करावी, संध्याकाळीं तेलंखेडीच्या तलावांत जाऊन डुंबावं न् रात्रीं सिनेमा पहावा हें ज्यांचं आयुष्य, त्यांना काय किंमत कळणार गांधींची ? गांधीच्या तत्त्वज्ञानांत दोष किंवा विसंगती नाहींत असं मी म्हणत नाहीं. पण गांधी ही एक स्वतःच्या अंतःप्रेरणेनं काम करणारी प्रचंड शक्ति आहे. आपल्या राष्ट्रीय जीवनाची आमूलाग्र पुनर्घटना करण्याच्या उद्देशानं जीवनाच्या हरएक क्षेत्रांत क्रांति घडवून आणण्याचा प्रयत्न करणारा अशा तऱ्हेचा विशाल प्रतिभेचा राष्ट्रपुरुष हिंदुस्थानांत दुसरा निर्माण झालेला नाहीं. टिळक हे गांधी-पेक्षां बुद्धिमान् आणि विद्वान् असतील; व त्यांचें राजकीय धोरणहि कदाचित् अधिक मुत्सद्देगिरीचं असेल. पण त्यांनीं फक्त देशाच्या राजकीय उन्नतीसाठीं आपलं शक्तिसर्वस्व खर्ची घातलं. आपल्या राष्ट्रीय जीवनाची सर्वांगांनीं पुनर्घटना झाल्याशिवाय सध्यांच्या जागतिक स्पर्धेत त्याचा निभाव लागणार नाहीं आणि प्रभाव पडणार नाहीं याची जाणीव टिळकांना होती, असं दिसत नाहीं. गांधींनीं राजकीय स्वातंत्र्यापासून तों लिपीच्या समीकरणापर्यंत राष्ट्रीय-त्वाला अंगभून असलेल्या साऱ्या प्रश्नांकडे जिव्हाळ्यानं लक्ष पुरविलें आहे. म्हणून मी म्हणतों कीं, गांधी ही एक अजस्र शक्ति आहे. ती शक्ति आंधळी असेल, अरेरावी असेल, अमानुषहि असेल. कारण स्वतःच्या अंतःकरणप्रवृत्तीपुढं इतर कोणाच्याहि मताला किंवा मुत्सद्देगिरीला किंमत द्यायला गांधी तयार नाहीं. किंबहुना, आपल्या अंतःप्रेरणेला आव्हान द्यायला जो कोणी उभा राहील, त्याला नेस्तनाबूत करण्याचे गांधींचे मार्ग जितके सूक्ष्म आणि सुसंस्कृत तितकेच अघोरहि आहेत. निसर्गाप्रमाणं लहरी, क्रूर, आंधळी, आत्मनिष्ठ, उत्पातकारी पण एकंदरींत प्रगमनशील अशी ही शक्ति आहे. जया, तूं म्हणतोस त्याप्रमाणें गांधी हें प्रतीक आहे, हें खरं. पण तें प्रतीक हिंदु धर्माचं नव्हे, तर शोपेनहौरनें ज्या आदितत्त्वाला ' वुइल ' म्हणजे इच्छाशक्ति म्हटलं आहे, त्या तत्त्वाचं गांधी हें प्रतीक आहे. जगताचं आदिकारण अशी जी ही इच्छाशक्ति ती केव्हां बुद्धाच्या, केव्हां ख्रिस्ताच्या, केव्हां नेपोलियनच्या, तर केव्हां लेनिनच्या

रूपानं अवतीर्ण होऊन कालचक्राला इतकी जोराची कलाटणी देते कीं, त्या कलाटणीमुळं पुराणप्रिय, मंद्गामी मानवजात एकदम कित्येक शतकांची प्रगति करून जाते ! गांधी ही त्या कोटींतील विभूति आहे; त्या इच्छा-शक्तीचा अंशावतार आहे. म्हणून त्याच्या कार्यात सामान्य व्यवहारी मनाला हतबुद्ध करून सोडणारा विजेचा वेग, विध्वंसकता आणि तळप दिसून येते. मुसोलिनी, कमालपाशा आणि व्हॅलेरा यांना मी याच कोटींतले समजतों; व म्हणूनच त्यांच्यांतील मतभेदांची आणि वैगुण्यांची पूर्ण जाणीव असून सुद्धां त्यांच्याविषयीं मला सारखाच आदर वाटतो.—वाटल्यास तुम्ही मला प्रभावपूजक म्हणा !—पण या प्रभावशाली व्यक्तींमुळं मानवजातीचं पाऊल एकंदरींत पुढें पडलं, हें विसरून चालणार नाहीं. गांधी हा कांहीं बाबतींत मुसोलिनी किंवा कमाल-पाशा यांच्यापेक्षां सरस ठरेल. निःशस्त्र आणि निरक्षर अशा या प्राचीन राष्ट्राला शस्त्रांचा अवलंब केल्याशिवाय, पारतंत्र्यांतून मुक्त करण्याची त्याची ईर्ष्या जितकी अद्भुत तितकीच मानवजातीच्या इतिहासांत अपूर्व आहे; व त्या ईर्ष्येच्या या अपूर्वते-मुळेंच हिंदुस्थानांत चाललेल्या स्वातंत्र्याच्या लढ्याकडे जग एक प्रकारच्या कुतूहलानें आणि विस्मयानें पहात आहे. हिंदुस्थानांत आजपर्यंत होऊन गेलेले सारे पुढारी हे नुसते राजकारणी पुरुष होते. पण गांधी हा नव्या मनूचा, नव्या जीवनाचा निर्माता आहे. मार्क्स आणि लेनिन यांच्या प्रमाणं कांहीं नैतिक आणि आर्थिक कल्पना मनांत धरून त्यांच्या पायावर एकंदर मानवी समाजाची पुनर्घ-टना करण्याचा प्रयत्न तो करित आहे. त्यामुळंच तो स्वतःच्या अंतःप्रेरणेशिवाय इतर कुणाचा आदेश मानावयाला तयार नाहीं; व त्या प्रेरणेच्या जोषांत हिमालया-एवढ्या चुका तो अगदीं निःशंक मनानं करतो—"

" न करायला काय झालं ? त्या चुकांचे परिणाम त्याला थोडेच कधीं भोगावे लागताहेत ? त्याची चैन चालवायला बजाज आणि बिर्ला यांच्यासारखे शेठिये आहेतच ! त्याच्या चुकांमुळं हजारों तरुणांच्या आयुष्याचं मात्र मातेरं झालं आहे आजपर्यंत !—"

यादवरावांनीं आंत येतां येतां मध्येंच एकदम म्हटलें.

त्यांनीं अत्यंत तुच्छतेनें काढलेल्या त्या उद्गारांमुळें पंडितजींच्या आवेशपूर्ण वक्तृत्वाचा विरस झाला; व ते अर्धवट रागानेंच त्यांच्याकडे वळून म्हणाले, " आपण या वेळीं इकडे कुणीकडे, काकासाहेब ?—"

त्या प्रश्नांतली खोंच यादवरावांच्या लक्षात आली. पण, आपल्या आगमनाविषयीं अप्रियता दर्शविणारे असले प्रश्न त्यांच्या इतके कांहीं अंगवळणीं पडले होते कीं, ते हंसत हंसत म्हणाले, " आपण दोघे आल्याचं कळलं म्हणून मुद्दामच भेटायला आलों मी आपल्याला, पंडितजी ! आपण दोघे एकाच वेळीं इथं येण्याचा हा योग कसा काय जमून आला ? "

या त्यांच्या उत्तरामुळें पंडितजींचा राग मनांतल्या मनांतच जिरला; व तेहि हंसून म्हणाले, " जयानं सुद्धां हाच प्रश्न विचारला होता आल्याबरोबर मघांशीं मला !—स्वामीजी कसे आले तें माहित नाहीं मला. पण मी मात्र माझ्या प्रचाराच्या दौऱ्यावर आलों आहें—"

" मग मिठाच्या सत्याग्रहाला लोकमत अनुकूल दिसल का तुम्हाला ? "

" तें पंडितजींपेक्षां काकासाहेब, तुम्हांलाच जास्त कळलं असेल तुमच्या खात्याकडे आलेल्या माहितीवरून !" प्रियदर्शननें उपरोधिक स्मित करित म्हटलें.

" चुकतोस, प्रिया, तूं ! आमच्या अधिकाऱ्यांचा रिपोर्ट हा नेहमींच बाद करून लिहिलेला असतो ! लोकमताची खरी कल्पना पंडितजींसारख्या सर्वसंचारी कार्यकर्त्यांच्या माहितीवरूनच यायची —"

यादवरावांनीं अगदीं संथपणानें त्या उपरोधिक उद्गारांना उत्तर दिलें.

पण त्यांचा प्रश्न तो टाळण्याची इच्छा असल्यामुळेंच कीं काय पंडितजी आश्चर्याच्या आविर्भावानें उद्गारले, " अरे, पण हे दोघे मुलगे नाहींसे केव्हां झाले इथून ?"

" आपण माझ्याशीं बोलत असतांनाच ते उठून गेले दोघेहि ! पंडितजी, मी एक विनंति करणार आहें आपल्याला स्नेहभावानं !—ठाकूर, सप्रे आणि कदम या तिन्हीं घराण्यांवर लोभ आहे आपला. म्हणून माझी आपल्याला अशी विनंति आहे कीं, प्रिया, जया आणि उमा या तिघांनाही आपण चार समजुतीच्या गोष्टी सांगाव्यात अन्—"

" पण त्या कशाबद्दल ?"

" प्रिया जंगल सत्याग्रहांत भाग घेणार म्हणतो आणि उमा न् जया——"

"शस्त्रसत्याग्रह करण्याच्या विचारांत आहेत !" प्रिया हंसत हंसत म्हणाला.

" प्रिया, तुमच्या या असल्या बेजबाबदार वागण्यानं दद्दांची न् माझी परिस्थिति किती चमत्कारिक होणार आहे याची कल्पना नाहीं तुम्हांला——"

" चमत्कारिक कसली आली आहे ? खटले भरा यांच्यावर !" पंडितजी हंसत हंसत म्हणाले. " मी ज्या मतांचा प्रसार करायला निघलों, त्यांच्या उलट सल्ला कसा देऊं या मुलांना ? "

" उलट कसा काय ? प्रियाचं एक असो. पण उमा आणि जया——"

" काका, तुमची शंका व्यर्थ आहे त्या दोघांच्या बाबतींत ! ते तोंडानं कांहींहि बोलत असले तरीं तसं कांहीं घडायचं नाहीं त्यांच्या हातून——"

" तूं जामीन रहायला तयार आहेस, प्रिया ?——"

" हो हो !——"

तो आणखी कांहीं बोलणार, तोंच त्या अप्रिय चर्चेला टाळा देण्याच्या उद्देशानें स्वामीजी मध्येंच म्हणाले, " ताई, अग चहा आण ना ताजा यादवरावांसाठीं——"

" नको, नको. पुष्कळ झालाय चहा माझा आतांपर्यंत ! का ग तुला पटलं कीं नाहीं माझं म्हणणं ?——"

" पटलं असलं तरी काय उपयोग ? बायकांचं शहाणपण हें पुरुषांच्या बराबाहेल्या उद्योगांना आळा घालायला अपुरं पडतं——"

" पण काका, तुम्ही उगाच कांहीं तरी संशय घेऊन बोलतां आहांत——"

" नाहीं, प्रिया ! मी नुसत्या संशयानं बोलण्याइतका उथळ आहे असं कसं वाटतं तुला ?——"

तें वाक्य त्यांनीं इतक्या कांहीं दुःखपूर्ण आवाजांत उच्चारलें कीं, ऐकणारांच्या मनाला एकदम चरका बसल्यासारखा झाला.

क्षणभर कोणीच कांहीं बोललें नाहीं.

नंतर कांता हळूच म्हणाली, "पंडितजी रहायचे आहेत आतां आठ दिवस इथं!--ते सांगतीलच समजुनीच्या गोष्टी सगळ्यांना--"

"ताई, तुझ्या शहाणपणावर भिस्त आहे आमची! दद्दांकडे गेली होतीस का तूं? प्रियानं निरोप सांगितला नाहीं त्यांचा तुला?--"

"त्यांनीं निरोप सांगितला. पण मला धीर नाहीं झाला जायचा. मी काय बोलूं तिथं जाऊन त्यांच्याशीं?--"

"छे, छे! तूं जायला हवं होतंस. दद्दांचं बोलावणं म्हणजे हुकूमच तो! अजून गेलीस तरी हरकत नाहीं. आजच जा. गाडी पाठवून देईन मी दुपारीं--"

७

# पिढ्या तुटण्याचा प्रसंग

" छोटी भाबीजी आई है—"

चपराशानें अदबीनें सलाम करून म्हटलें. सर महादेव चहामध्यें सॅकरिन घालून तो ढवळीत होते. ते वर न पाहतांच किंचित् त्रासिक आवाजांत उद्गारले—

" कोन आया है ? "

" कांताबाईसाब—छोटी भाबीजी—"

" हां ! उनकू बोलो—साब अंदर बुलाता है—"

कांता आंत येऊन कोचाच्या कमानीवर हात ठेवून उभी राहिली.

सर महादेव अजूनहि चहा ढवळीत होते. त्यांनीं तिच्याकडे न पहातां मृदु आवाजांत विचारलें—

" माझा निरोप पोंचला नव्हता तुला ? "

" नाहीं. पोंचला होता—"

" मग आज आठवण झाली तुला यायची ?—"

त्या आवाजांत उत्पन्न झालेली कठोरता कांताला जाणवली; व ती अत्यंत नम्रतेनें म्हणाली—

" मला रोजच यावंसं वाटत होतं. पण येऊन उपयोग व्हायचा नाहीं असं मनांत आल्यामुळें धीर झाला नाहीं यायचा—"

" कां बरं ? " त्यांनीं एकदम वर बघून म्हटलें; व आपल्या उजव्या बाजूला असलेली विजेची घंटी दाबली.

त्याबरोबर चपराशी धांवतच आंत आला.

त्याला ते म्हणाले, “ अरे, चहा आण ताजा आणखी थोडासा—”

“ मी आतांच चहा घेतला आंत बाईच्या बरोबर—”

“ पण माझ्याबरोबर नाहीं घेणार थोडासा ? कालच सर मॉंटेग्यूंकडून अगदीं नवीन प्रकारच्या बिस्किटांचा डबा आला आहे हा ! चहाबरोबर पहा बरं कशीं लागतात तीं ?—अरे, खुर्ची यहां रख देव —”

चपराशानें त्यांच्या टेबलाजवळ खुर्ची ठेवली. पण कांता कोचामागेंच उभी होती.

सर महादेव तिच्याकडे बघून म्हणाले, “ कांता, ये बैस. मला आज पुष्कळच बोलायचंय् तुझ्याशीं—”

त्या आवाजांत मार्दव आणि हुकमीपणा यांचें असें कांहीं विलक्षण मिश्रण होतें कीं, कांता मुकाट्यानें त्यांच्यासमोर ठेवलेल्या त्या खुर्चीवर येऊन बसली.

“ कांता, काल रात्रीं गव्हर्मेंट हाऊसवर खान्याला गेलों होतों मी.—मला अगदीं एकट्यालाच बोलावला होता सर मॉंटेग्यूंनीं.—कशीं वाटतात बिस्किटं तुला हीं ?—”

“ छान आहेत ! ” तिनें बिस्किटाच्या एका कडेचा तुकडा चहाच्या घोटाबरोबर घाईघाईनें गिळीत म्हटलें.

“ लेडी मॉंटेग्यूची फार इच्छा आहे तुला भेटण्याची. तिनं तें जें शिशु-संगोपनाचं नवं केंद्र उघडलं आहे ना, त्याला उत्साही चिटणीस हवा आहे तिला.—काल ती विचारीत होती, तूं तें काम करशील का म्हणून ?—”

“ सर मॉंटेग्यु काय म्हणत होते ? ”

“ दुसरं काय म्हणणार ? ” सरसाहेब किंचित् रागानें उद्गारले. आपल्या प्रश्नाला उत्तर देण्याचें तिनें टाळलें हें त्यांच्या लक्षांत आलें; व त्यांचीं कानशिलें एकदम लाल होऊन आवाजांत कंप उत्पन्न झाला. “ त्यांनीं मला सरळच विचारलं तुमचा पुतण्या सत्याग्रहांत भाग घेणार आहे का म्हणून ! मध्यप्रांत सरकार आणि ठाकूर घराणं यांच्या संबंधाला अशा प्रकारचं विचित्र वळण लाग-

ण्याचा योग कधीं येईल ही गोष्ट स्वप्नांतहि आली नव्हती माझ्या असं म्हणत होते ते—"

" खरंच आहे त्यांचं तें म्हणणं ! ठाकूर घराण्यानं इंग्रजांची सेवा गेलीं पन्नास वर्षं इतक्या निष्ठेनें केली आहे कीं,. बुंदेल्यांचं रक्त ठाकुरांच्या अंगांत खेळत आहे असा संशयहि यायचा नाहीं कुणाला !—"

" कांता ! कांता !—"

सर महादेव एकदम टेबलावर दोन्ही हात आपटून उद्गारले. त्यांच्या हातांच्या त्या आघाताबरोबर बिचाऱ्या वेताच्या टेबलावरलें तें चहाचें सामान इतकें कांहीं हादरलें कीं त्यांचा तो संतापातिरेक पाहून घाबरलेल्या कांताला भूकंप झाल्यासारखेंच क्षणभर वाटलें.

" ठाकूर घराण्यानं आपलं इनाम चतकोर भाकरीसाठीं इंग्रजांना विकलं असं समजतेस तूं ? पोरी, तूं इतिहास वाचलास नाहीस आपल्या नवऱ्याच्या घराण्याचा ! सत्तावन सालच्या बंडांत ठाकूर हे झांशीवालीच्या खांद्याला खांदा भिडवून लढले न् म्हणूनच सागरमधली त्यांची जहागीर जाऊन त्यांच्यावर इंग्रजांची नोकरी करण्याचा प्रसंग आला ! बुंदेल्यांचं रक्त ! ज्यांच्या समशेरीपुढं नर्मदेपासून चंबळेपर्यंतचं सारं मध्यभारत थरथरा कांपत होतं त्या बुंदेल्यांचं रक्त ! ! तें बुंदेल्यांचं रक्त कोणत्याहि परिस्थितींत राज्यच करील—"

" पण इंग्रजांचं ताबेदार म्हणून राज्य करण्यांत काय भूषण आहे ठाकुरांना ?—या गोष्टीची जाणीव त्यांना असल्यामुळंच कायदेभंगाच्या चळवळींत भाग घ्यायचं ठरवलंय त्यांनीं—"

" नाहीं, नाहीं ! ही गोष्ट घडतां कामा नये, पोरी ! प्रियाकडे मी कोणत्या दृष्टीनं पहातों हें माहित नाहीं तुला ! माझी सारी भिस्त, आपल्या घराण्याचा सारा लौकिक, त्याच्यावर अवलंबून आहे आतां ! गांधींनीं कितीहि अकांडतांडव केलं, तरी वर्तुळ परिषद् खात्रीनं भरणार आणि पुढल्या तीन चार वर्षांत सारे प्रांत स्वायत्त होणार ! त्या प्रांतिक स्वायत्ततेच्या काळांतील पहिल्या मंत्रिमंडळांत प्रिया असावा असं वाटत नाहीं तुला ? सर मॉंटेग्यूंनीं हाच प्रश्न विचारला काल मला !—"

" पण या बाबतीत त्यांचा संबंध कुठं येतो ? दिवाणांची नेमणूक त्यांच्या हातीं थोडीच रहायची आहे यापुढं ?—"

" त्यांच्या हातीं म्हटलं तर आहे, म्हटलं तर नाहीं ! समजा, १९२० सालाप्रमाणं गांधींनीं याहि वेळीं जर कायदेमंडळांवर बहिष्कार पुकारला, तर प्रियाला चरखा फिरवीत घरीं बसावं लागेल कीं नाहीं ? हाच जर तो कायदे-भंगाच्या चळवळीपासून अलिप्त राहिला, तर त्याला निवडणुकीला उभं रहातां येईल आणि निवडून आल्यावर दिवाणगिरीहि सहज मिळूं शकेल ! गांधींचा कार्यपद्धति विध्वंसक आहे न् तींत जो भाग घेईल त्याच्या आयुष्याची नासाडी व्हायची हेंहि ठरल्यासारखंच आहे !—काल रात्रीं जेवतांना याच गोष्टींची चर्चा केली आम्हीं. आणि योगायोग असा कीं, आजच मला भेटायला यायची बुद्धि झाली तुला !—कांता, माझी सारी भिस्त आतां तुझ्यावर आहे ! राधा इंग्लंडहून परत आल्यावर मालू त्याला ताळ्यावर आणील अशी आशा होती मला. पण ती व्यर्थ ठरली. मी गृहमंत्री आणि गव्हर्नर असतांना नाना प्रकारच्या उर्चीतल्या उंची दारूच्या बाटल्या खान्याच्या वेळीं माझ्या टेबलावर फुटत होत्या ! पण मी स्वतः कधीं दारूला स्पर्शहि केला नाहीं. आणि राधा !—त्यानं अपरात्रीं पिऊन येऊन केलेल्या धिंगाण्यानं एकदां माझी झोंप मोडली, म्हणजे पुन्हा डोळा लागतां लागत नाहीं मग ! राधा तशा रीतीनं वाहवला आणि प्रियाची ही तऱ्हा ! पोरी, प्रिया जर जंगल सत्याग्रहांत खरोखरीच सामील झाला, तर म्हातारपणीं तोंड दाखवायला जागा रहाणार नाहीं मला ! माझा लौकिक, आपल्या घराण्याचा लौकिक, प्रियाचं राजकीय भवितव्य सर्वस्वी तुझ्या हातांत आहे आतां ! श्री आणि सत्ता ही स्वतःच्या घराण्यांतून बाहेर गेलेली पहाणं यापरतं दुसरं दुःख नाहीं पराक्रमी पुरुषांना ! हें मानहानीचं दारुण दुःख तुम्ही म्हातारपणीं भोगायला लावणार का मला ? राधानं माझी कायमची निराशा केली आहे. आणि आतां प्रियाहि जर माझी निराशा करील—"

ते आणखी कांहीं बोलणार, तोंच त्यांच्या कानांवर अगदीं अस्पष्ट असा हुंदका पडला.

त्याबरोबर स्वतःचा सारा मनस्ताप एकदम विसरून ते विस्मयानें इंग्रजींत उद्गारले, " मी तुला लागण्यासारखं कांहीं बोललों का रागाच्या भरांत ? क्षमा कर मला —"

" नाहीं, नाहीं. आपण मला लागण्यासारखं कांहींहि बोललां नाहीं." कांतानें त्यांच्याकडे पाहून आवेशानें म्हटलें. " मला दुःख वाटलं तें एवढ्याच गोष्टीचं कीं, आपण मला इतकं विनवून सांगावं न् तें काम माझ्या हातून होऊं नये. भाऊजींना ताळ्यावर आणायला बाई जशा असमर्थ ठरल्या, तसंच माझंहि झालं आहे या बाबतींत. पुरुष एकदां एकाद्या हट्टाला पेटले, म्हणजे संसाराची पुरती राखरांगोळी झाल्याशिवाय त्यांचे डोळे उघडत नाहीत—"

" नाहीं, नाहीं. तुझी आणि मालूची स्थिति अगदीं निराळी आहे. दारुड्या आणि दुर्व्यसनी नवऱ्याला ती ताळ्यावर आणूं शकली नाहीं, हा तिचा दोष नव्हे;—तें माझं दुर्दैव आहे. प्रियाचं तुझ्यावर अत्यंत प्रेम आहे. त्या प्रेमाचा जर तूं कुशलतेनं उपयोग केलास, तर त्याला या अविचारापासून परावृत्त करणं कठीण नाहीं तुला—"

" मी त्यांना आतांपर्यंत कांहीं सांगितलं नाहीं, असं वाटतं आपल्याला ? "

" आणि तरी सुद्धां त्याचा हट्ट कायम आहे ? "

" हो. माझी खात्री होऊन चुकली आहे अगदीं कीं, कुणी कांहींहि सांगितलं तरी ते जंगल सत्याग्रहांत भाग घेतल्याशिवाय राहणार नाहींत—"

तिचें तें उत्तर ऐकून सरसाहेब थिजल्यासारखे झाले अगदीं. क्षणैक ते स्तब्ध होते. नंतर विजेची घंटी दाबून त्यांनीं चपराश्याला आंत बोलावला; व तें चहाचें सामान उचलावयाला सांगितलें.

तो सामान घेऊन बाहेर गेल्यावर ते उठले; त्यांनीं चिरूट शिलगावला; व अत्यंत व्यग्र चित्तानें खोलींत फेऱ्या घालावयाला सुरवात केली.

कांता कोचापाशीं उभी राहून त्यांच्या त्या हालचाली पहात होती. त्यांच्या कपाळावर वारंवार पडणाऱ्या आडव्या उभ्या आंठ्या, तांबारलेल्या डोळ्यांचा

मधून मधून होणारा संकोच आणि श्वासागणिक नाकपुड्यांना येणारा कंपयुक्त फुगीरपणा !---त्यांनीं धारण केलेली ती स्तब्धता केवढ्या तीव्र मनःक्षोभाची निदर्शक आहे, याची जाणीव होत होती तिला सारखी. आतां आपण इथें थांबण्यांत स्वारस्य नाहीं, असें तिला क्षणोक्षणीं वाटत होतें. पण जाण्यासाठीं त्यांची परवानगी मागण्याचाहि हिय्या तिला होईना.

ते तर इतके व्यग्र झालेले होते कीं, आपल्या तोंडांतला चिरूट विझून गेला आहे, याचीहि त्यांना शुद्ध नव्हती.

अखेर कांतानें हळूच विचारलें, " मी जाऊं आतां ? "

तिचा तो प्रश्न कानांवर पडतांच ते एकदम तिच्याकडे वळले व तोंडांतला चिरूट काढून म्हणाले, " मग तुझं कांहीं ऐकण्याच्या मनःस्थितींत प्रिया नाहीं म्हणतेस ?---"

" होय. आज तरी तसं दिसतंय खरं ! "

" ठीक ! राजकीय कल्पनांत प्रत्येक पिढीगणिक बदल होतो याची मला जाणीव आहे, कांता. पण त्या बदलाबरोबरच राजकारणांत भाग घेणाऱ्या लोकांच्याहि पिढ्या तुटतात हें विसरून चालणार नाहीं. प्रियाचं गेल्या दहा वर्षांतलं वर्तन पाहून मला सारखं वाटे कीं, या त्याच्या विचित्र ध्येयवादामुळं आपल्या घराण्याचीं शकलं होणार ! तसा प्रसंग ओढवूं नये, म्हणून मी माझ्याकडून प्रयत्नांची शिकस्त केली. पण, तुझ्या आतांच्या बोलण्यावरून मला असं दिसतंय कीं ठाकूर घराण्याचीं शकलं व्हावींत आणि तींहि माझ्या डोळ्यांदेखत व्हावींत, अशी भवितव्यता आहे. ब्रिटिश पार्लमेंटांत पिता आणि पुत्र हे प्रतिस्पर्धी म्हणून समोरासमोर बसलेले अलिकडे दृष्टीस पडूं लागले आहेत. तोच योग माझ्याहि नाशिबीं यावा, असा दैवी संकेत दिसतो. कदाचित् प्रियाच्या या वर्तनामुळंच ठाकूर घराण्याचं जास्त कल्याण होणार असेल. पक्ष्यांचीं पिलं पंख फुटून चांगलीं उडूं लागलीं म्हणजे स्वतःचा मार्ग स्वतःच काढतात आणि नंतर तीं आपल्या आईबापांना आणि आईबाप त्यांना विसरून जातात ! तशी जर माणसांची स्थिति असती, तर किती चांगलं झालं असतं, कांता ! निराशेचे आणि मानहानीचे आयुष्यांतील किती तरी प्रसंग टळले असते ! "

बोलतां बोलतां त्यांचा आवाज घोगरा झाल्यासारखा वाटला. म्हणून कांतानें वर मान करून त्यांच्याकडे पाहिलें. त्यांच्या कपाळावरील शीर फुगली होती; व नाकपुड्यांचा फुगीरपणा त्यांच्या श्वासाचा वेग दर्शवीत होता. त्या आवेगामुळेंच कीं काय ते क्षणार्ध थबकले.

त्याबरोबर कांतानें पुन्हा हळूच म्हटलें, " जाऊं ना मी आतां ? "

" हो ! विसरलोंच मी ! पुन्हा जरूर वाटली तर बोलावीन तुला ! "

ती अभ्यासिकेंतून ( Study ) बाहेर आली, तोंच वऱ्हाड्यांतील झुलत्या खुर्चीवर वाचीत बसलेली ऊर्मिला तिच्याजवळ येऊन तिला म्हणाली, " ताई, काय बोलत होते ग दद्दा एवढ्या मोठ्यामोठ्यानं ? त्या दिवशीं रात्रीं जेवणाच्या वेळीं प्रियानं आपला सत्याग्रहांत जाण्याचा विचार बोलून दाखविल्यापासून त्यांना झोंप नाहीं बघ अगदीं ! रात्रीं दोन दोन वाजेपर्यंत एकटेच बुद्बळं खेळत असतात किंवा फेऱ्या घालीत असतात. त्यामुळं भय्या परत आल्यावर अपरात्रीं जे प्रकार घडतात, ते सुद्धां कानांवर जातात त्यांच्या ! मला कीं नाहीं फार भीति वाटते ग, केव्हां त्यांना हार्टचा ॲटॅक येईल याचा कांहीं नेम नाहीं ! ताई, तूं तरी सांग ना ग प्रियाला कांहीं तरी ! "

" ऊर्मि, तूंच चल आतां माझ्याबरोबर घरीं न् स्वतःच सांग त्यांना हें सारं ! पुरुषांचीं मनं आवरणं किती कठीण असतं हें लग्न झाल्यावर कळेल तुला ! "

तिनें उच्चारलेलें तें शेवटचें वाक्य ऐकतांच ऊर्मिलेचा चेहरा एकदम गोरामोरा झाला. त्याबरोबर कांतानें तिचा हात आपल्या हातांत घेऊन म्हटलें, " तूं चलतेस ना माझ्याबरोबर घरीं ! उमासुद्धां भेटेल तुला ! "

" नको नको, ताई ! एका कॉलेजांत असून सुद्धां जिथं महिन्या महिन्यांत भेटीचा योग येत नाहीं ! "

" ऊर्मि, तुझ्या या असल्या वागण्यामुळंच त्यांचं विजूविषयींचं वेड वाढत चाललेलं दिसतंय मला ! "

" पण ताई, एवढं एकच वेड आहे का ग उमाला ? तुझ्या कानांवर नाहीं आलं अजून ? त्या बंगाली हॉटेलांतली ती बाई श्यामासुंदरी ! तिच्या वरून सारे विद्यार्थी नाहीं नाहीं तें बोलत असतात उमा न् जया यांच्याविषयीं ! "

" असं ? पण हे, मला वाटतं, त्यांना सुद्धां माहीत नाहीं अजून ! तूं पाहिली आहेस त्या बाईला ?– "

" हो. तूं सुद्धां पाहिली आहेस तिला ! आमच्या कॉलेजांतल्या हिंदीच्या संमेलनांत काव्यगायन नव्हतं का झालं तिचं ? तूंच तर म्हणाली होतीस तेव्हां मला कीं, हुबेहूब सरोजिनीसारखे टपोरे न् वेधक डोळे आहेत तिचे म्हणून. "

" तिच्या नादीं लागला आहे उमा ? मला वाटलं नव्हतं, ती बाई अशा तऱ्हेची असेल म्हणून. "

" पण ती वाईट चालीची आहे असं कधीं सांगितलं ग मी तुला ? ती वाईट असेल किंवा चांगली असेल.—उमानं न् जयानं आपल्या त्या बंगाली दोस्ताबरोबर तिच्याशीं गप्पा मारीत रात्रीं दोन दोन वाजेपर्यंत त्या हॉटेलांत बसणं कांहीं बरं नाहीं !-ताई, तुला आणखी एक गोष्ट सांगूं ? "

" काय ग ? "

" परवां रात्रीं काकासाहेब आले होते कसलीं तरी पत्रं घेऊन दद्दांना दाखवायला ! तीं पत्रं त्यांनीं वाचून दाखविल्यावर दद्दा अतिशय संतापले न् मोठ्यामोठ्यानं म्हणत होते कीं, " हंटरनं फोडून काढलं पाहिजे एका एका पोराला—"

" तुला कळलं का, तीं पत्रं कुणाचीं न् कशाबद्दल होतीं तें ? "

" कसं कळणार ? दद्दा फारच मोठ्यानं बोलूं लागले, तेव्हां काय कानांवर पडलं तेवढंच ! ताई, उमाचं लक्षण कांहीं ठीक नाहीं. "

" कुणाचं लक्षण ठीक आहे, ऊर्मि ? आपल्या साऱ्याच कुटुंबाची अवस्था, ज्याच्या सगळ्या खांबांना वाळवी लागली आहे अशा घरासारखी दिसते मला—"

" ताई, तूं जर सगळ्या गोष्टी समजाऊन सांगितल्यास प्रियाला तर तो खात्रीनं ऐकेल तुझं ! "

" पुरुषांचं मन आणि महत्त्वाकांक्षा या किती विलक्षण चिजा आहेत, हे लग्न झाल्याशिवाय कळणार नाहीं तुला !—तीरावरल्या झाडांचीं पानं प्रवाहांत पडल्यानं त्याचा वेग कधीं कमी झाला आहे का ?—"

" तुझ्या तोंडीं शोभत नाहीं ही भाषा, ताई—"

' शोभण्याचा काय प्रश्न आहे, ऊर्मि ! वस्तुस्थितिच मुळीं तशी आहे ! आपल्या सुशिक्षित मुलींचं इथंच चुकतं सारं ! स्वतःचं मन मारून टाकायला त्या तयार नसतात, म्हणूनच सुखाचे संसार होत नाहींत त्यांचे ! नाहीं तर आपल्या जुन्या बायका पहा ! जन्मल्या क्षणापासून त्यांना शिकवण मिळत असते कीं, स्त्रीचं जीवन हें तिच्या स्वतःसाठीं नाहीं. मला त्या शिकवणीचं मर्म पटायला लागलं आहे अलिकडे !—निसर्गाचीच मुळीं योजना अशी दिसते कीं, संसाराचा भार स्त्रीनं मुकाट्यानं वहावा ! तो भार वाहतांना जी कुरकुर करील, स्वतःच्या अस्तित्वाचा न् व्यक्तित्वाचा बळी जी आनंदानं देणार नाहीं, ती स्त्री नव्हे;—माता आणि कांता होण्याचा तिला हक्क नाहीं !—"



# न पाळतां आलेलें वचन

" छोटा साब अंदर है ? " उमाकांतानें पायऱ्या चढून वर आल्याबरोबर विचारलें.

त्याच्या त्या प्रश्नानें वऱ्हांड्यांतील बांकावर डुलक्या खात बसलेला म्हातारा चपराशी खडबडून जागा झाला; व गडबडीनें उभा राहून म्हणाला—

" नही साब. लेकिन छोटी बाई कॉलेजसे अभी आई है—"

" अच्छा, " उमानें डोक्यावरील हॅट स्टँडला अडकवींत म्हटलें; व आरशासमोर उभें राहून आपले विसकटलेले केस सारखे करीत त्यानें विचारलें, " मोठ्या बाई तर आराम करित असतील आतां, नाहीं ? "

" हो. त्या निजल्या आहेत. आपण आल्याची खबर पोंचवूं का त्यांना मी ?—"

" छे छे ! त्यांना कशाला त्रास उगाच ? मी वर जाऊन तुझा छोटा साब कालेजांतून परत येईपर्यंत छोट्या बाईशीं गप्पा मारीत बसेन. "

असें उत्तर त्याला हंसत हंसत देऊन आपला वांकडा झालेला टॉय नीट केल्यावर तो शीळ घालीत जिना चढावयाला लागला.

जिना चढून वर आल्यावर तो सरळ पलिकडल्या बाजूला असलेल्या विजयेच्या खोलींत जाणार, तोंच त्याच्या मनांत एकदम कांहीं तरी कल्पना आली.

आणि, दुपारच्या सुस्तीनें पेंगत असलेल्या बंगल्याकडे एकवार चौफेर दृष्टि टाकून, जिन्याच्या अगदीं समोरच असलेल्या यादवरावांच्या खोलीकडे तो वळला.

त्या खोलीच्या कुलूप लागलेल्या दारासमोर तो क्षणार्ध थबकला; व आपल्या खिशांतून एक किल्ली काढून ती त्यानें चालवून पाहिली.

पहिल्या सपाट्याला तें कुलूप कांहीं उघडलें नाहीं. म्हणून त्यानें पुन्हा एकवार सभोंवतीं नजर टाकून किल्ली चालविली व कुलपालाहि जोराचा हिसडा दिला.

त्याबरोबर किल्ली लागू पडली आणि तो दार उघडून खोलींत शिरला.

यादवरावांच्या त्या खाजगी खोलींत तो त्या दिवशीं कांहीं प्रथमच आला होता, असें नाहीं. पण, आज ज्या पद्धतीनें त्या खोलींत त्यानें आपला प्रवेश करून घेतला होता, तिच्या चमत्कारिकपणामुळेंच कीं काय आंत आल्याबरोबर अगदीं नवखेपणाच्या भावनेनें त्यानें एकवार सर्व न्याहाळून पाहिलें. नंतर तो परतून दाराजवळ आला; व बाहेरचा कानोसा घेऊन त्यानें दार हळूच ओढून घेतलें.

खोलीच्या मधोमध ठेवलेल्या मोठ्या टेबलाजवळ येऊन तो पुन्हा थबकला; व सिगारेट पेटवून त्यानें धूम्रपानाला सुरवात केली. जणुं कांहीं, आपल्या जवळची किल्ली चालवून आपण खोलींत आलों खरें; पण आंत आल्यानंतर आपण काय करावें, याबद्दलचा त्याच्या मनाचा निश्चय अद्याप ठरला नव्हता. सिगारेटचे दोन तीन झुरके घेऊन त्यानें ती घाईघाईनें विझवून बाहेर फेंकून दिली; कोटाच्या आंतल्या खिशांतून दोन किल्ल्या काढल्या; व त्यांपैकीं एक चालवून त्यानें टेबलाचा खण उघडला.

त्या खणांत फाइलींची चळत व्यवस्थित बांधून ठेविलेली होती; व तांबड्या पेन्सिलीनें 'कॉन्फिडेंशियल्' असे शब्द तिच्यावर लिहिलेले होते. ते शब्द पाहिल्यावर क्षणार्ध त्याच्या मनांत विचार येऊन गेला कीं, या फाइली एकवार चाळून बघाव्या. म्हणून त्यानें ती चळत बाहेर काढून तिला गुंडाळलेली फीत सोडली; व त्यांपैकीं पहिली फाइल उघडून चाळावयाला प्रारंभ केला.

तोंच त्याच्या मनांत काय कल्पना आली कोण जाणे! त्यानें घाईघाईनें ती चळत तशीच खणांत ठेविली; व किल्ली चालवून दुसरा खण उघडला.

तो खण उघडतांच जिज्ञासा आणि आनंद यांची चमक एकदम त्याच्या डोळ्यांत खेळली; आपण कशा रीतीनें त्या खोलींत आलो आहोंत याचा विसर पडून त्यानें शीळ घालायला प्रारंभ केला; व त्या खणांत असलेले निरनिराळ्या आकाराचे तीन कोरे करकरीत रिव्हॉल्वर त्यानें बाहेर काढून टेबलावर ठेवले.

ते रिव्हॉल्वर त्यानें भराभर एकामागून एक न्याहाळून पाहिले; व त्यांतील एक छोटा रिव्हॉल्वर बाजूला काढून बाकीचे पुन्हा खणांत ठेवून दिले.

आणि, तो किल्ली चालवून खण पूर्वीसारखा बंद करात आहे, तोंच दार वाजल्याचा आवाज त्याच्या कानांवर आला—

त्याबरोबर एकदम टेबलावर ठेवलेला रिव्हॉल्वर त्यानें उचलला आणि दार कोणी ढकललें आहे, हें न पाहतांच घाईघाईनें उठून तो दाराच्या दिशेनें रोखला.

" —अग बाई ! उमा ! मी काय पहाते हें !— "

—हे शब्द त्याच्या कानांवर पडतात न पडतात, तोंच ते उच्चारणारी व्यक्ति धाडदिशीं खालीं पडली.

तत्क्षणींच त्याच्या लक्षांत आलें, आपण जिच्यावर रिव्हॉल्वर रोखला, ती व्यक्ति दुसरी तिसरी कोणी नसून, विजया आहे—

त्यानें रिव्हॉल्वर कसा बसा विजारीच्या खिशांत कोंबला आणि तो तिच्या-जवळ आला—

ती अगदीं निचेष्ट पडली होती. श्वासागणिक कंपित होणाऱ्या तिच्या त्या नाजूक नाकपुड्या आणि वरखालीं होणारें तें उन्नत वक्षःस्थल !—त्याला कळून चुकलें कीं, आपल्याला त्या खोलींत तशा स्थितीमध्यें पाहून तिला आश्चर्यानें आणि भीतीनें मूर्छा आली.

तिची ती अवस्था पाहून तो अतिशयच घाबरला; व त्याच्या मनांत चटकन अशी कल्पना आली कीं, ताबडतोब कोणाला तरी हांक मारून बोलावावें—

पण लगेच त्याच्या ध्यानांत आलें कीं, आपण अशा रीतीनें त्या खोलींत आल्याचें जर तिसऱ्या माणसाला कळलें, तर त्याचे परिणाम फार भयंकर होतील—

त्याबरोबर त्यानें ती कल्पना सोडून दिली व असें ठरविलें कीं, तिला उचलून तिच्या खोलींत नेऊन ठेवावयाची --त्याशिवाय दुसरी गति नाहीं.

म्हणून तो खालीं वांकला व त्यानें तिला अलगत उचलली.

तिचा स्पर्श त्याच्या शरीराला होण्याचा तो पहिलाच प्रसंग होता. तिचें उजवीकडलें कानशील त्याच्या गालाला भिडलें; तिचा धडधडणारा उरोभाग त्याच्या छातीला भिडला.---

तिच्या त्या स्पर्शानें त्या स्थितींत सुद्धां त्याच्या अंगावर रोमांच उठले आणि आपल्या हातांवर रेललेलें तिचें नाजूक शरीर त्यानें घट्ट हृदयाशीं धरलें.

: तिच्या खोलीचें दार उघडेंच होतें. त्यानें तिला हळूच तिच्या पलंगडीवर ठेवली; व लगेच बाहेर येऊन यादवरावांच्या खोलीला कुलूप लावलें. नंतर तो पुन्हा तिच्या खोलींत आला आणि त्यानें विजेचा पंखा तिच्या उशाशीं ठेवून तो सुरू केला.

तो टकमका तिच्याकडे पाही; स्वतःच्या कपाळाला, तोंडाला आणि मानेला येणारा घाम सारखा पुशी, तिच्या कानांजवळ वारंवार आपलें तोंड नेऊन कांहीं तरी कुजबुजे.---पण त्याला सुचेना, तिला शुद्धीवर आणण्यासाठीं काय करावें तें !

तिचें सौंदर्य त्यानें डाळ्यांनीं आजपर्यंत अनेकदां पाहिलें होतें. पण आज त्या सौंदर्याचा स्पर्श त्याला प्रथमच झाला होता; तिच्या मृदुगौर शरीराचें आलिंगन त्याला प्रथमच घडलें होतें.

त्या आलिंगनानें त्या भयदायक परिस्थितींतहि त्याच्या मनांत जे अननुभूत भाव उत्पन्न केले होते; त्यांची उत्कटता अद्यापहि कमी झाली नव्हती. किंबहुना, तिच्या अंगावरील वस्त्रें अस्ताव्यस्त होऊन तिचा उरोभाग आतां बहुतेक अनावृत झालेला असल्यामुळें तिच्या त्या वस्त्रविरहित, विलोभनीय गात्रांकडे तो अतृप्त मनानें पहात होता. मानेपासून उरोजांपर्यंत क्रमाक्रमानें उन्नत होत गेलेलें गोरेंपान वक्षःस्थल, बॉडिस घातलेलें नसल्यामुळें गुंड्या सुटलेल्या, सैल ब्लाऊजमधून दिसणारे रेखीव उरोज, नीविबंधापर्यंत निमुळता होत

गेलेला नितळ कटिप्रदेश, विस्कटलेल्या पातळाच्या निळसर रंगामुळें खुलून दिसणाऱ्या गोंडस जंघा !–

तो अतृप्त पण अनागस मनानें तिच्या त्या अर्धावृत यौवनाकडे टक लावून पहात होता.

तिच्याकडे पहातां पहातांच त्याच्या मनांत कल्पना आली की, तिच्या शरीराला जर आपण कांहीं एका पद्धतीनें स्पर्श केला, तर तिची बधिर झालेली संवेदनक्षमता कदाचित् जागृत होईल–

म्हणून त्यानें तिचे हात आपल्या हातांत घेऊन हळूच दाबले आणि विशेषतः तिच्या बोटांचीं नाजूक अग्रें आपल्या बोटांच्या अग्रांना दृढतेनें भिड-विलीं. पण तिची निश्चेष्टता कमी झाली नाहीं. तेव्हां त्यानें तिचे ते थंड हात आपल्या गरम झालेल्या डोळ्यांवर आणि कपाळावर हळूच दाबले.—

तरीहि कांहींच संवेदना उत्पन्न होण्याचें लक्षण दिसेना.

तिची ती विलक्षण निश्चेष्टता पाहून आतां मात्र त्याला पराकाष्ठेचें भय वाटलें. पण, मदतीसाठीं कोणाला हांक मारून बोलवावें, हेंहि त्याला इष्ट वाटेना. तिच्या तोंडावर पाण्याचा हबका मारून पहावा, अशीहि एक कल्पना त्याच्या मनांत येऊन गेली. पण तिच्या प्रसाधनाच्या छोट्या बदामाकृति टेबलावर ठेवलेल्या कांचेच्या सुंदर निळ्या सुरईत पाण्याचा एक थेंबहि नव्हता; व बाहेर जाऊन पाणी आणणें तर अगदीं धोक्याचें होतें.

शेवटीं, अखेरचा एक उपाय म्हणून, त्यानें तिच्या मस्तकाखालीं आपला हात घातला; व तें किंचित् वर उचलून तिच्या नासाग्राला आपलें नासाग्र भिड-विलें. जणुं कांहीं, तिचा आणि आपला श्वास एक झाला, म्हणजे तिच्या हृदयाला आपल्या हृदयाची ओळख पटून आणि हांक पोंचून ती जागी होईल, अशी कल्पना त्याच्या मनांत आली.

कारण कोणतेंहि असो. ती त्याची कल्पना सफल होऊन विजया एकदम शुद्धीवर आली; व तिनें डोळे उघडल्यावर अगदीं अनपेक्षित रीतीनें तिची दृष्टि

जशी त्याच्या दृष्टींत मिसळली, तसे बोलण्याचा प्रयत्न करितांच ओठहि ओठांत मिसळले.

पण क्षणभरच.

तो एकदम बाजूला झाला आणि त्यानें तिचें मस्तक पुन्हा हळूच उशीवर ठेविलें.

त्याबरोबर तिच्या तोंडून उद्गार निघाला, "उमा !—"

"काय विजू ? तुला बरं वाटतंय ना आतां ?"

त्यानें तो प्रश्न विचारतांच तिच्या डोळ्यांतून अश्रूंचा पूर लोटला. त्यानें लगेच तिच्या गालाला आपला गाल भिडाविला; तिचे हात आपल्या हातांत घेऊन दाबावयाला सुरवात केली; व तिचें सांत्वन करावें म्हणून तो कांहींबाहीं तिच्या कानांत कुजबुजूं लागला.

त्याच्या त्या स्पर्शानें म्हणा किंवा बोलण्यानें म्हणा ती आतां पूर्ण शुद्धीवर आली; व आपला हात त्याच्या गळ्यांत घालून तिनें त्याला विचारलें—

'उमा, तूं काय केलंस हें ?'

पुन्हा तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले; तिच्या तोंडांतून शब्द बाहेर फुटेना.

थोडा वेळ थांबून ती त्याला म्हणाली, "उमा, माझ्या ऐवजी साहेब जर त्या वेळीं तिथं आले असते तर—"

"—तर त्यांनीं मला सरळ फोन करून पोलिसच्या ताब्यांत दिला असता. आणि अजूनहि त्यांना हा घडलेला प्रकार कळला, तर तीच गोष्ट करतील ते—"

"हा प्रकार त्यांना कळणार नाहीं;—निदान माझ्या तोंडून तरी कळणार नाहीं—"

"खरं ? अगदीं खरं ?" त्यानें तिच्या तोंडाला तोंड भिडवून विचारलें.

"होय. अगदीं खरं ! माझ्यावर इतका विश्वास नाहीं का रे तुझा ? मीं काय केलं म्हणजे खात्री होईल तुझी ?—"

"माझ्या गळ्यावर हात ठेव न् तेच शब्द उच्चार पुन्हा—"

तिनें त्याच्या गळ्यावर हात ठेवला. पण पुन्हा तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. आणि तिच्या तोंडांतून शब्द बाहेर पडेना.

" पुरे ! तूं शब्द नाहीं उच्चारलेस, तरी माझं समाधान झालं एवढ्यानं—"

बोलतां बोलतां तो खालीं वांकला आणि एक प्रकारच्या उन्मादाच्या भरांत त्यानें तिच्या कपाळाचें, डोळ्यांचें, नासाग्राचें, गालांचें आणि ओठांचें भराभर चुंबन घेतलें.

त्यानें कदाचित् आणखीहि चुंबनें घेतलीं असतीं. पण तिनें आपला हात त्याच्या ओठांवर ठेवला.

त्याबरोबर त्यानें तिच्या अंगुलींना दंश केला.—

तेव्हां ती किंचित् विवळून पण लाडिकपणानें उद्गारली, " हें रे काय ? तुझ्या अंगांत आज कसला संचार झाला आहे, उमा ?—"

" कांहीं नाहीं ! तुझ्या मूर्च्छेनं मला मोहित केलं, विजू !—"

त्यानें पुन्हा तिच्या कपाळाचें चुंबन घेतलें.

तेव्हां हातांनीं त्याला बाजूला ढकलण्याचा प्रयत्न करीत ती म्हणाली; " तूं कीं नाहीं जा आतां ! नाहीं तर हा सारा प्रकार ध्यानांत येईल घरांतल्या मंडळीच्या. मा समजत असेल, मी निजलें आहे माझ्या खोलींत. ती मला उठवायला येण्यापूर्वीं तूं जा न् बाहेरून दार घट्ट ओढून घे—"

तिचें तें बोलणें त्याला पटलें आणि तो जाण्यासाठीं उठला.

तथापि उठतां उठतां त्यानें तिला विचारलें, " पण विजू, तूं माझ्या गळ्यावर हात ठेवला आहेस, हें लक्षांत आहे ना तुझ्या ?—"

" हो—"

तिनें त्याच्या बोटाचीं अग्रें आपल्या ओठांवर दाबीत उत्तर दिलें.

पण उमा गेल्यावर तीन तासांच्या आंतच तो सारा प्रकार तिच्या तोंडून यादवरावांना कळला; नव्हे तिला सांगावा लागला.

पांचच्या सुमाराला कचेरींतून परत आल्यावर यादवराव जों खोली उघडून आंत पाऊल ठेवतात, तोंच गालिच्यावर पडलेला पारव्या रंगाचा तलम

रेशमी रुमाल त्यांच्या दृष्टीस पडला. तो रुमाल त्यांनीं आश्चर्यानें उचलला आणि लगेच त्यांच्या लक्षांत आलें कीं, तो विजूचा आहे.

त्याबरोबर ते अगदीं सुन्न होऊन गेले.

आपल्या त्या खाजगी खोलीला बाहेर जातांना स्वतः कुलूप लावण्याचा त्यांचा नेम असे; व बाहेरून परत आल्यावर ते स्वतःच आपल्या हातांनीं कुलूप काढून खोली उघडीत असत. आपल्या अत्यंत विश्वासांतल्या त्या म्हाताऱ्या चपराशावरसुद्धां त्यांनीं कधीं हें काम सोंपविलें नव्हतें. कारण, शहरांतील निरनिराळ्या अड्ड्यांतून खाजगी रीतीनें मिळविलेल्या नाना प्रकारच्या माहितीचीं टिपणें, कागदपत्र आणि पुराव्याच्या इतर निशाण्या हें सर्व साहित्य त्या खोलींतील टेबलाच्या खणांत ठेवलेलें असे. म्हणून त्यांनीं असा अगदीं सक्त नियम करून ठेवला होता कीं, आपल्या शिवाय कोणीहि ती खोली उघडावयाची नाहीं; व आपण हजर नसतांना कोणालाहि तींत पाऊल घालूं द्यावयाचें नाहीं.

त्यामुळें विजयेचा तो रुमाल बघितल्यावर ते अगदीं थक्क होऊन गेले. त्यांना कळेना, आपल्या खोलींत तो रुमाल कसा आणि केव्हां आला तें. त्यांनीं नीट आठवण करून पाहिली, आज सकाळपासून एकदांहि विजया त्यांच्या खोलींत आलेली नव्हती. मग हा तिचा रुमाल आपल्या खोलींत कसा आला?"

ते दार बंद करून तसेच घाईघाईनें खालीं आले; व त्यांनीं चपराशाला विचारलें, " काय रे, आज दुपारीं कोणीं आलं होतं का आपल्या घरीं ? "

" नाहीं, साहेब ! छोट्या बाई एकाच्या सुमारास कॉलेजांतून आल्या; व त्याच्या मागून अर्ध्या तासानं उमाकांत आले—छोटे साहेब तर अजूनहि आलेले नाहींत. उमाकांताशिवाय कोणीहि बाहेरचा माणूस आलेला नाहीं. "

" केव्हां आला म्हणतोस उमा ? "

" मी घड्याळ पाहिलेलं नाहीं. पण छोट्या बाईच्या मागून अर्ध्या पाऊण तासानं दीड दोनच्या सुमारास आले असतील—"

" आणि गेला केव्हां ? "

" दीड दोन तासांनीं चारच्या सुमारास गेले—"

त्याच्याशीं नंतर एक शब्दहि न बोलतां ते तसेच मधल्या दिवाणखान्यांत आले; व झोंपाळ्यावर बसलेल्या आपल्या पत्नीला म्हणाले, " उमा केव्हां आला होता माहीत आहे तुम्हांला ? "

" नाहीं. विजू आली, तेव्हां जागी होतें मी. त्यानंतर माझा डोळा लागला. तो आला होता आज ? मग चहा घेतल्याशिवाय कसा गेला ? विजू तर कांहीं बोलली नाहीं मजजवळ तो आल्याचं ! "

" ती कुठं आहे ? " त्यांनीं त्रासिक आवाजांत विचारलें.

" तिचं डोकं दुखतंय म्हणून खोलींतच पडून राहिली आहे आपल्या ! "

आपल्या पत्नीचे ते शब्द कानांवर पडतांच ते तसेच धाडधाड जिना चढून वर आले; व विजयेच्या खोलीचें दार जोरानें उघडून तिला म्हणाले—

" काय झालंय ग तुझं आज डोकं दुखायला ? "

विजया पलंगावर निपचित पडून झालेल्या प्रकाराचा एकसारखा विचार करीत होती.

त्यांचे ते अगदीं अनपेक्षित अशा करड्या आवाजांत उच्चारलेले शब्द कानांवर आदळतांच ती अगदीं भेदरून गेली आणि आपल्याला पुन्हा भोंवळ येते कीं काय असें तिला वाटलें.

ते तिच्या अगदीं जवळ आले आणि निर्ढावलेल्या गुन्हेगारांच्या अंतर्यामाचा भेद करण्यांत अत्यंत कुशल असलेली आपली ती घारी, कठोर दृष्टि तिच्यावर रोंखून म्हणाले—

" विजू, हा तुझा रुमाल माझ्या खोलींत कसा आला ? "

त्यांनीं ते शब्द उच्चारले मात्र, तिनें एकदम जोराचा हुंदका दिला.

तिचा त्या हुंदक्यानें त्यांनीं धारण केलेली सारी उग्रता ढासळून गेली; व तिच्या शेजारीं बसून तिच्या अंगावर हात फिरवीत ते म्हणाले—

" विजू, भिऊं नकोस बेटा. मला खरं खरं सांग. हा तुझा रुमाल माझ्या खोलींत कसा आला ?—"

पण तिच्या तोंडून शब्द बाहेर पडेना. पित्याच्या भीतीनें दाबून धरलेल्या हुंदक्यांमुळें तिचें सारें शरीर सारखें हादरत होतें.

तिची ती भयग्रस्त केविलवाणी स्थिति पाहून त्यांचें मन आतां अगदीं पूर्णपणें विरघळलें; व तिचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन ते म्हणाले—

" विजू, मी आजपर्यंत कधींहि तुझ्यावर रागावलों नाहीं, कधींहि तुला कडू शब्द बोललों नाहीं. तुझ्याइतकं मला या जगांत दुसरं कोणीहि प्रिय नाहीं, हें माहित आहे तुला !—आज हा तुझा रुमाल जेव्हां मी माझ्या खोलींत पाहिला, तेव्हां प्रथम स्वतःच्या डोळ्यांवर विश्वास बसेना माझा !—खरं सांग, बेटा ! तूं कधींपासून आपल्या भावाच्या फंदांत सामील झालीस ?—"

" नाहीं, साहेब ! मी कोणाच्याहि फंदांत सामील झालें नाहीं आणि होणारहि नाहीं. पण हा प्रश्न आपण विचारूं नका मला—"

आणि ती पुन्हा स्फुंदस्फुंदून रडू लागली.

ते ताडदिशीं पलंगावरून उठले आणि खोलींत फेऱ्या घालू लागले.

विजया रडत होती; ते फेऱ्या घालीत होते.

तिच्या रडण्याचा भार ओसरल्यावर ते तिच्याजवळ आले आणि कठोर आवाजांत म्हणाले, " पोरी ! इमान ही चीजच नाहीं का ग उरली दिवसेंदिवस जगांत ? पोटच्या गोळ्यांनीं आईबापांचे गळे कापायचे फंद करावेत—"

त्यांना एकदम पुन्हा रागाची लहर आली; व ते अत्यंत कठोर आवाजांत उद्गारले, " चल, बोल लवकर, पोरी ! काय झालं, कशी माझ्या खोलींत गलीस, कोणाला घेऊन गेलीस—भराभर सांग मला सगळं ! "

" साहेब, मी आपण होऊन नाहीं हो गेलें तुमच्या खोलींत ! " विजयेनें रडत रडत त्यांना उत्तर दिलें.

" आपण होऊन नाहीं गेलीस ? मग कोणी नेली तुला ? उमानं ?—बोल बोल लवकर—"

त्यांनीं अतिशय कठोर आवाजांत उच्चारलेले ते शब्द म्हणजे जणुं हंटरचे तडाखेच वाटले तिला. ती ताडकन बिछान्यावरून उठली व संतापानें बेफाम झालेल्या आपल्या पित्याचे पाय धरून रडत रडत म्हणाली—

" साहेब, रागावू नका हो माझ्यावर ! खरंच मी कांहीं सुद्धां केलं नाहीं. तुम्हांला न आवडण्यासारखी गोष्ट माझ्या हातून आजपर्यंत कधीं तरी घडली आहे का ? खरंच, मी आपण होऊन नाहीं हो गेलें तुमच्या खोलींत?—"

त्यांचें मन पुन्हा अगदीं विरघळून गेलें. त्यांनीं तिला जवळ जवळ उचलूनच पलंगावर निजविलीं आणि तिच्या अंगावरून हात फिरवीत ते म्हणाले—

" शांत हो, बेटा ! न् मला खरं खरं सांग काय घडलं तें—"

" साहेब ! मी गळ्यावर हात ठेवून वचन दिलंय ! तुम्ही तें मोडायला नका हो लावूं मला ! मी तुमचा रिव्हॉल्वर परत आणून देईन—"

तिच्या तोंडून ते शब्द बाहेर पडतांच त्यांनीं तिचे हात एकदम सोडून दिले आणि ते पुन्हा संतप्त होऊन उद्गारले—

" काय ? उमानं माझा रिव्हॉल्वर चोरला न् तूं त्या चोरींत सामील ? विजू, विजू, त्याच्या गळ्यावर हात ठेवून माझा गळा कापायचं वचन दिलंस तूं त्याला !—"

" साहेब ! साहेब ! मी पायां पडतें ! नका हो असं बोलूं मला ! मी खरंच कांहीं केलं नाहीं ! मी तुमच्या खोलींत गेलें नाहीं; तुमच्या रिव्हॉल्वरला हात लावला नाहीं. तुम्हांला राग येण्यासारखी गोष्ट मी कधीं तरी केली आहे का आजपर्यंत ?—"

' रडूं नको, पोरी ! पण मला खरं खरं सांग नीट ! असं अर्धवट बोलून संताप वाढवूं नकोस माझा !—"

ते पुन्हा तिच्या जवळ जाऊन आणि तिचे हात आपल्या हातांत घेऊन उद्गारले.

' पण साहेब, तुम्ही रागावणार नाहीं ना माझ्यावर पुन्हां ? मी कांहीं सुद्धां केलं नाहीं हो ! "

" नाहीं, नाहीं, बेटा ! तुझ्यावर मुळींसुद्धां रागावलों नाहीं मी—"

" पण तुम्ही क्षमा केली पाहिजे—"

" तुझ्यावर मी रागावलोंच नाहीं, तर क्षमा कशाबद्दल करूं ? सांग, सांग आतां लवकर—"

" नाहीं. क्षम मला नव्हे, उमाला! तरच मी सांगेन तुम्हाला सारी हकिकत !– "

त्यांनीं आजवर कधींहि न अनुभविलेला असा निश्चयाचा कठोर ध्वनि तिच्या त्या रडत रडत उच्चारलेल्या शब्दांत भरलेला होता.

ते शब्द ऐकतांच त्यांच्या संतापानें एकदम उचल खाल्ली. पण क्षणभरच. लगेच तो आवेग आवरून ते तिला म्हणाले–

" ठीक आहे. तूं मला सगळं खरं खरं सांगितलं पाहिजेस मात्र– "

" सांगतें आणि तुमचा त्यानं नेलेला रिव्हॉल्वरहि परत आणून देतें—"

" रिव्हॉल्वर परत आणायचा कीं नाहीं हें मागाहून ठरवूं आपण ! फक्त तूं हकीगत सांग मला सगळी; न् त्याला मात्र मुळींच कधीं कळतां कामा नये, तूं सारं कांहीं मला सांगितलं आहेस हें !—"

" पण तुम्ही त्याला पूर्ण क्षमा कराल ना ?— पोलिसच्या ताब्यांत नाहीं ना देणार ?— "

" वेडे, मला द्यायचा झाला, तर मी आतांहि देऊं शकत नाहीं का ? मी तुला एकदां कबूल केलं ना त्याला क्षमा केल्याचं—"

नंतर तिनें त्यांच्या खोलींत घडलेला सारा प्रकार त्यांना सांगितला.

आणि तें सारें त्यांना सांगून झाल्यावर ती किती तरी वेळ एकटीच ओक्साबोक्शी रडत होती.

१

# कच्चें मडकें

१

ठाकूरभवन, नागपूर
१ मार्च १९३०

प्रिय जयंता,

आज दुपारीं माझ्या हातून अचानक घडलेल्या धाडसाची जी हकीकत मी लिहित आहे, ती वाचून तुला तर आश्चर्य वाटेलच. पण माझें मलाहि राहून राहून सारखें नवल वाटत आहे.

मी कांहीं तुझ्यासारखा किंवा जयासारखा धाडसी नाहीं, किंबहुना मला वाटतें, गेल्या उन्हाळ्यांत मुंबईला केशवमुळें तुझी ओळख होऊन जर आपला संबंध आला नसता, तर माझ्या आयुष्याला हें वळण कदाचित् मुळींच लागलें नसतें. काल जें कृत्य माझ्या हातून अनपेक्षित रीतीनें घडलें, त्याचें श्रेयसुद्धां जयालाच खरोखर दिलें पाहिजे. कारण त्या साहसाची पूर्व तयारी त्यानेंच एका परीनें केली होती. पण माझ्या हातून जी गोष्ट घडली, ती मात्र त्याच्या कल्पनेपलिकडली आहे.

तूं पाठविलेलें पार्सल मधल्या मध्यें बेपत्ता झाल्यापासून आम्ही सारखे त्याचा तपास लावण्याच्या विवंचनेंत आहों. जयाची अशी पक्की खात्री कीं तें पार्सल गहाळ झालेलें नसून, काकांनीं तें आपल्या ताब्यांत

घेतलें असलें पाहिजे. त्यामुळें तो चिडल्यासारखा झाला होता; व त्यांच्या खाजगी खोलींत प्रवेश करून त्यानें त्याचा पत्ता लावण्याचा निश्चय केला.

पण हा निश्चय पार पाडणें सोपें नव्हतें. काका आपली खोली स्वतःशिवाय कोणाला उघडूं देत नाहींत; व स्वतःच्या गैरहजेरींत तींत कोणाला प्रवेशहि करूं देत नाहींत. आणि ते खोलींत असतांना आंत जाऊन कांहींहि पत्ता लागण्यासारखा नव्हता. पण जयानें मोठ्या चातुर्यानें या अडचणींतून मार्ग काढला. त्यानें एक दिवस, काका विजूशीं बोलण्यांत गर्क झालेले आहेत असें पाहून, त्यांच्या खोलीच्या टेबलावर पडलेल्या किल्लीचा ठसा मेणावर घेतला; व दुसऱ्या दिवशीं तशा प्रकारची किल्ली तयार करून आणली. पण तेवढ्यानें भागण्यासारखें नव्हतें. त्यांच्या टेबलाच्या खणांच्याहि किल्ल्या करणें जरूर होतें; व त्याहि जयानें त्याच युक्तीनें करून आणल्या. याप्रमाणें किल्ल्या तयार करून घेतल्यावर आम्ही दोघांनीं एक दिवस त्यांचा उपयोग करून काकांची खोली उघडून पाहिली; व नंतर असें ठरविलें की, काका शिकारीला किंवा दौऱ्याला गेल्यावर त्यांच्या गैरहजेरींत खोलींत प्रवेश करून पार्सलाचा पत्ता लावावयाचा.

पण त्याचा पत्ता लावण्याचें श्रेय आज दुपारीं अचानक माझ्या पदरीं पडलें. जयानें तयार केलेल्या त्या किल्ल्यांचा एक जोड माझ्याजवळ होता. आज दुपारीं मी कॉलेजांतून जयाकडे गेलों असतां, बंगल्यांत सर्वत्र अगदीं सामसूम असल्याचें पाहून, त्या किल्ल्यांचा उपयोग करण्याची अनावर इच्छा मला झाली. त्याप्रमाणें मी खोलींत प्रवेश करून घेतला; व आंत गेल्यावर खणांच्या किल्ल्या चालवून तेहि उघडले. त्यांपैकीं एका खणांत तूं आपल्या पत्रांत वर्णन केलेले ते तीन रिव्हॉल्वर सांपडले. त्यांतला एक मी घेतला; व पुन्हा खोली आणि खण पूर्वीप्रमाणें बंद करून टाकलीं.

हें साहस माझ्या हातून कसें घडलें, याचें राहून राहून मला सारखें नवल वाटत आहे. त्या किल्ल्यांचा उपयोग करून जयाबरोबर मी पहिल्यांदा जेव्हां काकांच्या खोलींत गेलों, तेव्हां भीतीनें माझी अगदीं गाळण उडाली होती. त्यामुळें एकट्यानें ती खोली उघडून रिव्हॉल्वर लांबविण्याचें धैर्य मी कधीं करूं शकेन, असें स्वप्नांतहि मला वाटलें नव्हतें. जयाशीं मी अद्याप या बाबतींत कांहींच बोललेलों नाहीं. म्हटलें, सर्वांच्या आधीं या बातमीवर तुझा हक्क आहे, व म्हणून तुलाच ती प्रथम कळवावी. जयानें पार्सल न मिळाल्याचें कळविल्यापासून तुझें पत्र नाहीं. मला वाटतें, माझ्या या धाडसाची बातमी कळल्यावर तरी तूं आपलें मौन सोडशील. जयाला तूं पाठविलेल्या पार्सलचा पत्ता काकांच्या खोलींत लागावा, ही घटना किती चमत्कारिक आणि भीतिदायक आहे!

तुझ्या पत्राची आम्ही सारेच उत्कंठेनें वाट पहात आहों.

तुझा
उमाकांत

२

कृष्णा बिल्डिंग, परळ
३ मार्च १९३०

प्रिय उमा,

तुझ्या साहसी कृत्याची हकीकत वाचून मला तुझें कौतुक वाटलें खरें; पण त्याबरोबरच अनेक शंकाहि माझ्या मनांत येऊन गेल्या.

मी पाठविलेलें पार्सल न पोंचल्याचें पत्र जयाकडून आल्यापासून माझें मन अत्यंत चिंताग्रस्त झालें होतें. तुझ्या पत्रामुळें पार्सलाचा पत्ता लागल्याचें समाधान मिळालें, हें कांहीं खोटें नाहीं. पण, तें समाधान,

मला वाटतें, परिणामीं फार महाग पडणार आहे. त्यांतल्या त्यांत सुदैव एवढेंच कीं, पार्सल पाठवितांना तें स्वतःच्या नांवानें न पाठवितां, क्रॉफर्ड मार्केटांतील माझ्या ओळखीच्या एका अडत्याच्या नांवानें पाठविण्याची काळजी मी घेतली होती. स्वतःच्या नांवानें जसें मी पार्सल पाठविलें नाहीं, तसेंच तें जयाच्याहि नांवानें पाठवावयाला नको होतें. पण 'बुद्धिः कर्मानुसारिणी' हेंच खरें. नाहीं तर, नेहमीं पत्रें सुद्धां श्यामाच्या नांवानें पाठविणारा मी अशा तऱ्हेची ढोबळ चूक खास करतों ना!

उमा, तुझी पक्की खात्री आहे का कीं यादवरावांच्या खोलींत असतांना तुला कोणी पाहिलें नाहीं? पुष्कळदां आपल्याला असें वाटतें कीं, आपल्या हालचालींवर कोणाचीहि नजर नाहीं. पण उद्देशानें म्हणा वा अनुद्देशानें म्हणा, आपल्या वर्तनाकडे अनेकांची बारीक दृष्टि असते; व आपण जें कृत्य अगदीं गुप्त म्हणून करितों त्याचेसुद्धां साक्षीदार पुढें मागें अचानक उभे राहातात. म्हणून विचारतों, तूं त्या खोलींत असतांना खरोखरीच तुला कोणी पाहिलें नाहीं ना? दुसरी गोष्ट अशी कीं, रिव्हॉल्वर सांपडल्याच्या आनंदांत तूं त्या खोलींत स्वतःची कांहीं वस्तु विसरून तर आला नाहींस? रुमाल, फाउंटन पेन किंवा नोटबुक? रिव्हॉल्वर चोरीस गेल्याचें यादवरावांच्या लक्षांत येतांच ते आकाशपाताळ एक करतील व चोरी करणाराचा तपास लावण्यासाठीं सारीं साधनें उपयोगांत आणतील. म्हणून, मला वाटतें, तूं अत्यंत जपून राहिलें पाहिजेस. रिव्हॉल्वरचा पत्ता लागल्याचा आनंद मला खरोखरी तव्हांच वाटेल कीं, जेव्हां तूं इतक्या साहसानें केलेलें हें कृत्य पचून आपल्या उद्देशाच्या पूर्ततेसाठीं त्याचा उपयोग होईल.

रिव्हॉल्वर तूं कोठें ठेवणार आहेस? मला वाटतें, शक्य तितक्या लवकर श्यामाच्या स्वाधीन केलेला बरा. तसेंच जयालाहि तूं तावडतोब सावध कर. मला फार भीति वाटते,—हें साहस कांहीं आपल्याला पचणार

नाहीं. म्हणून, यापुढें जें जें कांहीं घडेल, त तें तूं मला जरूर तर रोज पत्र टाकून कळविलें पाहिजेस.

तुझा
जयंता

३

कृष्णा बिल्डिंग, परळ
३ मार्च १९३०

प्रिय जया,

उमाला लिहिलेल्या पत्राची शाई वाळते न वाळते, तोंच हें पत्र मी तुला लिहावयाला घेतलें आहे.

परवां दुपारीं तुझ्या घरीं त्यानें केलेल्या साहसाची हकीकत आतां-पर्यंत तुला कळलीच असेल. त्याबद्दलचें पत्र वाचल्यापासून माझें मन इतकें कांहीं बेचैन झालें आहे कीं, दुपारीं प्रयोग करितांना माझ्या हातून घडूं नयेत त्या चुका घडल्या;—प्रॅक्टिकलचा पाठ देत असतांना ट्यूब फुटली आणि ॲसिड हातावर सांडून हात भाजला. प्रो. रानडे मला म्हणाले,—" चितळे, आज तुम्ही कसल्या तरी काळजींत दिसतां ! "

तास संपल्यावर मी तडक बस गांठली आणि 'सेसिल'मध्यें बसून हीं पत्रें लिहित आहे. मला निवांतपणा हवा होता. तो इथें अगदीं भरपूर आहे. नाहीं म्हणावयाला, वारा मात्र इतक्या सोसाट्यानें वहातो आहे कीं, त्याच्यापुढें माझ्या मनांतील विचारांचें थैमान सुद्धां सौम्य ठरेल ! समोरच्या गुलमुऱ्याचीं वाऱ्याच्या झोताबरोबर गळत असलेलीं पानें ऋतु बदलत असल्याची साक्ष देत आहेत. माणसांच्या मनाला खिळलेले संस्कार आणि विचार जर असेच वारंवार गळून पडून जाते,

तर मानवजातीच्या प्रगतीचा प्रश्न किती सुकर झाला असता ! मृत्यु हा फक्त जीर्ण झालेल्या शरीरांचा नाश करितो. पण जीर्ण झालेल्या तत्त्वांचा आणि ध्येयांचा नाश करण्यासाठीं माणसांना केवढी धडपड करावी लागते ! वसंताच्या आगमनासाठीं सृष्टींतील सारी जीर्णता झोडपून-झाडून काढीत असलेला हा वारा !—हा कांहीं मला स्वस्थपणानें पत्र लिहून देत नाही.

जया, तुझ्या वडिलांच्या खोलींत असतांना उमाला कोणी पाहिलें नाहीं, अशी तुझी पक्की खात्री आहे का ? खरोखरी, झाला हा प्रकार व्हावयाला नको होता. या सगळ्या वाईटांतून जर कांहीं चांगलें निष्पन्न झालें असेल, तर तें एवढेंच कीं, तुला मी पाठविलेलें रिव्हाॅल्वर तुझ्या वडिलांनीं मधल्या मध्यें स्वतःच्या ताब्यांत घेतल्याचा नक्की पत्ता आपल्याला लागला. माझी कल्पना अशी आहे कीं, रिव्हॉल्वर आपल्या खोलींतून चोरीस गेल्याचें पाहिल्याबरोबर त्यांना तुझी शंका येईल; व त्या शंकेच्या आहारीं जाऊन रागाच्या भरांत त्यांनीं तुला पोलिसांच्या स्वाधीन केलें, तरीहि मला त्याचें नवल वाटणार नाही. तसा कांहीं प्रसंग ओढवलाच, तर तूं घडलेल्या सगळ्या प्रकाराची जबाबदारी एकट्यावर घे. उमाला त्यांत कोणत्याहि रीतीनें गोवूं नकोस. तें अगदीं कच्चं मडकें आहे.

तुझा संशय आल्यावरहि ते कदाचित्, अपत्यप्रेमामुळें, तुला पोलिसांच्या स्वाधीन न करतां खाजगी रीतीनें ताकीद देऊन आपसांत हें प्रकरण मिटवितील. तसें जर घडलें, तर जिवावरलें शेंपटावर निभावलें, म्हणून आनंद मानावयाला तूर्त हरकत नाहीं. पण एवढी गोष्ट मात्र खरी कीं, ते आपल्या पाळतीवर आहेत—आपल्या हालचालींचा त्यांना चांगलाच सुगावा लागला आहे. उमाचें पत्र वाचल्यावर जर माझ्या मनांत कोणता विचार प्रथम आला असेल, तर तो हाच; व त्यामुळें माझें मन अत्यंत अस्वस्थ झालें आहे. कांहींहि झालें, तरी आतां

आपल्याला निराळा मार्ग काढला पाहिजे. नाहीं तर आपण केव्हां पकडले जाऊं, याचा कांहीं नेम नाहीं.

जया, त्यांनीं जर तुला पोलिसांच्या स्वाधीन केला, तर कसें वागावयाचें हें मी तुला सांगण्याची गरज नाहीं.—पण ते धूर्त आहेत व बहुधा तुला समजूत देऊन गप्प बसतील. त्यांच्या हालचालींवर तूं बारीक नजर ठेव; व जें काय घडत जाईल तें मला ताबडताब कळव.

उमानें मला जितक्या हर्षानें पत्र धाडलें तितकेंच भय तें वाचून माझ्या मनांत उत्पन्न झालें आहे. तुझ्या उत्तराची—तुला शक्य नसेल तर श्यामाच्या पत्राची मी वाट पहात आहे.

सदैव तुझा
जयंत

४

शिवनिवास, नागपूर
४ मार्च १९३०

प्रिय जयंत,

उमानें सांगितलेली हकीकत ऐकल्यावर तुझ्या इतकीच भीति माझ्याहि मनांत उत्पन्न झाली. तो अशा प्रकारचें धाडस करील, असें माझ्या स्वप्नांतहि कधीं आलें नव्हतें. त्याची आणि माझी त्या दिवशीं भेट होऊं शकली नाहीं. मी आणि चारू कॉलेजचा पहिला तास झाल्याबरोबर मोटारनें पारडाशिंग्याला गेलों, ते रात्रीं एकला परत आलों. सकाळीं मी नेहमींप्रमाणें टेनिस खेळावयाला जिमखान्यावर गेलों असतां उमानें मला हंपयार्डकडे फिरावयाला नेऊन सारी हकीकत सांगितली; व रिव्हॉल्वरहि दाखविला. पहिल्या सपाट्याला मला त्याच्या त्या मूर्खपणाचा इतका कांहीं राग आला कीं, मी त्याला अतिशयच टाकून बोललों; इतकें कीं, त्याच्या

डोळ्यांत आंसवें उभीं राहिलीं. पण मागाहून माझें मलाच वाटलें कीं, त्याच्या जवळ त्या किल्लच्या देण्यांत आपलीच चूक झाली. लहान मुलाजवळ एखादी नवीन, चमत्कारिक वस्तु दिली असतां ती वापरून पाहण्याची जशी त्याला अनावर इच्छा होते, तसेंच उमाचें झालें.

त्यानें सांगितलेली ती हकीकत ऐकून मला जितकी भीति वाटली, त्याहिपेक्षां जास्त भीति साहेबांची एकंदर वृत्ति पाहून वाटली. उमानें सारा प्रकार सांगितल्यापासून मला क्षणोक्षणीं वाटत होतें कीं, त्यांच्याकडून आपल्याला बोलावणें येणार. पण ते अगदीं गप्प असून, नेहमीसारख्या आनंदानें त्यांच सारे व्यवहार चालले आहेत. त्यांच्या वृत्तींत कोणत्याहि प्रकारचा बदल झालेला नाहीं. बदल फक्त एकच झाला. तो म्हणजे त्यांच्या खोलीचें जुनें कुलूप जाऊन त्याच्या जागीं नवें कुलूप आलें. याचा अर्थ असा कीं, त्यांना चोरी झाल्याचें कळलें आहे; पण तिची चौकशी मात्र त्यांना करावयाची नाहीं.

मला जर अतिशय भीति कशाची वाटत असेल, तर ती त्यांच्या या गप्प बसण्याची. तूं म्हणशील, ते पुत्रवात्सल्यामुळें गप्प बसले. पण मला मात्र तसें वाटत नाहीं. त्यांच्या मुग्धतेंत वात्सल्याचा अंश मनुष्यस्वभावानुसार असेल कदाचित्. पण, माझी अशी पक्की खात्री आहे कीं, त्यांना मिळालेल्या या पुराव्याच्या अनुषंगानें ते आपल्या हालचालींवर यापुढें सक्त नजर ठेवतील. आपल्या खात्याला तसा हुकूम त्यांनीं सोडला असला, तरीसुद्धां मला त्याचें नवल वाटणार नाहीं. ते कर्तव्यदक्ष आणि खुनशीहि आहेत. दहा वर्षांपूर्वीं माझ्यामुळें झालेला त्यांचा मनोभंग आणि मानभंग त्यांच्या पुरेपूर लक्षांत आहे. त्यानंतर मी घरीं राहिलों, तो केवळ आईमुळें आणि विजूमुळें.

मी फक्त एकच बदल झाला असें म्हटलें आहे. पण तें बरोबर नाहीं. आणखीहि एक बदल झाला आहे. परंतु त्याच्या कारणाचा उलगडा मात्र मला अद्याप झालेला नाहीं. विजू गेले तीन दिवस आजारी आहे. मी जो

बद्ल म्हणतों, तो हाच. 'आजार' या शब्दानें कांहीं तिच्यांत झालेल्या बदलाची यथार्थ कल्पना येणार नाहीं. वास्तविक ती तशी कांहीं आजारी नाहीं. फक्त एकच दिवस तिला ताप आला होता; व तोहि शंभरपर्यंत. पण तिच्या वृत्तींतला सारा खेळकरपणा एकाएकीं नाहींसा झाला आहे. मला प्रथम वाटलें, तिचें आणि उमाचें कांहीं तरी भांडण झालें असावें. म्हणून मी तिला खोदून खोदून विचारलें, उमालाहि विचारलें. पण त्या दोघांत तरी कांहीं भांडण झालेलें दिसत नाहीं. उमा फक्त थोडा उद्विग्न झालेला दिसत होता. पण, मला वाटतें, तो माझ्या बोलण्याचा परिणाम असावा. कारण त्याचा सारा उल्हास आतां परत आला आहे. पण, विजूच्या वृत्तींत एकाएकीं झालेला फरक मात्र कायम रहाणार, असें दिसतें. मला सारखी शंका येते,—तिनें उमाला खोलींत जातांना तर पाहिलें नसेल ? कारण ती त्या दिवशीं दुपारीं घरीं होती. पण, उमाजवळ जेव्हां मी माझा हा संशय बोलून दाखविला, तेव्हां तो अगदीं संतापून गेला माझ्यावर. आणि तिला तर तसें स्पष्ट विचारण्याची कांहीं सोय नाहीं.

जयंता, कार्यैकनिष्ठ माणसानें स्त्रीप्रेम वर्ज मानलें पाहिजे, असें तूं नेहमीं म्हणत असतोस. पण, मला वाटतें, नुसतें स्त्रीप्रेम वर्ज मानल्यानें भागणार नाहीं. त्यानें सर्वच प्रकारचें प्रेम—मित्रप्रेम सुद्धां वर्ज मानलें पाहिजे. उमावरच्या माझ्या प्रेमामुळेंच त्याच्या हातीं किल्ल्या देण्याचा मोह मला पडला. मी त्या किल्ल्यांचा उपयोग फक्त पार्सलचा पत्ता लावण्यापुरताच करणार होतों. त्या खोलींतील कोणतीहि वस्तु उचलून आणण्याची चूक मी केली नसती. पण उमानें वस्तु उचलली आणि तीहि रिव्हॉल्वर !

साहेबांनीं मला आपल्या खोलींत बोलावून जरब दिली असती किंवा पोलिसांच्याहि स्वाधीन केला असता, तर मला जितकें दुःख झालें नसतें, तितकें दुःख त्यांच्या सध्यांच्या मुग्धतेमुळें झालेलें आहे. ते जाणीव

देवोत न देवोत आपण त्यांच्या हातांत पुरते सांपडलों आहांत, हें मात्र खरें. जयंता, आतां आपल्याला निराळा मार्ग काढला पाहिजे.

सदैव तुझा
जयसिंग

५

ठाकूरभवन, नागपूर
५ मार्च १९३०

प्रिय जयंता,

तुझी सारी भीति अनाठायी आहे. मला कोणीहि खोलीत जातांना पाहिलें नाहीं; व काकांना आमचा संशयहि आलेला नाहीं.

पण तुझें जयाला काय पत्र आलें आहे कोण जाणे ! त्यानें मला काल पोहण्यासाठीं म्हणून तेलंखेडीवर नेला आणि माझ्या हातून त्या रिव्हॉल्वरला जलसमाधि देवविली.

तुमच्या दोघांच्या मतानें मी इतका मूर्ख आणि अविश्वनीय आहे अशी जर मला कल्पना असती, तर मी या भानगडींत पडलों नसतों.

यापुढें तुम्हीं मला विश्वासांत घेऊं नये, अशी माझी तुम्हांला नम्र विनंती आहे.

तुझा
उमा

# १०

## कुटुंबाचा नाश करणारा युगधर्म

" छे छे ! चूक केलीस तूं ही यादव ! पुत्रमोहामुळं कर्तव्याला जागला नाहींस तूं आपल्या !—"

" नाहीं, दद्दा. मी गप्प बसलों, तो कांहीं केवळ पुत्रमोहामुळं नव्हे. माझ्या ठिकाणीं इतका पुत्रमोह शिल्लक रहायला जयानं कांहीं कारण ठेवलेलं नाहीं आतां !—"

"—पण मी तरी तुला कोणत्या तोंडानं दोष देऊं, यादव ! स्वतःच्या दारुड्या आणि बदफैली मुलाच्या चैनीसाठीं मी नाहीं पैसा मुकाट्यानं पुरवीत ? त्याची कौन्सिलांत नेमणूक व्हावी म्हणून मी नाहीं एच्. ई. पाशीं स्वतःचा शब्द खर्च केला ? मला वाटतं, दुनियेंतील सारेच बाप हे धृतराष्ट्राप्रमाणें आंधळे असतात; व त्यांचा हा आंधळेपणा अखेर कुलक्षयाला कारण होतो !—"

सर महादेव हे शब्द आवेशानें उच्चारीत आहेत, तोंच चपराशी आंत आला. त्याबरोबर हातांतील घड्याळाकडे नजर टाकून ते उद्गारले, " मी आलोंच, तूं पुढं हो.—यादव, आज तुझी एका अजब व्यक्तीशीं ओळख करून देणार आहे मी ! "

" कोण व्यक्ति आहे ही ? "

" चार्लस मूरहेड, इंग्लंडांतील "लिबरल औटलुक" पत्राचा प्रतिनिधि. काल खान्याच्या वेळीं सर मॉंटेग्यूंनीं ओळख करून दिली त्याच्याशीं माझी. गव्हर्मेंट हाऊसमध्येंच उतरला आहे तो. हिंदुस्थानांत उत्पन्न झालेल्या प्रक्षोभाचें निरीक्षण करायला आपण आलों असल्याचं सांगत होता.—हा गव्हर्मेंट हाऊस

मचलत पाहुणा बडया अधिकाऱ्यांशीं कानगोष्टी करणार आणि तांबडी फीत न् किल्लीं प्रतिवृत्तें यांत गुरफटलेल्या गाळीव माहितीचा उपयोग करून बातमीपत्रं पाठविणार ! मात्र मोठा बोलका, लघळ न् चौकस आहे — ? ”

ते दोघे बोलत अभ्यासिकेंतून बाहेर पडून विद्युद्दीपांनीं सुशोभित केलेल्या पटांगणांत आले. त्याबरोबर तेथें बसलेल्या सर्व मंडळींनीं उठून सर महादेव यांना उत्थापन दिलें.

तेव्हां त्यांना बसण्याची विनंती इंग्रजींत करून सर महादेव पुढेंच उभ्या असलेल्या गोऱ्या गृहस्थाला उद्देशून म्हणाले, “ मि. मूरहेड, हे माझे स्नेही यादवराव कदम. ए. डी. एस्. पी. आहेत हे इथं,—हे चार्लस मूरहेड—‘ लिबरल औटलुक ’ पत्राचे प्रतिनिधि ! ”

“ वा ! फार आनंद झाला मला आपल्या भेटीमुळं ! ” मूरहेड थोडा पुढें येऊन यादवरावांशीं हस्तांदोलन करीत उद्गारला. “ आज सकाळींच पोलिस खात्याच्या आय्. जी. शीं या प्रांतांतील राजकीय परिस्थितीसंबंधीं बरंच बोलणं झालं माझं ! ते मला मोठ्या अभिमानानं सांगत होते कीं, आमचा प्रांत बंगालला इतका जवळ असून सुद्धां इथं क्रांतिकारक चळवळीचं बीज कधींच फारसं रुजूं शकलं नाहीं ! मला वाटतं, याचं श्रेय तुम्हां महाराष्ट्रीयांच्या व्यावहारिक राजकारणी बुद्धीलाच दिलं पाहिजे, नव्हे का ? ”

“ मग काय फडक्यांपासून तों राजगुरूंपर्यंत जे अनेक क्रांतिकारक महाराष्ट्रांत निर्माण झाले, ते निव्वळ अपवाद समजायचे ? ”

“ वा ! हा मध्येंच मला उत्तर देणारा तेजस्वी तरुण कोण ? ” मूरहेड एकदम आश्चर्यानें प्रियदर्शनकडे वळून उद्गारले. “ तुमच्याशीं ओळख झाल्यास मला फार आनंद होईल !—”

“ हा माझा पुतण्या प्रियदर्शन, काल खान्याच्या वेळीं सर मँटेग्यु ज्याच्याविषयीं बोलत होते तो !—”

“ काय ? तोच हा आपला पुतण्या ? फार आनंद झाला मला आपल्या भेटीमुळं ! ” मूरहेडनें प्रियदर्शनशीं हस्तांदोलन करीत हंसून म्हटलें, “ काल खान्याच्या वेळीं तुमच्याविषयीं पुष्कळच गोष्टी ऐकल्या मी ! सर

मॉंटेग्यु काल सरसाहेबांना तुमच्याबद्दल गंमतीनें म्हणाले, " आपल्या पुतण्यानें जर सत्याग्रहांत भाग घेतला, तर आपल्या श्रेष्ठ दर्जाला शोभेल अशी शिक्षा सरकारला त्याला द्यावी लागेल ! " फार आनंद झाला तुमच्या भेटीनं ! पण तुम्ही खरो-खरीच भाग घेणार आहां का सत्याग्रहांत ? तुमच्यासारख्या बुद्धिमान् आणि व्यासंगी तरुणाला आकर्षण वाटावं असं खरोखरी काय आहे गांधींच्या कार्यक्रमांत ? "

" हें पहा, मूरहेड, आंतल्या दिवाणखान्यांत जेवण वाट पहात आहे आपली. तेव्हां आतां आधीं आंत चला आणि मग जेवतांना वाटेल तितक्या गप्पा मारा या मंडळींशीं !—"

" वेळेवर आठवण दिली आपण मला, सर महादेव ! गप्पांच्या भरांत मी अजिबात विसरूनच गेलों होतों जेवणाची गोष्ट ! इथें इतकी निरनिराळ्या प्रकारची मंडळी मला आज पहावयाला मिळाली कीं, आपले त्याबद्दल किती आणि कसे आभार मानावे हें खरोखरी कळत नाहीं मला ! "

सर महादेवांच्या मागून दुडकत दुडकत आंत जातांना मूरहेड म्हणाला.

त्या साहेबाची चाल आणि चेहरा यांत अधिक गंमतीदार काय होतें, हें सांगणें कांहीं सोपें नव्हतें. त्याचा एक पाय दुसऱ्या पायापेक्षां गहूंभर आंखूड असल्यांचा भास व्हावा, अशा रीतीनें तो दुडकत आणि एका बाजूला कलत चालत असे. करवा मण्यासारखे पिवळसर डोळे, दुहेरी हनुवटीच्या चरबात गडप झालेली आखूड मान, चपटया नाकावर ठेवलेलीं चष्म्याचीं भिंगें यांच्या जोडीला हंसल्याबरोबर चमकणारें अस्वच्छ दंतपंक्तींतील सोनें त्याच्या रुंद चेहऱ्याला मोठीच शोभा आणीत असे. बातमीदाराच्या ठिकाणीं जो चलाखपणा असावा अशी अपेक्षा केली जाते, तो मात्र त्याचें शरीर सुटलेलें असूनसुद्धां, त्याच्या ठिकाणीं भरपूर होता; व निष्कारण डोळे मिचकावण्याची, शरीराला हेलकावे देण्याची किंवा चष्म्याचीं भिंगें सारखीं वरखालीं करण्याची त्याची लकब त्याच्या चलाखपणाचीच एका परीनें निदर्शक होती.

खान्याला सुरवात झाल्याबरोबर प्रियदर्शननें त्याला विचारलें, " आपला मुक्काम या प्रांतांत किती दिवस आहे ? —"

"फार तर आणखी दोन दिवस. तुमचा प्रांत समुद्रापासून फार दूर असल्यामुळें येथें वेगळ्या प्रकारचा सत्याग्रह करण्याची कल्पना तुमचे ते प्रसिद्ध पुढारी—मी त्यांचं नांव विसरलों पहा !—"

" अणे— " सर महादेव म्हणाले.

" —आभारी आहे !—त्यांनीं काढल्याचं कळलं. म्हणून मुद्दाम त्याची मांहिती करून घेण्यासाठीं अमदाबादहून इथं आलों मीं !—गांधी दांडीला जाण्याच्या वेळीं मला तेथें जाऊन पोचलंच पाहिजे. "

" याचा अर्थ असा समजायचा का कीं महात्माजी दांडीला पोंचेपर्यंत मुंबई सरकार कांहीं त्याना अटक करणार नाहीं ? " प्रियंवदेनें मध्येंच विचारलें.

" हें त्यांना कसं सांगतां येईल ? " मॅ. गुप्ता तिच्याकडे वळून म्हणाले.

" तिथें सुद्धां ते गव्हर्मेंट हाऊसमध्येंच उतरले असतील ना ? तेव्हां कदाचित् त्यांना कांहीं कळलेलें असण्याचा संभव—"

" माझ्या विधानांतून आपण काढलेला ध्वनि आपल्या चातुर्याचा निदर्शक आहे. पण, मी जरी गव्हर्मेंट हाऊसमध्यें उतरलों होतों, तरी मला खरोखरीच या बाबतींत कांहीं कळलेलें नाहीं. माझ्या म्हणण्याचा अर्थ एवढाच कीं, गांधी ज्या अर्थीं अद्याप पकडले गेलेले नाहींत, त्या अर्थीं त्यांचा प्रवास बहुधा पूर्ण होईल न् म्हणून मला तिथें जावें लागेल—"

" हिंदुस्थानांतील परिस्थितीची यथार्थ कल्पना येण्याच्या दृष्टीनें गव्हर्मेंट हाऊसमध्यें उतरणें गैरसोयीचें आहे, असं नाहीं तुम्हांला वाटत ? " हिमगौरीनें मध्येंच विचारलें.

" नाहीं. मला वाटतं, उलट त्यामुळं दोन्ही बाजू अधिकृत रीत्या पहायाला मिळतात. मी जरी गव्हर्मेंट हाऊसमध्यें उतरत असलों, तरी निरनिराळ्या पक्षांच्या आणि मतांच्या कार्यकर्त्यांना भेटण्याची मी काळजी घेतों. आज सकाळींच तुमच्या इथले दोन कामगार पुढारी रुईकर आणि फुले यांना मी भेटलों; न् त्यांच्याबरोबर हिंडून नागपुरांतील मजूर वस्तीहि प्रत्यक्ष पाहून आलों.—इंग्लंडांतल्या खाणमजुरांपेक्षां देखील इथल्या मजुरांची स्थिति अधिक खराब दिसली मला— "

" आमचा प्रियदर्शन सोशॅलिस्ट आहे. त्याला आवडेल हा अभिप्राय तुमचा. " राधामोहननें मध्येंच म्हटलें.

" खरोखरीच सोशॅलिस्ट आहेत हे ? मग गांधींच्या चळवळींत भाग घेण्याचं काय कारण आहे यांना ? गांधी आणि सोशॅलिस्ट यांचे जीविताकडे पहाण्याचे दृष्टिकोन सर्वच बाबतींत इतके भिन्न आहेत कीं, स्वतःच्या बुद्धीशीं द्रोह केल्याशिवाय कोणताहि सोशॅलिस्ट गांधींचा अनुयायी होऊं शकत नाहीं !— प्रार्थनेच्या वेळीं कटिवस्त्र नेसलेल्या आणि मुंडन केलेल्या त्या हंसतमुख बुढ्ढ्याला पाहिल्यावर सीलोनच्या एका विहारांत बघितलेल्या बौद्ध भिक्षूची आठवण झाली मला ! लोकांच्या धार्मिक भावनांना चेतावणी देणारा आणि आपल्या आंतल्या आवाजाचें स्तोम राजकारणांत माजविणारा हा महंत तुमचा पुढारी कसा होऊं शकतो ? "

" काय हरकत आहे व्हायला ?— हिंदुस्थानापुढील आजचा निकडीचा प्रश्न कांहीं सोशॅलिझम हा नाहीं; तर स्वातंत्र्य हा आहे—"

" असं ?—पण मुंबईच्या ज्या एका प्रमुख कामगार पुढाऱ्यांशीं माझं बोलणं झालं, त्याचं मत मात्र गांधीविषयीं तुमच्यापेक्षां अगदीं निराळं पडलं ! त्याची तक्रार अशी होती कीं, गांधींच्या या चळवळीचा फायदा भांडवल-वाल्यांनाच मुख्यतः मिळणार असून, त्यांच्या पैशाच्या जोरावरच गांधींची चळवळ चालली आहे ! हिंदी राजकारणांतील गांधी ही अतिशय प्रतिगामी शक्ति आहे, असं म्हणत होता तो !—तुम्हांला हें मत कितपत योग्य वाटतं? "

" या मतांत तथ्य आहे यांत शंकाच नाहीं. पण गांधींचा आज उपयोग करून घेऊन राजकीय चळवळ जितकी पुढें रेटतां येईल तितकी रेटावी आणि नंतर त्यांना बाजूला सारून कॉंग्रेसचीं सूत्रें हातीं घ्यावीत— "

" पण हें शक्य आहे असं वाटतं तुम्हाला ? त्यांच्या धार्मिक वृत्तीची छाप लोकांच्या मनावर किती आहे, याची तुम्हांला जाणीव नसेल असं समजत नाहीं मी—"

" त्यांच्या त्या धार्मिक वृत्तीला मी राजकारणाच्या बाबतींत फक्त देखा-

त्याची किंमत ( *demonstrative value* ) देतो. त्या त्यांच्या वृत्तीमुळें लोक त्यांच्याकडे आणि त्यांच्या चळवळीकडे आकृष्ट होतात एवढेंच काय तें!—"

" तुम्हांला असं म्हणायचें आहे काय कीं त्यांची ती धार्मिक वृत्ति—ती प्रार्थना, तें मौन आणि तो उपवास हा सारा निव्वळ देखावा आहे? निव्वळ ढोंग आहे ? तुम्ही गांधींना रासपुतीन समजतां कीं काय ?—"

" काय हरकत आहे समजायला ? " राधामोहननें मध्येंच आवेशानें विचारलें. " हिंदुस्थानांतील गब्बरांतल्या गब्बर भांडवलवाल्यांशीं असलेला त्यांचा स्नेहसंबंध, लैंगिक चर्चेविषयींचा त्यांचा हव्यास, स्त्रीसहवासाविषयींची त्यांची आसक्ति आणि आपल्या प्रत्येक कृतीला धार्मिक स्वरूप देऊन स्वतःचें माहात्म्य पद्धतशीर रीतीनें वाढविण्याचा त्यांचा प्रयत्न पाहिला, म्हणजे त्यांना रासपुतीन म्हणायला हरकत नाहीं वाटत फारशी—"

" पण राधा, गांधी आणि रासपुतीन यांच्यांत एक महत्त्वाचा फरक आहे. रासपुतीनची दृष्टि कधीं झार आणि रशिया यांच्या पलीकडे गेली नव्हती. उलट गांधींची हांव बुद्ध आणि ख्रिस्त यांच्यापेक्षां श्रेष्ठ होण्याची असून, आपलें माहात्म्य वाढविण्यासाठीं ते अनत्याचाराच्या वेडापायीं काँग्रेस आणि हिंदुस्थान यांचाहि बळी द्यायला प्रसंगीं चुकणार नाहींत ! देशबंधूंच्या मृत्यूनंतर बंगालमधील क्रांतिकारक चळवळींचें निर्मूलन करण्यासाठीं हा महात्मा सरकारच्या आश्रयानें बंगालमध्यें फिरला, हें तुझ्या लक्षांत असेलच !—" डॉ. गुप्ता म्हणाले.

" बरोबर आहे ! गांधींच्या धार्मिकतेचें अगदीं असेंच पृथक्करण मुंबईच्या त्या कामगार पुढाऱ्यानेंहि मजजवळ बोलतांना केलें होतें. इतकेंच नव्हे, तर त्यानें असेंहि म्हटलें कीं, गांधी हे हिंदी भांडवलशाहीचे हस्तक असून, तिच्या हितसंबंधांना धक्का पोंचूं नये, म्हणून ते स्वातंत्र्याचं ध्येय बाजूला सारून ब्रिटिश साम्राज्यशाहीशी अखेर समेट करायला तयार होतील ! त्यांच्या या भांडवलशाही धोरणाचा पुरावा म्हणून त्यानें मला एक गोष्ट सांगितली आणि

अमदाबादला गेल्यावर मी तिची सत्यता पडताळूनहि पाहिली.—ती अशी कीं, त्यांच्या नेतृत्वाखालीं असलेल्या अमदाबादच्या कामगारसंघाला त्यांनीं भारतीय मजूर कांग्रेसशीं किंवा कोणत्याहि आंतरराष्ट्रीय कामगार संस्थेशीं संलग्न होऊं दिलेलें नाहीं !—काय, प्रियदर्शन, तुम्हांला कसं काय वाटत हं गांधींचं पृथक्करण ?—"

" मि. मूरहेड, हो चर्चा ऐकून तुम्ही असं नका समजूं कीं, हिंदुस्थानांतील जनतेचं मतहि गांधींविषयीं असंच आहे ! " सर महादेव म्हणाले. " हें फक्त या टेबलावर ठेवलेल्या पितळी कुंडयांतल्या दिखाऊ झाडांप्रमाणं सरकारच्या प्रभावळींतील बडया लोकांच्या दिवाणखान्यांतलं शोभेचं पांडित्य आहे ! गांधींची ती धार्मिकता तुम्हां आम्हांला तिरस्करणीय आणि दांभिक वाटते. पण बहुजनसमाज त्या धार्मिकतेमुळेंच त्यांच्याकडे इतक्या प्रबळतेनें आढला गेला आहे, हें विसरून चालणार नाहीं. या बाबतींत मी गांधींना टिळकांपेक्षां जास्त धूर्त समजतों. टिळकांनीं धार्मिक उत्सवांना चालना देऊन आणि धार्मिक प्रश्नांवर नेहमीं रूढ बहुमताची तळी उचलून धरून आपली लोकप्रियता वाढविली आणि टिकविली. पण गांधींनीं त्यांच्याहि पुढं मजल मारली. ते मुळीं स्वतःच धर्मावतार बनले ! त्यांचें तें कटिवस्त्र, ती प्रार्थना आणि तें मौन यांची तुम्ही खुशाल चेष्टा करा. पण नंग्या गोसाव्यांच्या आणि फकिरांच्या पायांवर लोळण घेण्याची संवय झालेल्या हिंदी जनतेला नेमका त्याच कारणामुळें हा महात्मा पूज्य वाटतो ! तुम्हांला एक गोष्ट माहित नाहीं, मि. मूरहेड ! गांधींच्या डोक्यांत ख्रिस्तापेक्षां श्रेष्ठ होण्याचें वेड आमच्या मध्यप्रांतानें भरविलें. चंपारण्यांतील मजुरांच्या चौकशीच्या वेळीं या प्रांताचे एक माजी गव्हर्नर सर फ्रँक स्लाय एक दिवस सायंकाळीं गांधींना सहज म्हणाले, " गांधीं तुम्हीं ख्रिस्तापेक्षां सुद्धां श्रेष्ठ आहां. ( *You are greater than Christ.* ) " त्या दिवसापासून जगाचा उद्धार करण्यासाठीं सत्य आणि अहिंसा यांच्या हात धुवून मागें लागला आहे हा महात्मा ! " राजकारणाला अध्यात्मिक स्वरूप दिलें पाहिजे, " ( *Politics must be spiritualised* ) हे शब्द गोपाळरावांनीं कोणत्या भावनेनें उच्चारले होते कोण जाणें ! पण स्वतःला त्यांचा चेला म्हणविणाऱ्या या ःनिग्यानें राजकारणाची अगदीं बुवाबाजी करून सोडली ! मला सोशॅलक्षम

हा अगदीं अनैसर्गिक आणि अव्यवहार्य वाटतो. पण, आमच्या लोकांतलं हे बुवाबाजीचं वेड पाह्यलं, म्हणजे मात्र सोशॅलिस्टांप्रमाणं धर्माचा नायनाट झाला पाहिजे, असं वाटतं मला !---पण प्रिया, यांनीं तुला विचारलेला मुख्य प्रश्न बाजूलाच राहिला. स्वतःला सोशॅलिस्ट म्हणविणारा तूं--तूं या चळवळींत कसा भाग घेऊं शकतोस ?--"

" होय. माझा प्रश्न तोच आहे तुम्हांला--"

" मी गांधीच्या चळवळीकडे फक्त परकीय सत्तेविरुद्ध असंतोष उत्पन्न करण्याचा सामुदायिक आणि जोरदार प्रयत्न म्हणून पहातों व तेवढ्यापुरतें त्यांत भाग घेणें हें मला कर्तव्य वाटतें माझें --"

" पण सत्य आणि अहिंसा यांच्या जोरावर जगांतलं कोणतं तरी राष्ट्र स्वतंत्र झालं आहे का प्रिया ? --"

" नाहीं. या बाबतींत माझ्याशीं आपला मतभेद आहे, सर महादेव ! " तोंडापर्यंत नेलेला सूपचा चमचा एकदम खालीं ठेवून मूरहेड उद्गारला, " जगाच्या राजकीय विचारसंपत्तींत अत्यंत महत्त्वाची किंबहुना अद्वितीय भर जर गांधींनीं कोणती घातली असेल, तर ती अनत्याचारी मार्गानें स्वातंत्र्य संपादन करण्याच्या कल्पनेची होय. त्यांच्या या अपूर्व उदात्त कल्पनेबद्दल त्यांना शांततेचें नोबेल पारितोषिक देणें खरोखरी जरूर आहे ! ब्रिटिश साम्राज्यांत असा ध्येयवादी निर्माण झाला म्हणून अभिमान वाटला पाहिजे ब्रिटिश प्रजाजनाला !--"

" गांधींची ही कल्पना जर आपल्याला इतकी महत्त्वाची वाटते, तर तिच्या गौरवाची खूण म्हणून हिंदुस्थानाला स्वराज्य देण्याची शिफारस आपण आपल्या पत्रांतून कराल काय ? " राधामोहननें विचारलें.

" तो व्यावहारिक राजकारणाचा प्रश्न आहे---"

" पण गांधींनीं अहिंसेचें तत्त्व व्यावहारिक राजकारणाला लागू केलेलें नाहीं काय ?--" बॅ. गुप्ता म्हणाले.

" त्या तत्त्वाचा प्रयोग आतां नुकता कुठं सुरू झाला आहे--"

" पण इंग्लंडनें मनांत आणलें, तर – लेखणीच्या एका फटकाऱ्या-सरशीं त्याला तो प्रयोग यशस्वी झाल्याचा चमत्कार जगाला करून दाखवितां येईल ! " सरसाहेब नॅपकिननें तोंड पुसतां पुसतां हंसून उद्गारले.

" होय. बरोबर आहे आपलं म्हणणं, सर महादेव ! आणि तसं घडण्या-चाहि संभव दिसतो मला. ब्रिटिश सरकारपुढं आज असलेली वर्तुळ परिषदेची योजना हें तरी गांधींच्या यशाचेंच एक प्रत्यंतर नव्हे काय ? " मूरहेड यांनीं सरसाहेबांना अगदीं गंभीरपणानें उत्तर दिलें. नंतर ते प्रियदर्शनकडे वळून म्हणाले, " पण माझ्या प्रश्नाचं उत्तर दिलं नाहीं तुम्हीं अजून ?—"

" ते मी मघांशींच दिलें आहे. आमच्यापुढं सध्यां फक्त स्वातंत्र्यसंपा-दनाचा प्रश्न आहे—"

" याचा अर्थ असा कीं, गांधींच्या मार्गावर तुमचा विश्वास आहे !—"

" तसं नव्हे. गांधींच्या मार्गानं स्वातंत्र्य मिळेल असं मला वाटत नाहीं. मी फक्त एवढेंच पहातों कीं, ज्या सामुदायिक उठावणीशिवाय स्वातंत्र्याचा लढा यशस्वी होणें शक्य नाहीं, तिला अवश्य असलेली लोकांची थोडीशी तयारी गांधींच्या या चळवळीमुळें होईल. तेवढाच काय तो मला या चळवळीचा उपयोग दिसतो व म्हणूनच मी भाग घेणार आहे तिच्यांत—"

" पण या चळवळीमुळं लोकांची धार्मिक वृत्ति वाढेल आणि ज्या वर्ग-कलहावर तुमचा कटाक्ष आहे त्याला प्रतिकूल वातावरण निर्माण होईल असं नाहीं वाटत तुम्हांला ?—"

" गांधींच्या चळवळीमुळं धार्मिकता वाढणार नाहीं; फक्त दांभिकता वाढेल. त्यांच्या अहिंसेच्या तत्त्वज्ञानाकडे बोट दाखवून भांडवलवाले वर्गकलहा-लाच काय, पण वर्गभेदाची जाणीव उत्पन्न करण्याच्या चळवळीलाहि विरोध करितील. जग हल्लीं ज्या स्थितींत आहे त्याला त्या स्थितींत कायम ठेवण्याचा किंबहुना भौतिक प्रगतीच्या मार्गापासून त्याला परावृत्त करून पुन्हा प्राथमिक अवस्थेंत नेण्याचा प्रयत्न आहे गांधींच्या तत्त्वज्ञानाचा. त्या तत्त्वज्ञानामुळें कोणतीहि प्रगति होणं शक्य नाहीं—"

चपराश्यानें आणलेल्या कांचेच्या प्रशस्त पात्रांत हात बुचकळून धूत असतां राधामोहन म्हणाला.

"आपल्याला पटतं हें म्हणणं ?"

मूरहेड यांनीं प्रियदर्शनकडे वळून विचारलें.

"होय. बव्हंशीं पटतं—"

"आणि तरी आपण गांधींच्या चळवळींत भाग घेणार ?—"

"गांधींचं तत्त्वज्ञान किंवा मार्ग न पटतांहि त्यांच्या चळवळींत भाग घेण्याची इष्टता पटणं शक्य आहे—"

"हें उत्तर लपंडावाचं आहे !—"

"लपंडावाशिवाय राजकारण होऊंच शकत नाहीं, मि. मूरहेड ! गांधींच्या यशाचा पुरावा म्हणून वर्तुळ परिषदेचा जो उल्लेख तुम्ही मघांशीं केला, तो तरी एक लपंडावच नव्हता काय ?"

सर महादेव यांनीं मूरहेडला दिलेलें हें मार्मिक उत्तर ऐकून सर्व मंडळी हंसली. नंतर सरसाहेबांनीं खान्याला आल्याबद्दल त्याचे आभार मानले; व त्यानें उलट आभार मानल्यावर मंडळी उठली.

बाहेरच्या दिवाणखान्यांत सर्व मंडळी आल्यावर कॉफीपानाचा कार्यक्रम झाला; व राधामोहननें मूरहेडला आपल्या खोलींत नेलें. यादवरावांशिवाय इतरहि सर्व मंडळी सरसाहेबांचा निरोप घेऊन बाहेर पडली.

प्रियदर्शन त्यांचा निरोप घेण्यासाठीं त्यांच्याजवळ आला. ते प्रियंवदा आणि यादवराव यांच्याशीं बोलत होते. त्यानें जाण्याची परवानगी मागतांच ते म्हणाले,—

"निघालास तूं इतक्यांत ? पुढल्या शनिवारच्या खान्याला कांहीं तूं येऊं शकशील असं वाटत नाहीं मला—"

"कां बरं ?—"

"गांधींना अटक झाल्याबरोबर सर्व प्रांतांतून धरपकडीचा सपाटा सुरू होईल. मग कांहीं तूं मोकळा रहाशील असं वाटत नाहीं. सध्यां प्रत्येक सभेंत तूं बोलत असतोस ना ? तुला सत्याग्रह करण्याची गरज पडणार नाहीं मुळींच—"

त्यांच्या आवाजांत विषाद् आणि उपरोध यांचा ध्वनि स्पष्ट उमटला.

प्रियदर्शन स्तब्ध होता. पण यादवराव मध्येंच म्हणाले—

" आपलं म्हणणं बरोबर आहे, दद्दा ! याच्या भाषणांचीं जीं टिपणं माझ्याकडे आलीं आहेत, त्यांवरून याला सत्याग्रह सुरू होईपर्यंत थांबावं लागणार नाहीं, असंच मलाहि वाटतं—"

" यादव, मी गृहमंत्री असतों या वेळीं तर फार बरं झालं असतं !—"

" तें कसं काय ? "

" स्वतःच्या आवडत्या पुतण्याला प्रथम शिक्षा ठोठावून मी माझी कठोर कर्तव्यबुद्धि लोकांच्या निदर्शनाला आणून दिली असती !—सध्यांच्या परिस्थितीमुळं होणारी अप्रतिष्ठा खास टळली असती माझी !—"

त्यांचा आवाज चढूं लागलेला पाहून प्रियदर्शनानें त्यांना पुन्हा हळूच विचारलें—

" मी जाऊं आतां ?—"

" चाललास ?—जा ! वडीलधाऱ्या माणसांचं मुलांनीं ऐकायचं नाहीं असा धर्म दिसतोय या युगाचा ! पण लक्षांत ठेव तूं, प्रिया, या धर्मामुळं कुटुंबाचा नाश होणार आहे—"

" कुटुंबाचा नाश झाला तरी चालेल. पण मी ध्येयाचा नाश होऊं देणार नाहीं !—"

" आणि हेंच जर उत्तर तुला उद्यां उमानं दिलं तर ?—"

—यादवरांनीं विचारलें.

प्रियदर्शनच्या चेहऱ्यावर एकदम विषादाची छाया पसरली.

# ११

## प्रणयजीवनांतील न्यूनता

अशोकाच्या झाडाखालीं त्या चबुतऱ्यावर बसून कांता दिलरुबा वाजवीत होती.

*या भविष्याचिया दिव्य कारागिरा*
*कोण रोधील ? दे कोण कर सागरा ?*

हे ध्रुपदाचे चरण तिनें संपविले आणि दिलरुबा खालीं ठेवून ती उठली.

तिचें मन अतिशय बेचैन झालें होतें. गांधीजींच्या दांडीयात्रेला आज सकाळी प्रारंभ झाला होता. त्या यात्रेचें अभिनंदन करण्यासाठीं जी प्रचंड जाहीर सभा चिटणीस पार्कमध्यें भरणार होती, तिला हजर रहाण्याकरितां प्रियदर्शन अभ्यंकरांबरोबर शहरांत गेला होता. लोकांची अपेक्षा अशी होती कीं, गांधींना तावडतोब पकडण्यांत येईल; व म्हणून दर तासातासानें अभ्यंकर किंवा खरे यांच्या बंगल्यावर जाऊन त्या अपेक्षित बातमीची लोक उत्कंठेनें चौकशी करीत असत. प्रियदर्शन जेवल्यानंतर लगेच जो एकदां अभ्यंकरांच्या बंगल्यावर गेला, तो मग अजिबात घरीं परत न येतां, तिला नुसती चिठ्ठी पाठवून तसाच परस्पर सभेला गेला होता.

. तिच्या मनांत राहून राहून सारखें येत होतें, पोलिसांनीं जर आजची सभा उधळली किंवा लाठीमार केला तर ?—

—त्या शंकेनें भयविव्हल होऊन तिनें प्रियदर्शनच्या मागोमाग उमाला शहरांत पाठविला.

तरीहि तिच्या मनाची तळमळ कमी होईना. उलट पति आणि बंधु हे दोघेहि घरीं नसल्यामुळें एरवीं नोकरचाकरांनीं गजबजलेला तो सुंदर बंगला तिला भयाण वाटूं लागला; तिच्या भीतिग्रस्त मनाला त्या शृंगारलेल्या दिवाणखान्याची शून्यता अधिकच भेडसावूं लागली.

म्हणून तिनें आपला दिलरुबा काढला आणि त्याच्या तारा छेडल्या.

जणुं कांहीं त्या तारांच्या स्पंदनाच्या नादमाधुरींत आपल्या हृदयाच्या स्पंदनाची धडधड लोपून जाईल, अशी आशा तिला वाटली.

त्यांचा तरल नाद कानांवर पडतांच तिला आठवण झाली. लग्न होऊन ती प्रथमच सागरहून नागपूरला आली होती. त्या दिवशीं संध्याकाळीं दिवेलागणी झाल्यावर तिनें आपल्या रोजच्या संवईप्रमाणें दिलरुबा काढला आणि अनंताची आरती म्हणावयाला सुरवात केली. ती आरती म्हणण्यांत ती मग्न असतांनाच प्रियदर्शन केव्हां येऊन तिच्या मागें उभा राहिला, हें तिला कळलें नाहीं. आरती संपवून तिनें गज बाजूला ठेवतांच तिच्या मागें उभ्या असलेल्या प्रियदर्शननें तिच्या गळ्यांत हात घालून तिला म्हटलें—

" माझ्यापेक्षां दुसरं कांहीं तुला अधिक प्रिय आहे हें जर मला माहित असतं, तर मी लग्न केलं नसतं तुझ्याशीं, कांता !— "

त्याचे ते अचानक कानांवर पडलेले शब्द ऐकतांच ती दचकून उठून म्हणाली, " हें काय हो भलतंच कांहीं तरी बोलतां तुम्हीं ?— "

" भलतं काय बरं बोललों मी ? मी दहा मिनिटं तुझ्या मागं उभा होतों. ——तुला शुद्ध होती माझ्या येण्याची ? माझ्यापेक्षां या दिलरुब्याचं वेड जास्त नाहीं तुला, कांता ?—"

दिलरुब्याच्या नादांत आपल्याला प्रियदर्शन आल्याचं कळल नाहीं, म्हणून त्या दिलरुब्याचा किती राग आला होता तिला त्या वेळीं !

आणि आज तो स्वत: राजकारणाच्या नादानें आपल्याला न भेटतां सवरतां परस्पर सभेला निघून गेला !—त्याला माझें दिलरुब्याचें वेड सहन झालें

नाहीं. आणि मी मात्र त्याचें राजकारणाचें वेड सहन करावें असा त्याचा आग्रह !

स्त्रीच्या भावनांची कांहीच का किंमत वाटत नाहीं पुरुषाला ?

तिच्या मनाला नेहमीं बोचणारा तो प्रश्न !—त्या प्रश्नाच्या टोंचणीमुळें एरवीं अत्यंत प्रेमपूर्ण असलेल्या त्यांच्या वैवाहिक जीवनाला केव्हां केव्हां कटुता येत असे.

पण, आज तिचें मन भीतीनें इतकें कांहीं ग्रासून टाकलें होतें कीं, आपल्या प्रियकराच्या आणि आपल्या अद्वैतांत आडपडदा उत्पन्न करणारा तो प्रश्न या वेळीं मनांत उद्भवला, हें तिला सहन झालें नाहीं; व एकांतामुळें मनांत उद्भवलेल्या त्या प्रश्नाला थारा देऊं नये, म्हणून ती दिलरुबा घेऊन बागेंत आली.

काळोख अद्याप पूर्ण पडला नव्हता. अंधुक संधिप्रकाश पुरता माव-ळण्यापूर्वींच रुचिर चंद्रप्रकाशानें सृष्टि उजळल्यामुळें दिवस संपून रात्र सुरू होत असल्याचें स्थित्यंतर तितकेंसें जाणवत नव्हतें. पूर्वेच्या क्षितिजावरील फाल्गुनांतल्या द्वादशीचा चंद्र आणि पश्चिमेच्या क्षितिजावर तळपणारा शुक्राचा तारा—त्या दोहोंच्या द्युतीमुळें क्षितिजाच्या दोन्ही बाजू सारख्याच रमणीय दिसत होत्या. आकाशाच्या मध्यावर आलेलें मृग नक्षत्र त्या दोहोंच्या प्रभावानें मंदतेज खरें पण मनोज्ञ वाटत होतें. संध्याकाळ होतांच उमललेलीं वेलींची इवलालीं पांढरीं फुलें आपल्या मृदु हास्यानें नक्षत्रांना हिणवीत होती; व झाडांच्या गर्द पानांतून भुईवर पडलेले चांदण्याचे कवडसे क्षितिजाच्या पश्चिम कोंपऱ्यांत पसरलेल्या कापशी अभ्रशकलांच्या खवल्यांसारखे दिसत होते. वाऱ्याच्या झोताबरोबर हलणारे ते कवडसे आणि डोलणारे ते फुलांचे तुरे म्हणजे चांदण्यानें न्हालेल्या भूमीचें विमल हास्यच होतें जणुं कांहीं ! दिवसभराचा उष्मा आणि सायंकाळीं सुटलेल्या वाऱ्याच्या झुळका यांचें कांहीं सुखकर मिश्रण हवेंत झालें होतें कीं, दुःखद स्मृतींनीं भारावलेल्या मनांत अवचित ऐकलेल्या आनंदाच्या बातमीमुळें उत्पन्न होणाऱ्या संमिश्र भावनांचीच उपमा शोभली असती त्याला ! क्वचित् एखादा मार्गे रेंगाळलेला पक्ष्यांचा थवा मध्येंच आका-

शांतून उडून गेला, म्हणजे त्याच्या पंखांच्या फडफडण्यानें त्या स्वप्नसदृश दृश्याची मादक शांतता भंग पावत असे.

बगीच्यांत आल्यावर तें शांत आणि रम्य दृश्य पाहून कांताच्या मनाला किंचित् बरें वाटलें; व त्या चबुत्र्यावर बसून तिनें दिलरुबा वाजवावयाला सुरुवात केली.

पण, त्या गाण्यांतहि तिचें मन रमेना. मनांत थैमान घालणाऱ्या शंका-कुशंकांना थारा मिळूं नये, म्हणून ती तें गाणें दिलरुब्याच्या साथीवर म्हणत होती; पण त्या गाण्यामुळें त्या शंका कमी होण्याऐवजीं उलट वाढल्या मात्र.

म्हणून तिनें दिलरुबा खालीं ठेवला आणि ती उठली.

त्या चांदण्यासारखेंच जरीच्या काठचा असलेलें शुभ्र चंदेरी पातळ ती आज नेसली होती. तिच्या शरीराच्या गौरतेला त्या पातळाच्या शुभ्रपणाची जोड लाभल्यामुळें प्रत्येक ताटव्यापाशीं थबकत आणि फुलांचा वास घेत विमनस्कतेनें बागेंत फिरणारी तिची ती मूर्ति म्हणजे स्थिरचराला उजळणाऱ्या आणि तरुलतांना फुलविणाऱ्या त्या स्वर्गीय तेजाची अधिदेवताच वाटत होती; व दोहों बाजूंनीं कानांपर्यंत येऊन भिडलेलें तिचें तें भव्य कबरीबंधन म्हणजे त्या शुभ्रतेच्या भीतीनें तिच्या आसऱ्याला येऊन राहिलेला आकाशांतील पुंजीभूत नीलिमाच होता जणुं कांहीं ! तिच्या त्या बुद्धिप्रभ सौंदर्यांत पार्थिवतेचा अंश इतका कांहीं कमी होता कीं तिला पाहिल्यावर—

*A Shadow of some golden dream,*
*a tender*
*Reflection of the eternal Moon of Love*
*Under whose motion's life's dull billows*
*move*

या शेलेच्या उद्गारांची आठवण पुष्कळदां प्रियदर्शनाला होत असे; व जीविताला उदासता आणणाऱ्या कोणंत्या तरी अमूर्त किंचित् कठोर अशा तेजस्तत्त्वाची तर ती मूर्ति नसेल ना, अशी कल्पना केव्हां केव्हां त्याच्या मनांत चमकून जात असे. तिच्या आलिंगनाचें सुख दृढतेनें अनुभवीत असतांनाहि

त्याच्या मनाची तृप्ति कधीं होत नसे, तसेंच स्पर्शाबरोबर नाना प्रकारच्या संवेदनांचा बहर आणि शरीराला आणणारें तिचें तें मृदु तन्वंग आपल्या बाहु-पाशांत पूर्ण सांपडलें आहे, असेंहि त्याला कधींच वाटत नसे. या दुहेरी अतृप्ततेमुळें त्यांच्या प्रणयजीवनांत एक प्रकारची चमत्कारिक न्यूनता उत्पन्न झाली होती.

शिवपार्वतीच्या विवाहाची कथा लहानपणीं आपल्या आजोच्या तोंडून ऐकतांना त्यानें एकदां तिला अगदीं अजाणतेपणानें विचारलें होतें, " पार्वती ही जर हिमालयाची मुलगी होती, तर महादेवानें जेव्हां तिचें पाणिग्रहण केलें, तेव्हां त्याला बर्फाचा तुकडाच आपल्या हातांत घेतल्यासारखा वाटला असेल, नाहीं का ग ? "

त्या वेळीं त्याचा तो पोरकट प्रश्न ऐकून त्याची मोठी आई मनापासून किती वेळ तरी हंसली होती.

पण त्या शंकेची प्रतीति तो कॉलेजांत असतांना एक दिवस अगदीं अभावितपणें त्याला आली.

१९२२ सालच्या जानेवारींतील गोष्ट. सर महादेव हे तेव्हां शिक्षणमंत्री होते. युवराज एडवर्ड यांना तेलंखेडीच्या बगीचांत जो उपहार देण्यांत यावयाचा होता, त्या वेळीं हिंदी नृत्याचा कार्यक्रम ठेवण्याचें सरसाहेबांनीं ठरविलें; व त्याची तयारी करण्याची कामगिरी त्यांनीं हिमगौरीवर सोंपविली. ती स्वतः नृत्यकुशल होती. तिनें प्रियंवदेच्या मदतीनें उषास्वप्नाचें मूकचित्र आणि शिवपार्वतीचें नृत्य असा दुहेरी कार्यक्रम बसविला. या दोन्ही कार्यक्रमांतील मुख्य भूमिका प्रियदर्शन आणि कांता यांना देण्यांत आल्या होत्या. आपल्या कुटुंबांतील मुलें अशा रीतीनें युवराजांसमोर नाचविण्याचें ठरविल्याबद्दल सर महादेवांवर मराठी वर्तमान-पत्रांतून पुष्कळ टीका झाली. पण तिची पर्वा न करितां त्यांनीं हा कार्यक्रम तडीस नेला. या कार्यक्रमाची रंगीत तालीम जेव्हां करण्यांत आली, तेव्हां शिवाची भूमिका घेतलेल्या प्रियदर्शनला त्या भयंकर थंडीच्या कहरांत शरीर उघडें टाकून बसावें लागलें. आपल्यावर रुष्ट होऊन समाधि लावून बसलेल्या शिवाला प्रसन्न करण्यासाठीं भिल्लिणीचें मोहक रूप धारण करून पार्वती त्याच्यापुढें नृत्य करितेः,

व तिच्या नृत्यामुळें उल्लोलित झालेला शिव अखेर स्वतः तिचा हात धरून नाचूं लागतो, असें त्या नृत्यांतील दृश्य होतें. कांतानें अर्थातच पार्वतीची भूमिका घेतली होती. ती नाचत नाचत ज्या वेळीं समाधिस्थ शिवाजवळ आली, त्या वेळीं पद्मासन घालून उघडा बसलेला प्रियदर्शन थंडीनें अगदीं गारठून गेला होता. तो त्या गारठलेल्या बधिर स्थितींत असतांना कांतानें नाचत नाचत जवळ येऊन त्याच्या पायांना स्पर्श केला. त्याबरोबर त्यानें पळाचाहि विलंबन न करितां एकदम तिचा हात धरला.

ती नाचत असतांना कुमारसंभवांतील उमेचें वर्णन सारखें त्याला आठवत होतें; व हिमगौरी जरी डोळे मिटण्याची आणि स्तब्ध राहण्याची सूचना त्याला वारंवार करित होती, तरी त्याचे डोळे पुनः पुन्हा आपोआप उघडले जाऊन तिच्या अंगाप्रत्यंगांवर नाचत होते. विशेषतः, निरनिराळ्या रंगांच्या प्रकाशाचे झोत जेव्हां एकामागून एक तिच्यावर पाडण्यांत येत, तेव्हां तिचें तें सुमशोभित अर्धोवृत, गौर तन्वंग त्या प्रकाशाशीं इतकें कांहीं एकरूप होऊन जाई कीं, अविरत पदक्षेप करित असलेल्या त्या षोडशींच्या उज्ज्वल शरीरावर त्याचे डोळे ठरेनात ! तिनें दोन्ही हातांवर घेतलेलें धवल दुकूल, अंगावर घातलेलीं पांढऱ्या फुलांचीं आभूषणें, तिच्या विशाल नेत्रांतील स्फटिकाची दीप्ति आणि नाचतांना मधून मधून होणारा शुभ्र दंतपंक्तीचा विकास !—त्याला पुनः पुन्हां वाटे, आपल्यासमोर नाचत असलेली ही खरोखरीच कांता आहे कीं देवांगना ? किंवा एखादी कमनीय तेजोमूर्तीच चंद्रकिरणांचें विरल दुकूल धारण करून अशरीरी असे दिव्य भाव आपल्या अंगविक्षेपांनीं व्यक्त करित आहे ? लहानपणापासून तिच्या सौंदर्याचा हळुहळू होत गेलेला उन्मेष तो पहात आला होता. पण त्या सौंदर्याच्या उज्ज्वलतेचा डोळ्यांना दिपविणारा आणि बुद्धीला भुलविणारा साक्षात्कार मात्र त्याला त्याच दिवशीं प्रथम घडला.

थंडीनें काकडत असतांनाहि तो इतक्या अतृप्ततेनें आणि एकाग्रतेनें तिच्या त्या नृत्यनिमग्न मूर्तिकडे पहात होता कीं, शेवटीं प्रेक्षकांत बसलेल्या सर महादेवांनीं सुद्धां त्याला रागानं ओरडून डोळे मिटण्याचा हुकूम फर्माविला !

पण त्या मिटलेल्या डोळ्यांपुढें देखील त्याला तिचीच मूर्ति नाचतांना दिसत होती. आणि, सुखोष्ण स्पर्शासाठीं, तिचा हात धरून तिच्याबरोबर नृत्य करण्यासाठीं त्याचें मन आतुर झालें होतें.

पण तिचा तो हात त्यानें आपल्या हातांत धरला मात्र!—बर्फाचा तुकडाच हातांत घेतल्यासारखा त्याला वाटला. आणि लहानपणीं आजीला पार्वतीविषयीं विचारलेल्या त्या प्रश्नाची त्याला एकदम आठवण झाली.

तिच्या त्या स्वर्गीय रूपच्छटा आणि नंतरचा तो अनपेक्षित हिमस्पर्श! त्यांची आठवण त्याच्या मनांतून पुढें कधींहि बुजली नाहीं. तिच्या स्वभावांतला तो मानीपणा आणि ती बौद्धिकता पाहिली, त्यामुळें तिच्या वृत्तींत उत्पन्न झालेली गंभीरता आणि संयम लक्षांत घेतला, म्हणजे त्याला शेलेच्या त्या ओळींची आठवण होऊन असें वाटे कीं, ती स्त्री नसून केवळ एक उज्ज्वल स्वप्न आहे!---ज्याच्या दीप्तीनें आपण मोहित व्हावें पण जें आपल्याला कधींहि आकळतां येऊं नये! प्रणयाच्या ऊर्मींत विलीन झाल्यावर सुद्धां तिला आपल्या व्यक्तित्वाचा विसर पडल्याचा त्याला कधीं अनुभव आला नव्हता. त्यामुळें त्याला सारखें वाटे,—ती एक उज्ज्वल स्वप्न, मदिर आभास आहे. आणि त्याच्या मनाची अतृप्तता वाढे मात्र!

आणि, या वेळीं चंद्रप्रकाशांत विमनस्कतेनें बगीचामध्यें फिरतांना जर त्यानें तिला पाहिलें असतें, तर हलत्या सांवल्या आणि हंसरें चांदणें यांच्या त्या संमिश्र शोभेनें निर्माण केलेला तो एक रमणीय आभास आहे, असेंच त्याला खरोखरी वाटलें असतें!

कारण, एखाद्या झाडाच्या किंवा वेलीच्या फुलांचा वास घेण्यासाठीं ती त्याच्याजवळ जाऊन उभी राहिली, म्हणजे तिचा केशकलाप त्यांच्या गर्द पर्णराजींत आणि गौर तनु त्या शुभ्र चंद्रकिरणांत लोपून जात असे!

पण, ज्या तिच्या मनाशीं तो आजपर्यंत कधींहि समरस होऊं शकला नव्हता, तें तिचें मानी मन मात्र त्यानें या वेळीं पूर्णपणें व्यापलें होतें.

तिच्या मनाची ओळख अशी त्याला पटलेली नव्हती, तसेंच त्याचेंहि मन तिला कळलेलें नव्हतें. एकमेकांवर अत्यंत प्रेम करीत असूनहि तीं दोघें

एकमेकांच्या मनोवृत्तीविषयीं अज्ञात होतीं. एकमेकांच्या मनाशीं समरस होऊं शकलीं नव्हतीं.

तिला राहून राहून नवल वाटे, त्याचें आपल्यावर इतकें विलक्षण प्रेम असतांना त्याच्या मनावर आपला थोडा सुद्धां ताबा कां असूं नये ?

त्याच्या महत्त्वाकांक्षांचें स्वारस्य कळण्याचें सामर्थ्य तिच्या ठिकाणीं पुरेपूर होतें. पण त्या महत्त्वाकांक्षांशीं समरस मात्र ती कधींहि होऊं शकली नाहीं. त्याच्या आणि आपल्या मनोवृत्तींतील या वैषम्याचा विचार करतांना तिला पुष्कळदां असें वाटे कीं, स्त्री आणि पुरुष यांची जीवनाकडे पहाण्याची दृष्टि इतकी भिन्न कां असावी ? स्त्रीपुरुषांच्या शरीररचनेंतील फरकाचा तर हा परिणाम नसेल ?

प्रियदर्शनकडे आलेल्या एका बंगाली योग्याचे शब्द तिला आठवले. तो योगी असें म्हणाला होता कीं, "स्त्री ही पृथ्वीचें प्रतीक असून, सृष्टीची धारणा स्त्रीमुळें होते. उलट पुरुष हा आकाशाप्रमाणें अभावात्मक आहे !" त्यावर प्रियदर्शननें उपहासानें हंसून म्हटलें होतें, "पुरुष हा आकाशासारखा असल्या-मुळेंच त्यांच्या विशाल अंतःकरणांत अनेक उज्ज्वल ध्येयें आणि कल्पना हीं, नक्षत्रें आणि तारका यांच्याप्रमाणें, उदय पावतात. स्त्री ही जर सृष्टीची धारणा करीत असेल, तर पुरुष हा तिची उन्नति आणि प्रगति घडवून आणतो. स्त्रीचा जन्म हा पृथ्वीप्रमाणें नुसता भार वाहण्यासाठीं आणि उत्पादन करण्या-साठीं आहे."

हें त्याचें उत्तर ऐकून तो योगी क्षणार्ध स्तब्ध होता. नंतर अगदीं शांत-पणानें म्हणाला, "बाबूजी, तुम्ही चूक करतां ! स्त्री हीच या जगांत सृष्टीची खरीखुरी प्रतिनिधि आणि प्रतीक आहे. विश्व ही जशी आदिशक्तीची लीला आहे, तशी संसार ही स्त्रीची लीला आहे; व आदिशक्तीनें जसें परात्पराला आपल्या हृदयांत कोंडून विश्वाचें चक्र चालविलें आहे, तशी स्त्री पुरुषाला आपल्या मुठींत ठेवून संसाराचा भार वाहते. स्त्री जर उद्यां संसारांतून उडून गेली, तर मृत सतीचें प्रेत हातांवर घेऊन पिसाटाप्रमाणे भटकणाऱ्या महा-देवासारखें पुरुषाचें जीवन निष्प्रकाश आणि निरुद्देश होऊन जाईल. पुरुष

पराक्रमी असेल. पण त्याच्या हृदयांत मानव्याच्या उन्नतीला कारण होणाऱ्या कोमल आणि पवित्र भावना स्त्रीनें उत्पन्न केल्या आहेत; त्याच्या मृगयाशील जीवनांत माणुसकीची जाणीव निर्माण करून स्त्रीनें त्याची साहसी वृत्ति मानवजातीच्या प्रगतीच्या कार्याला जुंपली आहे. महादेव हा मृत्युंजय असला, तरी तो आपल्या एकटयाचा पुरता, उलट आदिशक्तीनें मानव्याचें सातत्य आणि संवर्धन योग्य रीतीनें व्हावें म्हणून जगांतील हर एक प्रकारची जीर्णता नष्ट करण्यासाठीं मृत्यूला राबवून घेतला आहे. पुरुष हा विनाशाचें, तर स्त्री ही त्या विनाशाला विकासाच्या कामीं राबवून घेणाऱ्या सातत्याचें, मृत्यूवर मात करणाऱ्या अमरत्वाचें प्रतीक आहे. बरट्रँड रसेलनें म्हटलें आहे तें कांहीं खोटें नाहीं. पुरुषांची संख्या घटली, तरी जग सुरळित चालूं शकेल. पण स्त्रियांची संख्या घटली, तर मात्र समाजाचा तोल अजिबात बिघडून, जग ऱ्हासाच्या मार्गाला लागेल !"

त्या योग्याशीं झालेला हा संवाद तिला आठवला आणि त्या रात्रीं प्रियदर्शनशीं त्याबद्दल मागाहून झालेलें बोलणेंहि सारें तिच्या मनांत आलें. याच अशोकाच्या झाडाखालीं तो तिला म्हणाला होता, "तूं कांहीं म्हटलंस तरी विनाशाशिवाय प्रगति शक्य नाहीं, कांता ! म्हणून स्त्री जेव्हां आवश्यक अशा विनाशाच्या आड येईल, तेव्हां पुरुषानें तिचा मोह लाथाडलाच पाहिजे !"

त्याच्या आयुष्यांतला तो आपल्याला लाथाडण्याचा क्षण तर आज जवळ आलेला नाहीं ना ?

ती कल्पना मनांत येतांच तिच्या अंगावर एकदम शहारे आले आणि आपल्या पोटांत फिरत असल्याचा भास तिला झाला.

त्याबरोबर तिच्या मनांत आलें—आपल्याला हा तिसरा महिना आहे आणि तिच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले.

गेल्या वर्षी याच दिवसांत तिला पांचवा महिना लागतो न लागतो, तोंच शस्त्रक्रियेचा प्रसंग तिच्यावर ओढवला होता.

म्हणून डॉक्टरांनीं या वेळीं प्रियदर्शनला बजावून सांगितलें होतें कीं, तिच्या मनःक्षोभाला कारण होईल अशी कोणतीहि गोष्ट घडतां कामा नये !

आणि तरी सुद्धां आज प्रियदर्शन !–

–तिनें दोन्ही हात एकांत एक गुंतवून आपल्या हृदयावर दाबले आणि डोळे मिटले.

जणुं कांहीं त्याच्याविषयीं जे कठोर विचार तिच्या हृदयांत या वेळीं उसळून येत होते, ते दाबून टाकण्याचा प्रयत्न तिनें केला–जी भीषण भवितव्यता तिच्या डोळ्यांपुढें दिसूं लागली होती. ती टाळण्यासाठीं तिनें डोळे मिटले.

# १२

# चिताभस्माची दीक्षा

" एक तुला तरी मुंबईला गेलं पाहिजे किंवा जयंताला तरी इथं आलं पाहिजे. एरवीं आपला कोणताहि बेत नीट तडीस जाणं शक्य नाहीं. पत्रव्यवहारावर माझा मुळींसुद्धां भरंवसा उरला नाहीं आतां, जया ! "

" पण इथं आल्यावर तो उतरणार कुठं ? आमच्यापैकीं कोणाहिकडे तो उतरणं आतां शक्य नाहीं मुळींच ! परवा साहेब अकस्मात् मुंबईला जाऊन आल्यापासून माझ्या मनांत नाहीं नाहीं त्या शंका यायला लागल्या आहेत—"

" खरी आहे तुझी भीति. पण मला वाटतं आमचं भांडार कांहीं त्यांच्या डोळ्यांवर आलेलं नाहीं अजून—"

" बहुधा नसावं ! कारण तुमचा पूर्वेतिहास फारच थोड्यांना माहीत आहे नागपूरला—"

" पण त्या थोड्यांपैकीं तुझे साहेब हे खात्रीनं एक असले पाहिजेत ! अन् त्या दृष्टीनं जयंतानं इथंहि येणं इष्ट नाहीं मुळींच !—"

ते शब्द उच्चारून श्यामासुंदरी स्तब्ध राहिली. तिचे हात टेबलावर पडलेल्या किल्ल्यांच्या जुडग्यांशीं चाळा करीत होते. पण तिची दृष्टि मात्र जयंताच्या चिंताग्रस्त चेहऱ्यावर स्थिर झाली होती.

भांडाराच्या माडीवरील श्यामासुंदरीच्या अंतर्गृहांत तीं दोघें बसलीं होतीं. त्या खोलीला अंतर्गृह म्हणण्याचें कारण असें कीं, तिच्या संमतीशिवाय कृष्णकांताचा सुद्धां तींत प्रवेश झालेला कोणी पाहिला नव्हता. तसें त्या खोलींत

विशेष कांहींच नव्हतं. कोपऱ्यांतील लांकडी स्टँडवर बंगाली, इंग्रजी आणि हिंदी पुस्तकें व्यवस्थित लावून ठेवलेलीं होतीं; व त्याच्या समोर असलेल्या छोट्या मेजावर वेषभूषेचें साहित्य मांडलेलें होतें. भिंतीवर टांगलेल्या एकुलत्या एका सुबक छोटेखानी फोटोला सुंदर रेशमी फुलांचा हार घातलेला होता. त्या खोलींत पाऊल ठेवल्याबरोबर नजरेंत भरण्याजोगी शोभिवंत वस्तु काय ती तेवढीच होती. खोलीच्या मध्यभागीं ठेवलेल्या वाटोळ्या टेबलाभोंवतीं चार खुर्च्या मांडलेल्या होत्या; व त्या खुर्च्यांवर तीं दोघें समोरासमोर बसलीं होतीं.

जयानें सिगारेटच्या तोंडावर सांचलेली राख झटकली आणि एक झुरका घेऊन तो म्हणाला—

" समजा, त्याला आम्हीं परस्पर स्टेशनवर उतरून पारडार्शिंग्याला नेला तर ? म्हणजे सगळींच कामं व्यवस्थित पार पडतील. रेल्वेचा खजिना लुटण्याचा आमचा बेत त्याला समजावून देऊं आणि इतरहि साऱ्या गोष्टी निवांतपणानं बोलून टाकूं—"

" तें खरं. पण माझी न् त्याची भेट होणं मात्र शक्य नाहीं !—"

" कां बरं ? तुला पारडार्शिंग्याला यायला काय हरकत आहे ? वाटल्यास पड्याच्या मोटारींतून जाऊं—"

" पड्याच्या मोटारींतून फार तर कळंबपर्यंत जातां येईल, पुढंहि जर तुम्ही मला पड्याच्या गाडींतून नेलं, तर लोक नाना प्रकारचीं तर्कटं लढवतील न् सारा प्रकार साहेबांच्या कानांवर जाईल—"

" खरं आहे तुझं म्हणणं ! गांवांत तुला कशीहि नेली, तरी तें पचायचं नाहीं.—मग कशी होणार तुझी न् जयंताची भेट ?—"

" नाहीं होणार. नाहीं तरी गेल्या तीन वर्षांत आम्हीं कुठं एकमेकांना भेटलों आहों ?—कदाचित् यापुढं आमची कधींहि भेट होऊं नये, असाच मुळीं दैवयोग असेल—"

बोलतां बोलतां श्यामासुंदरीचा आवाज भरून आला व आपल्या मनाचा तो क्षोम त्याच्या लक्षांत येऊं नये म्हणूनच कीं काय ती एकदम उठून खिडकीजवळ जाऊन बाहेर पहात उभी राहिली.

सूर्य या वेळीं मावळण्याच्या बेतांत होता. खिडकींतून आंत आलेल्या त्याच्या सोनेरी प्रकाशाच्या झोतांत तिची पुष्ट, पाठमोरी रेषाकृति सुरम्य दिसत होती. तिनें एक हात वर करून खिडकीचा गज धरला होता. त्यामुळें पदर आपोआप आंवरला जाऊन तिचा त्या बाजूचा उरोज अर्धवट दिसत होता; व त्या हातावर मस्तक टेकल्यामुळें तिच्या चेहऱ्याचा त्याच्याकडे कललेला भाग त्या संधिप्रकाशांत त्याला अत्यंत मोहक वाटला. फिक्या जास्वंदी रंगाचें पातळ ती नेसली होती. बाहेर पडलेला अरुण संधिप्रकाश, तिची गव्हासारखी सांवळी अंगकांति, त्या पातळाचा जास्वंदी रंग, भांगेंतील सिंदूराची रेषा आणि टवटवीत ओष्ठयुग्मावरील तांबूलाची लाली यांच्यांत उत्पन्न झालेली रंगसंगति जितकी मनोहर तितकीच मादक होती.

आपल्या नाकांतून बाहेर पडणाऱ्या धूम्रवलयांत तो तिच्याकडे अनिमिष नेत्रांनीं पहात होता. विरळ धुक्यांतून दिसणाऱ्या आरक्त उषेसारखीच जणुं तिची ती मूर्ति त्याला विलोभनीय वाटली.

त्यानें सिगारेट विझवून रक्षापात्रांत टाकली. नंतर तो हळूच उठून तिच्या जवळ गेला आणि तिच्या खांद्यावर हात ठेवून उद्गारला—

" श्यामा—"

त्याबरोबर ती एकदम त्याच्याकडे वळली; व आपल्या खांद्यावरून त्याचा हात काढण्याचा तिनें प्रयत्न केला. तेव्हां तिचा तो हात आपल्या हातांत घेऊन त्यानें पुनः पुन्हा त्याचें चुंबन घेतलें.

तिनें अगदीं संथपणें तो चुंबनवर्षाव सहन केला. नंतर त्याच्या हातांतून आपला हात सोडवून घेऊन ती त्याला सरोष पण आर्जवयुक्त आवाजांत म्हणाली—

" जया, हें शोभत नाहीं तुला !—"

" कां बरं ? तुझं प्रेम नाहीं माझ्यावर, श्यामा ? "

" प्रेम असलं म्हणून काय झालं ? प्रेमाच्या बाबतींत पुरुष अमर्यादपणानं वागूं शकतात. पण बायकांचं मात्र मर्यादा सोडून चालत नाहीं. मी तुला एकदां सांगितलंय ना माझ्या शरीरावर माझी सत्ता नाहीं म्हणून ? आराकानच्या जंगलांत मशिनगनला साक्ष ठेवून मी माझं हृदय जयंताला अर्पण

केलं आणि माझ्या शरीरावर त्याला वाटेल तशी सत्ता गाजवूं दिली. तूं मला जरी कितीहि प्रिय असलास, तरी मर्यादेपलीकडे जातां येणार नाहीं आपल्याला—"

"पण सांप्रदायिक नीतीवर आपला विश्वास नाहीं, असं तू म्हणत असतेस ना नेहमीं ?—"

"होय. नाहीं खराच. पण सांप्रदायिक नीतीवर विश्वास नसला म्हणून काय झालं ? सांप्रदायिक नीतीवर ज्यांचा विश्वास नसतो, त्यांचं स्वतःचं असं एक नीतिशास्त्र त्यांनीं आपल्यासाठीं निर्माण केलेलं असतं; व तें सांप्रदायिक नीतिशास्त्रापेक्षांहि पुष्कळदां अधिक कठोर असतं. मनुष्य जें बंधन आपल्या बुद्धीनं स्वतःवर लादून घेतो, तें पाळण्यांत त्याला एक प्रकारचा आनंद असतो, अभिमान वाटतो—"

"पण जयंतानं माझ्यावर प्रेम करायला मुभा दिली आहे ना तुला?—"

"तें त्याचं सौजन्य झालं. पण मलाहि माझा धर्म कांहीं पाळला पाहिजे ना ? तुझ्याविषयीं माझ्या मनांत प्रेम उत्पन्न होतांच तसं मी त्याला अगदीं स्पष्ट शब्दांनीं कळवून टाकलं. कारण कोणत्याहि बाबतींत एकमेकांची फसवणूक करायची नाहीं असं ठरलेलं आहे आमचं. पण त्याला मी कांहींहि कळवलं असलं, तरी माझी मर्यादा मी सोडूं शकत नाहीं—"

"पण श्यामा, जी स्त्री एकाच वेळीं दोन पुरुषांवर प्रेम करीत असते, तिनें त्यांच्याशीं वागतांना भेदाभेद करण्यांत काय स्वारस्य आहे ?—"

"स्वारस्य खात्रीनं आहे. जया, माझं तुझ्यावर प्रेम आहे, तें तुझ्यावर म्हणून नाहीं; तर जयंताच्या ऐवजीं, त्याच्या अभावीं म्हणून आहे !—"

"म्हणजे ? मी अर्थ समजलों नाहीं तुझ्या या बोलण्याचा !—"

"अर्थ उघड आहे अगदीं. मी तुझ्यावर जें प्रेम करितें, तें तूं जयंताचं प्रतिबिंब असल्याचा भास मला सारखा होतो, म्हणून करतें. त्याच्या न् तुझ्या रूपांत, वृत्तींत न् विचारांत जें साम्य आहे, त्या साम्यामुळें तूं मला प्रिय झाला आहेस. जयंताचं पत्र घेऊन जेव्हां दीड वर्षापूर्वी तू मला प्रथम भेटायला आलास, तेव्हांची आठवण करून पहा—मी आनंदाच्या भरांत एकदम ' जया '

म्हणून हांक मारली तुला; न् तूं मला लगेच विचारलंस "तुम्ही मला बकितल्याबरोबर कसं ओळखलंत," म्हणून !—मी त्या वेळीं कांहीं बोललें नाहीं. पण, संध्याकाळच्या त्या अंधुक प्रकाशांत तूं जेव्हां एकदम आंत आलास, तेव्हां मला जयंतच आल्याचा भास झाला !—त्या दिवसापासून त्या लोभनीय भासावर मी प्रेम करीत आहे; तो भास वारंवार उत्पन्न करणारा म्हणून तूं मला प्रिय आहेस !—"

"किती क्रूरपणाचं बोलणं आहे तुझं हें, श्यामा !—"

ते शब्द उच्चारून तो एकदम खुर्चीवर जाऊन बसला. आणि त्यानें आपलें मस्तक त्या टेबलावर टेकलें.

ती तत्क्षणींच त्याच्याजवळ आली. आणि, आईनें जसें मुलाचें जावळ त्याच्या कुरळ्या केसांत अंगुलि घालून, कुरवाळावें, त्याप्रमाणें त्याच्या त्या अवनत मस्तकावर प्रेमभरानें हात फिरवीत ती म्हणाली—

"माझं बोलणं क्रूरपणाचं असलं, तरी तें सत्य आहे न् सत्य हें वेळींच कळलेलं बरं ! जया, जी गोष्ट मला कदाचित् कधींहि देणं शक्य होणार नाहीं, ती तूं मजजवळ मागूं नकोस, आणि आपलं दोघांचं आयुष्य दुःखी करूं नकोस. आपलं जीवित हें वाहिलेलं आहे. आपलं अंगीकृत कार्य तडीस जाईपर्यंत त्यावर आपला कोणत्याहि प्रकारचा हक्क नाहीं. कोणत्याहि अन्य कामासाठीं आपण त्याचा उपयोग करूं शकत नाहीं किंवा उपभोगहि घेऊं शकत नाहीं. तुझ्या अंतःकरणांत उत्पन्न झालेल्या भावनांचं सामर्थ्य मला कळतं. सृष्टींतल्या कोणत्याहि वादळापेक्षां त्या भावनांचा आवेग प्रबळ असतो. त्या आवेगानं हतबुद्ध होऊन आम्हीं एकदांच, जया, आराकानच्या जंगलांत त्या चांदण्या रात्रीं, प्रणयमधूचा यथेच्छ आस्वाद घेतला. पण त्यानंतर ती गोष्ट पुन्हा घडली नाहीं;—आम्हीं निग्रहानं त्या मोहापासून अलिप्त राहिलों. जया, आपल्या ध्येयाला विसरून तूं या मोहांत मला गुंतवूं नकोस !—"

तिनें त्याचें मस्तक हळुहळू वर उचललें आणि त्याच्या केसांचें, कपाळाचें, आसवांनीं भिजलेल्या डोळ्यांचें चुंबन घेतलें.

तिच्या ओष्ठयुग्माचा तो हळुवार स्पर्श त्याला दंवानें भिजलेल्या फुलांच्या स्पर्शासारखा शीतल वाटला; व त्या स्पर्शाबरोबर जाणवलेलें तिचें मंदमधुर श्वसन त्याला कृष्णकमळाच्या गंधासारखें शामक वाटलें.

कांहीं वेळ तीं दोघें स्तब्ध होतीं.

नंतर तिचा हात आपल्या हातांत घेऊन तो कुरवाळीत जयसिंग म्हणाला, "श्यामा, आजपर्यंत न सांगितलेली एक गोष्ट तूं मला सांगितली पाहिजेस आज!—"

"कोणती बरं?—"

"तुझा आणि जयंताचा पूर्वेतिहास—"

ती क्षणार्ध कांहींच बोलली नाहीं. नंतर म्हणाली—

"जयंताचा पूर्वेतिहास तुला माहितच आहे."

"होय. असहकारितेच्या चळवळींत शाळा सोडीपर्यंतचा. पुढचा नाहीं. तो हिंदु विद्यापीठांतून बी. एस्सी. झाला एवढंच फक्त केशवनं सांगितलंय् मला. पण मधल्या काळांत तो कुठं होता आणि तुझा न् त्याचा संबंध कसा आला याची कांहींच कल्पना नाहीं. अन् तुझी माहिती तर तूं कधींच मला सांगितली नाहींस."

"कां बरं? एक गोष्ट मी तुला सांगितली आहे—"

"कोणती?"

"भाईच्या फांसावर जाण्याची!—"

"पण ती एक गोष्ट म्हणजे कांहीं तुझा इतिहास नव्हे. मला तुझं सगळं जीवन कळलं पाहिजे—तूं आणि जयंता कशा रीतीनं एकत्र आलांत तें कळलं पाहिजे—"

"जयंताला मी प्रथम पाहिल्याला आठ वर्षं झालीं असतील आतां, जया! मी कॉलेजांत होतें त्या वेळीं. माझा भाई दुर्गापूजेच्या सुटींत बनारसहून घरीं आला, त्या वेळीं जयंताला बरोबर आणला होता त्यानं. पूजेच्या उत्सवांत आम्हीं रात्रीच्या रात्री घालविल्या आहेत नाना प्रकारच्या गप्पा मारण्यांत न् बेत करण्यांत—"

" कलकत्त्याला रहात होतात तुम्ही तेव्हां ?–"

" नाहीं. डाक्याला !–तुला आठवत नाहीं का भाई डाक्याच्या कमिशनरला गोळी घालून मारल्याबद्दल फांसावर गेला–"

ती एकदम थांबली.

त्याबरोबर तिच्याकडे स्थिर दृष्टीनें पहात जयानें तिला विचारलें, " जयंताचा संबंध होता त्या प्रकाराशीं ?–"

जणुं कांहीं तो तिच्या मनाचा ठाव घेण्याचा प्रयत्न करीत होता.

ती प्रथम कांहीं बोलली नाहीं. पण नंतर त्याची ती भेदक दृष्टि टाळून तिनें म्हटलें, " प्रत्यक्ष असा कांहीं नव्हता. भाईला पकडल्याबरोबर तो जो डाक्याला आला, तो मग शेवटपर्यंत आम्हांला सोडून गेला नाहीं–"

ती पुन्हा थांबली. तिचे डोळे विस्फारित झाले आणि त्यांत विद्वेषाची दीप्ति धगधगूं लागली.

तिच्या चर्येत एकाएकीं झालेला तो बदल जया भयसंमिश्र विस्मयानें पहात होता. त्यानें हळूच तिला म्हटलें—"

" श्यामा, तूं बोलत कां नाहींस ?–"

" मी बोलतें आहे ना, जया !—तूं मघाशीं विचारलंस मला ' तूं न् जयंता कशा रीतीनं एकत्र आलांत ' म्हणून !–त्या दिवशीं भाईच्या पवित्र शरीराचं दहन करणाऱ्या त्या दिव्य अग्नीला साक्ष ठेवून आम्हीं एकत्र आलों. आमच्या डोळ्यांतील अश्रूंबरोबरच आमच्या जीवनांचेहि ओघ एकवटले. पण मी चुकलें ! अश्रु फक्त माझ्या एकटीच्या डोळ्यांतून पडले. जयंत इतक्या निश्चल नजरेनें त्या चितेकडे पहात होता कीं, भाईच्या आत्म्याचें त्या ज्वालांच्या रूपानें वर उफळणारें सारें तेज जणुं तो आपल्या त्या ताठरलेल्या अश्रुशून्य, कठोर डोळ्यांत सांठवून घेत होता !—पाहतां पाहतां त्यानें त्या धडधडणाऱ्या चितेंत हात घातला; व तिच्यांतलें धगधगीत भस्म घेऊन तें प्रथम आपल्या कपाळाला आणि नंतर माझ्या कपाळाला त्यानें लावलें !—"

बोलतां बोलतां तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले व ती स्तब्ध झाली,

तिच्या मनाचा तो क्षोभ थोडा कमी झाल्यावर जयसिंग म्हणाला, "श्यामा, त्या प्रकारानंतर तुम्हीं लगेच डाका सोडलात ?—"

"सोडणं भागच होतं. कारण आमच्याजवळ जें कांहीं होतं नव्हतं तें सारं जाऊन पोलिसचा ससेमिरा मात्र अहोरात्र मागं लागला. मामाचं हें भांडार त्या वेळीं निघालेलं होतं. पण, तशा स्थितींत इथं येऊन त्याच्याजवळ राह्यचं, म्हणजे त्याच्याविषयींचा पोलिसांच्या मनांतला बुजालेला दंश डिंवचून जागा करायचा ! म्हणून जयंता मला न् आईला घेऊन कानपूरला आला—"

"कानपूरला कां म्हणून ?—"

"तें मला नीटसं सांगता येणार नाहीं ! त्याच्या जवळचे पैसे सरले होते; न् म्हणून त्यानं एका मुसलमान जमीनदाराकडे नोकरी धरली. तिथंच त्याच्या धाडसी स्वभावाची प्रतीति आली मला प्रथम—"

"ती कशी काय ?"

"एक दिवस कँटोनमेंटमधील तेलाच्या वखारीला आग लागली. त्या वेळीं मिलिटरीचे लोक आग विझवायचा प्रयत्न करीत असतां हा मदतीला धांवला त्यांच्या ! त्या वखारीच्या जवळच्या इमारतींत एक युरोपियन कुटुंब रहात होतं. तीं सगळीं माणसं सुखरूप बाहेर पडलीं त्या आगींतून. फक्त एक लहान मुलगी चुकून आंत राहिली. तिला बाहेर आणण्यासाठीं त्या आगीच्य डोंबाळ्यांत शिरण्याचं धैर्य होईना कोणाला ! पण, हा पाण्याच्या टाकींत स्वतःचं अंग भिजवून ओलं थबथबीत करून घेऊन त्या भयंकर आगींत घुसला न् त्यानं त्या मुलीला बाहेर आणलं ! अतिशय होरपळलं त्याचं अंग त्या वेळीं—"

"होय. आतां मला आठवतं ! मी मुंबईला जेव्हां त्याला चंद्रशेखरकडे पाहिला, तेव्हां त्याच्या उजव्या गालावर न् हातावर भाजल्याचे डाग दिसले होते—"

"त्या युरोपियनाचा त्याच्यावर लोभ जडला तेव्हांपासून न् मिलिटरी हॉस्पिटलमध्येंच नेण्यांत आलं त्याला ! त्याचा फायदा त्यानं विलक्षण रीतीनं घेतला. लष्करी डावपेंचांवरील दुर्मिळ पुस्तकं न् टिपणं त्यानं वाचून काढलीं तिथं असतांना; न् एका युरोपियन लेफ्टनंटचा स्नेह संपादून मशिनगन चालवि-

ण्याचीहि माहिती करून घेतली ! त्याच्या धाडसामुळं न् दिलदारपणामुळं मिलिटरींतले लोक त्याला अतिशय चहात असत; व त्यामुळंच मागचा पोलीसांचा उपद्रव बराचसा कमी झाला. कानपूरला वर्ष सवा वर्ष काढल्यावर तो पुन्हा शिक्षण पुरं करण्यासाठीं आम्हांला घेऊन बनारसला परत आला—"

"पण आराकानच्या जंगलाचा जो उल्लेख तूं मघांशीं केलास, तो प्रसंग केव्हांचा ?—"

"कानपूरला असतांनाचा—मशिगननचे सुटे भाग मोठ्या युक्तीनं मिळवले होते त्यानं तिथं. पण ती चालवून पाहणं कांहीं शक्य नव्हतं. म्हणून आम्हीं दोघं चितगांवला आलों. इथंच सूर्यसेनाशीं ओळख झाली त्याची न् आराकानच्या जंगलांत त्यानं आपलं लष्करी शिक्षण पूर्ण करून घेतलं—"

"हा सूर्यसेन कोण ? मी त्याचं नांव कधीं ऐकलं नव्हतं आजवर तुझ्या तोंडून—"

"मला सुद्धां माहिती नाहीं त्याची फारशी !—"

"श्यामा, तूं खरं सांगत नाहींस मला."

"जया, तूं फक्त आमच्या दोघांच्या जीवनाची माहिती विचारली होतीस. तेवढी सगळी मी खरीखुरी सांगतें आहे तुला—"

"माझ्यावर विश्वास नाहीं, श्यामा, तुझा ?"

"विश्वास ?—हा प्रश्न विश्वासाचा नाहीं जया; सोईचा न् गरजेचा आहे. तुला जी माहिती कळण्याची आज जरूर नाहीं, ती सांगून फायदा काय ? शिवाय, खरंखरं सांगतें तुला मी, मला सुद्धां फारशी माहिती नाहीं सूर्यसेनाची."

तिचे ते शब्द जितके आर्जवी तितकेच निग्रहाचेहि द्योतक होते.

त्याचा चेहरा अगदीं उतरून गेला.

ती क्षणार्ध घुटमळली ! नंतर त्याचे दोन्ही हात तिनें आपल्या हातांत घेतले. आणि पुढें बोलावयाला सुरवात केली.

"त्या बाजूला तीन एक महिने राहून आम्हीं पुन्हा बनारसला परत आलों. तिथं असतांना त्याच्या धाडसी स्वभावाची पुन्हा एकदां प्रतीति आली मला—"

"हें कोणतं धाडस आणखी ?—"

"हें धाडस इतकं विलक्षण आहे कीं, त्याच्या आठवणीनं शहारे येतात माझ्या अंगावर अजून! डिसेंबरचे दिवस होते ते. जयंता कॉलेजांत गेला असतांना तिथं त्याला कळलं कीं, बनारसला एक सीप्लेन आलं असून तें गंगेच्या पात्रांत उभं करून ठेवलेलं आहे. तत्क्षणींच त्याच्या मनानं घेतलं कीं, त्या विमानांत प्रवेश करून आपण त्याच्या रचनेची माहिती करून घ्यावी. पण तें जमायचं कसं ? विमानाच्या दोहों बाजूंनीं खडा लष्करी पहारा होता; न् तें दुसऱ्या दिवशीं सकाळींच निघून जायचं होतं. आम्ही पुष्कळ समजूत घातली त्याची. पण तो कांहीं केल्या ऐकेना. शेवटीं मध्यरात्रीच्या सुमारास आम्ही दोघं न् त्याचे कॉलेजांतले दोन स्नेही मिळून गंगेवर गेलों. त्याचा एक स्नेही त्याच्याबरोबर विमानावर जायला तयार झाला होता. त्या दोघांनीं अंगाला शिरसूचं तेल चोपडून घेतलं होतं. शेवटच्या क्षणापर्यंत मी त्याची पुष्कळ विनवणी केली. पण माझं बोलणं न् रडणं मनावर न घेतां, उलट माझ्या भित्रेपणाची टिंगल करीत तो आपल्या त्या मित्रासह पहांटे दोन वाजतां पाण्यांत उतरला. मला क्षणोक्षणीं वाटे, पहारेवाले सार्जंट जागे होऊन त्यांनीं गोळी झाडली तर! कारण, आवाज होऊं नये म्हणून ते जरी अगदीं चपळाईनें पोहत होते, तरी पाण्याची सळसळ सारखी कानांवर येत होती!—अखेर विमानाच्या फ्लँकवरून ते दोघे वर चढले व तासभर आंत राहून पहांटे साडे-तीनच्या सुमारास परत आले. त्याला परत येतांना पाहीपर्यंत माझा जीव सारखा धाकधूक करीत होता भीतीनं. तो किनाऱ्यावर आल्याबरोबर मी भान विसरून त्याला घट्ट मिठी मारली व मला ओक्साबोक्शी रडूं कोसळलं—"

"काय विलक्षण धाडस!"

"त्याच्या विलक्षणपणाची कल्पना वर्णनानं कधींहि येणार नाहीं. मला जेव्हां जेव्हां त्या प्रसंगाची आठवण होते, तेव्हां तेव्हां थरकांप होतो माझ्या काळजाचा अगदीं! माझा भाईसुद्धां धाडसी होता. पण जयंताचं धाडस कांहीं अचाटच!"

ती कांहीं वेळ स्तब्ध राहिली.

नंतर जयानें तिला विचारलें, " तूं मुंबईला कशी नाहीं गेलीस त्याच्या बरोबर ? "

" बनारसला आई अत्यवस्थ असतां मामा नागपुराहून आला होता तिला भेटायला. त्यानं मला फार गळ घातली इथं यायची. शिवाय मुंबईला गेल्यावर काय करायचं हें जयंताचं कांहींच नक्की ठरलेलें नव्हतें. अशा अनिश्चित स्थितींत मी त्याच्याबरोबर जाण्यांत फायदा नव्हता कांहीं. म्हणून मी मामाबरोबर नागपूरला आलें. आपलाहि एक उद्देश होता त्याचा मला नागपूरला पाठविण्यांत— "

" कोणता उद्देश ? — "

" नागपूरला आपलं एक केंद्र असावं.—म्हणजे ढाका, कलकत्ता, नागपूर आणि मुंबई यांच्यांत दळणवळण ठेवायला सोपं जाईल असं म्हणत असे तो नेहमीं ! त्या उद्देशानं त्यानं मला इथं पाठवली. बाकी तुझी न् त्याची जर चंद्रशेखरकडे भेट झाली नसती, तर माझं इथं रहाणं वायां गेलं असतं !—आपल्या कार्यासाठीं मामाच्या भांडाराचा तूं कुशलतेनं उपयोग करून घे, असं जेव्हां तो मला म्हणाला, तेव्हां मी त्याला स्पष्ट सांगितलं होतं, तूं माझ्याकडून फारशी अपेक्षा करूं नकोस म्हणून !— "

" खरं आहे तुझं म्हणणं ! जयंताचं पत्र घेऊन येण्यापूर्वी मी पुष्कळ वेळा पाहिली होती तुला इथं ! पण, माझ्या स्वप्नांतहि कधीं आलं नाहीं, तूं अशा प्रकारची विलक्षण स्त्री असशील म्हणून ! उलट तुझ्या न् कृष्णकांताच्या संबंधीं विद्यार्थ्यांत जे प्रवाद प्रचलित आहेत, तेच मीहि खरे धरून चाललों होतों.— "

" त्या प्रवादांनीं रक्षण केलंय माझं पोलिसांच्या संशयी दृष्टीपासून— "

" नाहीं तर तुझ्या चरित्राची दीप्ति डोळ्यांवर आली असती त्यांच्या ! " तो तिचे हात आपल्या हातांत घेत म्हणाला. " श्यामा, जीवनाची एक अगदीं लोकोत्तर बाजू दाखविलीस तूं आज मला ! आपल्यांतली साहसाची प्रवृत्ति इतकी कांहीं कमी झाली आहे कीं, विद्यार्थिदशेंत जें उसळतें तरुण रक्त वाटेल तें अचाट कृत्य करायला बेदरकारपणानं प्रवृत्त व्हावं, त्याची ती सारी उसळी

आज पोरींच्या चेहऱ्यावर, बीरच्या फेसांवर न् सिगारेटच्या धुरावर उतून वायां जात आहे! जयंताचं जीवन किती प्रखर, किती तेजस्वी आहे!—"

"पण तसं तेजस्वी जीवन जगण्याची ज्याला आकांक्षा असेल, त्याला अणुअणूंनीं आपल्या सगळ्या शक्तीचं हवन कोणत्या ना कोणत्या तरी अत्युच्च ध्येयासाठीं सतत करावं लागतं! जया, दहनाशिवाय दीप्ति नाहीं. आपण जेव्हां प्रकाशाचा झगझगाट पहातों, तेव्हां आपल्या हें मनांत येत नाहीं कीं, तो झगझगाट निर्माण करण्यासाठीं कोणी तरी अणुअणूंनीं जळत आहे, कशाची तरी कणाकणांनीं राख होत आहे! महादेवाची चिताभस्माची आवड ही ईश्वरी शक्ति मानवजातीपासून जगाच्या उन्नतीकरितां अपेक्षित असलेल्या आत्माहुतीची तर निदर्शक नसेल ना?—"

# १३

# पराभूत मनोवृत्ति

१

शिवनिवास धनतोली
नागपूर, १२ मार्च १९३०

प्रिय जयंता,

सप्रेम नमस्कार. तुझें पत्र वाचून माझी फार निराशा झाली. तू नागपूरला नक्की येणार अशा आनंदांत आम्ही होतों; व म्हणून पारड-शिंग्याचा कार्यक्रम खूप मजेंत घालविण्याची तयारी आम्ही ठेवली होती. तुझ्या नकारानें आमचा फार विरस केला. बाकी तूं येणार नाहींस असें भाकित श्यामानें आधींच वर्तविलें होतें !

तूं येथें आला असतास, तर तुला अनेक गोष्टी समक्ष दाखविल्या असत्या आणि अनेक गोष्टी आपण बोललों असतों. पेशव्यांच्या राजधानींत बरींच वर्षे घालविलेला तूं; तुला या भोसल्यांच्या राजधानीनें महाराष्ट्राच्या वैशिष्ट्याची एक निराळीच बाजू दाखविली असती. पुणें बुद्धिप्रधान असेल, तर नागपूर हें बलोपासक आहे; बुद्धिपेक्षांहि जगांत बलाला जास्त महत्त्व आहे, असें मानणारें आहे. तुला कदाचित् वाटेल, भोसल्यांच्या आनुवांशिक अभिमानानें सळसळणारें माझें सरदारी रक्त बोलतें आहे ! पण नाहीं. तूं इथें येऊन पहा;—क्षात्रवृत्तीची जोपासना करण्याची ईर्ष्या

अद्यापहि इथल्या लोकांत जागृत आहे. त्या दृष्टीनें तुला एकवार संघांत नेण्याची मला फार इच्छा होती. संघाच्या चालकांचा न् आपला दृष्टिकोन अगदीं भिन्न आहे, हें खरें. पण सशस्त्र क्रांतीच्या मार्गावर विश्वास ठेवणारी आणि त्या भावनेनें थोडी फार तयारी करणारी अशी एवढीच एक संस्था आपल्या महाराष्ट्रांत आहे; व तिचें निमलष्करी स्वरूप पाहून तुला खचित आनंद झाला असता. या अनत्याचाराच्या युगांत शस्त्राचा-चाराची दीक्षा युवकांना उघड उघड देणारा हा संघ म्हणजे गांधी-वादाला मूर्तिमंत आव्हानच होय! आपले पूर्वज शस्त्रपूजक होते याचें स्मरण संघाच्या विजयादशमीमुळें आज लोकांत उत्कटतेनें जिवंत राहिलें आहे.

याहिपेक्षां महत्त्वाची गोष्ट तूं आल्यावर मी करणार होतों. ती म्हणजे पंडितजींची आणि तुझी समक्ष गांठ घालून देणें. गेल्याच आठ-वड्यांत ते येथें येऊन गेले. त्या वेळीं सशस्त्र क्रांतीच्या शक्याशक्यते-बद्दल आम्ही पुष्कळच चर्चा केली. सारें बोलणें बव्हंशीं तात्त्विक असेंच झालें. कारण मी त्यांना विश्वासांत घेऊन कांहींहि सांगितलें नाहीं. त्यांचें म्हणणें असें पडलें कीं, सशस्त्र क्रांतीचा मार्ग दिवसेंदिवस जास्त जास्त अशक्य होत चालला असून, सामुदायिक सक्रिय प्रतिकाराच्या ( *Active resistance* ) मार्गानेंच यापुढें आपल्याला जाणें प्राप्त आहे. विमानें आणि इतर संहारास्त्रें यांच्या शोधामुळें महायुद्धाच्या काळापेक्षां लष्करी बाबतींत जग आज एकदम कांहीं शतकांनीं पुढें गेलें असून, इंग्लंडसारख्या प्रगत आणि प्रबल राष्ट्राविरुद्ध आतां सशस्त्र क्रांति करणें व्यवहार्य वाटत नाहीं. अशा स्थितींत, पंडितजी मला म्हणाले, महात्माजींच्या राजकीय कार्यक्रमाला एकवार पूर्ण संधि कां देऊं नये?—त्यांत हानि कोणत्याच प्रकारची नाहीं. उलट, सामुदायिक उठावणीचें थोडें तरी शिक्षण लोकांना मिळेल, हें निःसंशय. म्हणून त्यांनीं मला आग्रहानें सांगितलें कीं, अनत्याचारावर विश्वास नसणाऱ्या धाडसी तरुणांनींहि तूर्त आपला विरोध बाजूला ठेऊन गांधीजींच्या

चळवळीला मदतच करावी. त्यांच्या या युक्तिवादांत तथ्य आहे असें नाहीं वाटत तुला ? खरोखरी, त्यांच्याशीं तुझें एकदां समक्ष बोलणें झालें असतें, तर जुन्या पिढींतील क्रांतिकारकांची भूमिका आज कां आणि कशा रीतीनें बदलली आहे, याची तुला चांगली कल्पना आली असती.

स्वामीजी अजून इथेंच आहेत. त्यांच्याशींहि मी या विषयाची चर्चा केली. त्यांचें मत पंडितजींच्या अगदीं उलट पडलें. १९२० सालीं गांधींचा घेतला तेवढा अनुभव पुरे झाला, असें ते अगदीं तिट-कार्‍यानें म्हणाले. सशस्त्र क्रांतीच्या इष्टानिष्टतेविषयीं मी त्यांनाहि विचारलें. तेव्हां, अरविंदबाबूंनीं पांदिचरीला जाण्यापूर्वीं प्रसिद्ध केलेल्या पत्रांतील शब्दांचा अनुवाद करून ते मला अगदीं गंभीर मुद्रेनें म्हणाले, " ती महान् चळवळ यशस्वी रीतीनें चालवील असा नेता अद्याप निर्माण झालेला दिसत नाहीं ! " स्वामीजींचा मुक्काम सध्यां प्रियदर्शनकडे असून त्यांचें योगसाधन नेहमींप्रमाणें चालू आहे.

क्रांतिकारकांच्या गेल्या पिढींतील दोघां व्यक्तींचें हें मतपरिवर्तन पाहिलें, म्हणजे, मला वाटतें, त्यांच्या मूलभूत तत्त्वज्ञानांतच कांहींतरी कच्चेपणा असावा. दोघांनाहि निराशेनें ग्रासलेलें आहे. फक्त ती बोलून दाखविण्याची दोघांची पद्धत स्वभावानुसार भिन्न आहे, एवढेंच ! पंडित-जींची आणि तुझी गांठ मी एवढ्याच साठीं घालून देणार होतों कीं, त्यांचे अमेरिकेंतील अनुभव कदाचित् तुला बोधप्रद वाटले असते. शिवाय गांधीवादावर यत्किंचितहि विश्वास नसतांना गांधींच्या चळवळीशीं समरस होऊन काम करणार्‍या मनोवृत्तीचाहि एक नमुना तुला पहावयाला मिळाला असता !

माझ्या सगळ्याच मित्रांची तुला प्रत्यक्ष भेटण्याची फार इच्छा होती. कोणत्याहि चळवळीला एकसूत्रीपणा यावयाचा म्हणजे तिला प्रेरणा आणि चालना देणार्‍या व्यक्तीचे तिच्या निरनिराळ्या घटकांशीं

प्रत्यक्ष संबंध यावयाला नकोत काय? त्याहि दृष्टीनें तूं नागपूरला येण्याचें नाकारण्यांत चूक केलीस, असें नाहीं तुला वाटत?

तुझा
जयसिंग

२

कृष्णा बिल्डिंग, परळ
१८ मार्च १९३०.

प्रिय जया,

सप्रेम नमस्कार. माझ्या नकारामुळें तुमची किती निराशा होईल, याची मला जाणीव होती; व तुम्हां सर्वांशीं प्रत्यक्ष संबंध येण्याच्या दृष्टीनें मी नागपूरला येणें जरूर होतें, हें तुझें म्हणणेंहि मला कबूल आहे. पण, माझ्या न येण्याला कांहीं कारणें असतील, हें निदान तूं तरी लक्षांत घ्यावयाला हवेंस. श्यामाचा या बाबतींतील अंदाज बरोबर आहे. पुढल्या आठवड्यांत मी बहुधा डाक्याला जाऊन येईन; व डाक्याच्या वाटेवर म्हणून नागपूरला उतरणें मला शक्यहि आहे. पण, तें शक्य नसलें, तरी अनेक कारणांमुळें सोईचें मात्र नाहीं.

तुमच्या नागपूरच्या संघाविषयीं मला फारशी माहिती नाहीं; व येथील काँग्रेसवाल्यांचा ग्रह तर त्याच्याविषयीं एकंदरींत प्रतिकूलच दिसला. पण शस्त्राचाराचा पुरस्कार करणारी कोणतीहि व्यक्ति किंवा संस्था, मग त्यांचा राजकीय दृष्टिकोन कसाहि असो, मला एकदम आपलीशी वाटते. हत्यारांच्या कायद्यानंतर हिंदुस्थानाचें क्षात्रतेज नष्ट करणारें जर कोणतें संकट आपल्यावर ओढवलें असल, तर तें सध्यां चाललेला अहिंसा आणि अनत्याचार यांचा उदोउदो हें होय. किंबहुना

हत्यारांच्या कायद्यापेक्षांहि मी अनत्याचाराचें हे प्रस्थ अधिक घातुक समजतों. हत्यारांच्या कायद्यानें फक्त आपल्या हातांतील शस्त्रें काढून घेतली; आपल्या हृदयांत धगधगणारे क्षात्रतेज कांहीं तो कायदा नाहींसें करूं शकला नाहीं. पण सध्यां बोकाळलेलें अनत्याचाराचें तत्त्वज्ञान मात्र आपल्या दुबळ्या समाजांतील उरल्यासुरल्याहि वीरवृत्तीचा अगदीं नायनाट करून टाकणार आहे. परवांच मी सिनेमाला गेला होतों. त्या वेळीं ब्रिटिश वायुदलाचे मॅनूव्हर्स पहात असतां माझ्या मनांत एकसारखा असा विचार येत होता कीं, युरोपांत जें महायुद्ध बहुधा येत्या दहा वर्षांत घडून येईल, त्यांत आपली निःशस्त्र व अहिंसावादी जनता बकऱ्यांमेंढरांसारखी जागच्या जागी गारद होणार! त्या विचारानें माझ्या मनाला इतकें कांहीं सतावून सोडलें कीं, शेवटी त्या विचाराच्या भरांत मी चित्रपट अर्धाच टाकून उठून आलों! पारतंत्र्यामुळें शस्त्राचाराला पारखें झालेलें आणि गांधीवादामुळें अनत्याचाराचें व्रत घेतलेलें आपलें अहिंसावादी राष्ट्र वाळलेल्या गवताप्रमाणें बसल्या जागीं असहायतेनें होरपळून मरणार, या कल्पनेनें ती सारी रात्र मी तळमळत काढली! अर्थात् संघांतील लष्करी तयारीचें दृश्य पाहून माझ्या मनाला हुरूप खात्रीनें वाटला असता.

स्वामीजींच्या मताविषयीं जें तूं लिहिलेंस, तें वाचून मला आश्चर्य वाटलें नाहीं. हा एक अध्यात्मिक स्वरूपाचा राजकीय दैववाद आहे; व ज्या उदात्त पण हताश मनोवृत्तींतून हा दैववाद आविर्भूत होतो, तिचा मला अगदीं लहानपणापासून अनुभव आहे. महाराष्ट्रामध्यें अण्णासाहेबांनीं आणि बंगालमध्यें अरविंदबाबूंनीं हा दैववाद प्रसृत केला. माझे वडील तुरुंगांतून सुटल्यावर अण्णासाहेबांच्या भजनी लागले; व ज्या टिळकांवर त्यांची तारुण्यांत अलोट भक्ति होती, त्यांच्याविषयीं "बळवंतरावांनीं समर्थांप्रमाणें तपश्चर्या केल्याशिवाय राष्ट्राचें नेतृत्व स्वीकारण्याची खरी योग्यता त्यांच्या अंगीं येणार नाहीं" अशी भाषा त्यांच्या तोंडून निघूं लागली. असल्या दैववादाचा पुरस्कार करणाऱ्या

पांगारकर, पुरोहित, जोग प्रभृति टिळकशिष्यांचा एक अड्डाच त्या वेळीं आमच्या घरीं असे. हा दैववाद म्हणजे पराभूत मनोवृत्तीचा एक नमुना आहे, असें मी समजतों.

या पराभूत मनोवृत्तीचें एक हृदयस्पर्शी उदाहरण मी बनारसला कॉलेजांत असतांना पाहिलें. माझा एक बंगाली सहाध्यायी मला एक दिवस म्हणाला, " आज मी तुला पुराणकाळांतील एक अजब क्रांतिकारक दाखवितों. " आणि खरोखरी त्यानें जी व्यक्ति मला त्या दिवशीं दाखविली, ती जन्मभर विसरणार नाहीं मी. गंगेच्या तीरावरील एका झोंपडीत मध्यरात्रीं घेऊन गेला तो मला. झोंपडीत धुनी पेटलेली होता; व तिच्या समोर सिद्धासन घालून एक जटिल, वृद्ध तपस्वी बसलेला होता. माझ्या मित्रानें आमची ओळख करून दिल्यावर तो अगदीं मोकळ्या मनानें बोलला. त्याचें घराणें पेशव्यांचें पिढीजाद नोकर होतें; व हा तपस्वी बाळपणापासून नानासाहेबांच्या सान्निध्यांत वाढलेला होता. सत्तावन सालच्या बंडानंतर तो त्यांच्याबरोबर नेपाळांत गेला; व पेशव्यांच्या कुटुंबाची वाताहत झाल्यावर बनारसला येऊन त्यानें संन्यास घेतला. सत्तावनच्या बंडांत आपण केलेला पराक्रम, पेशव्यांच्या निराश्रित कुटुंबाची इंग्रजांनीं केलेली ससेहोलपट, नानासाहेबांनीं मरतांना आपल्या अनुचरांकडून घेतलेलें सूड उगविण्याचें वचन — वगैरे प्रसंगांचें वर्णन करितांना त्याच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले; व शेवटीं तो उद्गारला, " स्वतःच्या रक्तानें न्हालेल्या दुर्योधनाची सूड घेण्याची इच्छा अश्वत्थाम्यानें पांडवांच्या सैन्याची पोराबाळांसकट कत्तल करून तृप्त केली ! पण मी मात्र माझ्या धन्यासमोर घेतलेली शपथ अद्याप पूर्ण करूं शकलों नाहीं ! आज चाळीस वर्षें झालीं. ही धुनी पेटवून आईच्या आदेशाची वाट पहात बसलों आहें मी ! पण अद्याप कांहीं भवानी मातेचा कौल मिळाला नाहीं ! " तुझ्या स्वामीजींना मी पाहिलेलें नाहीं. पण, तुझें पत्र वाचल्याबरोबर माझ्या डोळ्यांसमोर बनारसला बघितलेल्या त्या वृद्ध तपस्व्याची करुणगंभीर मूर्ति उभी राहिली !

पंडितजींचीं मतें वाचूनहि मला नवल वाटलें नाहीं. मी तुला पूर्वी एकदां लिहिलेंच होतें कीं, गेल्या वर्षी पुण्याच्या टिळक स्मारकमंदिरांत इटलींतील फासिस्टांवर त्यांनीं दिलेलीं तीन व्याख्यानें ऐकून माझा त्यांच्या वक्तृत्वाविषयींचा आदर वाढला, पण व्यक्तिविषयींचा मात्र कमी झाला. त्यांची वृत्ति पावसाळी पतंगांसारखी आहे. पंख फुटलेले ते कीटक जसा प्रकाश दिसतांच त्यानें आकृष्ट होऊन त्याच्यावर झेंप घालतात, तसें पंडितजींचें आहे. ते प्रभावपूजक आहेत. बापट आणि सावरकर यांच्याबरोबर काम केलेल्या माणसाच्या ठिकाणी जें वैशिष्ट्य आणि जो कणखरपणा असावा अशी अपेक्षा आपण साहजिकच करतों, तो त्यांच्या ठिकाणीं अजिबात नाहीं. त्यामुळेंच ते आपली मूळची भूमिका विसरून गांधीवादाशीं समरस होऊं शकले आणि इतरांनींहि व्हावें असा उपदेश करीत आहेत. तुरुंगांतून सुटल्यावर माझे वडील अण्णासाहेबांच्या भजनीं लागले हा जसा मी त्यांचा अधःपात समजतों, तसेंच अमेरिकेहून परत आल्यावर पंडितजींनीं गांधीवादाच्या आहारीं जाऊन काँग्रेसचें प्रचारक बनावें, हाहि मी त्यांचा अधःपातच समजतों. क्रांतिवाद हा अगदीं अव्यवहार्य आहे असें मानलें, तरी त्यामुळें गांधीवाद हा स्वीकार्य कसा ठरतो, हें मला कळत नाहीं. पंडितजींचा सारा युक्तिवाद एखाद्या प्रभावपूजकाला शोभण्यासारखा आहे; स्वतंत्र बुद्धीच्या माणसाला नव्हे. गांधींच्या कार्यक्रमाला एकवार पूर्ण संधि द्या म्हणजे काय करा ? स्वतःची बुद्धि साबरमतीच्या आश्रमांत गहाण टाकून गांधींची नुसती री ओढावयाची काय ? शिवाय, १९२० सालीं गांधींच्या कार्यक्रमाला पूर्ण संधि देण्यांत आली होती, याचा विसर पंडितजींना कसा पडला ? दर दहा वर्षांनीं गांधींच्या त्याच त्या कार्यक्रमाला पुन्हा संधि देणें म्हणजे गांधीवादाच्या भोंवऱ्यांत निर्बुद्धपणानें गिरक्या खात रहाणेंच होय ! हिंदुस्थानांतील तरुण पिढी तरी निदान असला आत्मघात करावयाला तयार होणार नाहीं.

गांधीवादाशीं समरस होण्याचा उपदेश जे पंडितजी आपल्याला

आढ्यतेनें करतात, त्यांनीं स्वतः त्याच्या स्वरूपाचें कधीं तरी पृथक्करण करून पाहिलें आहे काय ? आधुनिक राजनैतिक मूल्यांच्या कसोटीला गांधींचें जीविताविषयींचें तत्त्वज्ञान कितपत उतरतें, याची त्यांनीं चिकित्सा केली आहे काय ? निव्वळ लोकजागृतीच्या बाबतींत गांधीनीं टिळकांच्या पुष्कळ पुढें मजल मारली, यांत शंका नाहीं. किंबहुना, मी तर असेंहि म्हणेन कीं, आपल्या बहुजनसमाजाची विशिष्ट मनोरचना लक्षांत घेतां त्याच्या सध्यांच्या अप्रबुद्ध अवस्थेत टिळकांसारख्या बुद्धि-प्रधान पुढाऱ्यापेक्षां गांधींसारख्या भावनोपासक पुढाऱ्याचें नेतृत्वच त्याला अधिक मानवण्यासारखें होतें. देव आणि दैव यांच्यावर श्रद्धा ठेवून चालणारा, उच्च धर्मतत्त्वांचा उच्चार करीत करीत त्यांना सर्वथैव विसंगत असें आचरण करणारा आणि आपल्या पराभूत मनोवृत्तीला सात्त्विकतेचें सोज्वळ स्वरूप देणारा असा जो आपला वेदांती, दुर्बळ आणि दांभिक समाज त्याचें गांधी हे प्रतीक आणि प्रतिनिधि आहेत. स्वतःवर होणाऱ्या आक्रमणाचा सक्रिय प्रतिकार करणें ही मनुष्याची सहज प्रवृत्ति आहे. पण, हजारों वर्षें गुलामगिरींत काढल्यामुळें आपल्या समाजांतून ही प्रतिकाराची प्रवृत्ति नष्टप्राय झाली असून, त्या प्रवृत्तीच्या या विनाशाला निर्वैरत्व आणि अहिंसा हीं सोज्वळ नांवें देऊन त्या भीरु-तेचें उदात्तीकरण करण्यांत आलें आहे. गांधींचा अनत्याचार हें सुद्धां आपल्या समाजांतील या नष्ट झालेल्या प्रतिकारसामर्थ्याचें उदात्तीकरण होय. अहिंसेच्या आणि अनत्याचाराच्या तत्त्वज्ञानांत प्रतिकाराला मुळीं कुठें जागाच नाही. तें तत्त्वज्ञान मुकाट्यानें क्लेश सोसावयाला, जेत्यांच्या आक्रमणापुढें निमूटपणें नमतें घ्यावयाला शिकवितें. मी या तत्त्वज्ञानाला पराभूत मनोवृत्तीचें तत्त्वज्ञान म्हणतों. गेली हजारों वर्षें आमचा समाज या तत्त्वज्ञानाच्या आहारीं जाऊन, जे जे बलाढ्य जेते देशांत आले, त्यांना फारसा निकराचा प्रतिकार न करतां, त्यांच्यापुढें नमतें घेत आणि अशा रीतीनें जगत आला आहे. त्या जगण्यांत ओज नाहीं आणि ईर्ष्याहि नाहीं. या पराभूत मनोवृत्तीला गांधींनीं अनत्याचार हें नांव दिलें

असून, त्याच्या पायावर हिंदी राजकारणाची पुनर्घटना करण्याचा उद्योग त्यांनीं चालविला आहे.

अनत्याचारावर अधिष्ठित झालेलें गांधींचें जीविताविषयींचें एकंदर तत्त्वज्ञानहि अर्थातच अत्यंत प्रतिगामी आहे. गांधीवाद हा क्रांतिकारक आहे असें वारंवार कंठरवानें सांगितलें जातें; व युद्ध, युद्धमंडळ वगैरे शब्दांचा सध्यां जसा कांहीं सुळसुळाट झाला आहे. पण, गांधीवादाला जे क्रांतिकारक म्हणतात, त्यांना, एक तर 'क्रांति' या शब्दाचा अर्थ तरी समजत नसला पाहिजे किंवा लोकांची दिशाभूल करण्यासाठीं तरी ते गांधीवादावर हा अवस्त्वारोप करित असले पाहिजेत. गांधी हे समन्वयवादी आहेत, विग्रहवादी नाहींत. ही गोष्ट लक्षांत न घेतल्यामुळेंच हा अवस्त्वारोप केला जात आहे. 'क्रांति' या शब्दाचा अर्थच मुळीं असा आहे कीं, कालदृष्ट्या निरुपयोगी किंवा हानिकारक ठरलेली जुनी स्थिति नष्ट करून तिच्या जागीं कालोचित अशी नवी हितकारक स्थिति निर्माण करणें. क्रांतीचें कार्य विध्वंसक आणि विधायक असें दुहेरी असतें. गांधीवाद हें कार्य आज करीत आहे काय ? जीवनाचें कोणतेंहि क्षेत्र घ्या. त्यांत गांधीवादाची भूमिका क्रांतिकारक म्हणजे जुन्याचा विध्वंस करून नवीनाला जन्म देणारी अशी असल्याचें दिसणार नाहीं; तर उलट जगांत उद्भून झालेल्या नवीन शक्तींशीं झुंज देण्याची हिंमत नसल्यामुळें त्यांची जुन्याशीं कशीबशी सांगड घालण्याचा प्रयत्न करणारी म्हणजे पर्यायानें प्रतिक्रांतिकारक आहे. वसाहतीच्या स्वराज्यावर संतोष मानण्याची गांधींची तयारी, चातुर्वर्ण्याला त्यांनीं दिलेली मान्यता, जमीनदारीच्या उच्छेदाला असलेला त्यांचा विरोध किंवा कामगारांत वर्गयुद्धाची भावना उत्पन्न होऊं न देण्याची त्यांची दक्षता, हें त्यांचें एकंदर धोरण काय त्यांचें तत्त्वज्ञान क्रांतिकारक असल्याचें द्योतक आहे ? उलट, गांधीवाद हा भौतिक प्रगतीला प्रतिकूल असून, आजचें प्रगत आणि सुसंस्कृत मानवी जीवन हें जास्तींत जास्त निसर्गानुगामी कसें होईल, याचा प्रयोग गांधींनीं व्यक्तिशः आणि राष्ट्रशः आरंभिला आहे. चरखा

आणि तकली हीं त्यांच्या तत्त्वज्ञानाचीं प्रतीकें असून, खादी हा त्यांच्या निसर्गानुगामी संप्रदायाचा गणवेश आहे. गांधींचा आग्रह केवळ जुनें कायम ठेवण्याचा नाहीं; तर जमल्यास त्याहिपेक्षां जुनाट स्थितीचा जीर्णोद्धार करण्याचा आहे. म्हणून मी म्हणतों कीं, गांधीवाद हा क्रांतिकारक नाहीं, तर प्रतिक्रांतिकारकच आहे; इतकेंच नव्हे तर दांभिकहि आहे.

पण या दांभिकतेबद्दल मी गांधींना दोष द्यावयाला मात्र तयार नाहीं. अनत्याचार हें ज्या वेळीं त्यांनीं जीवनाचें धारक तत्त्व ( *Basic Principle* ) आहे असें मनलें, त्याच क्षणीं त्यांच्या वर्तनांत दांभिकता आपोआप उत्पन्न झाली. जीवनाचें धारक तत्त्व फक्त एकच होऊं शकतें; व तें म्हणजे अभ्युदयाची दुर्दम आकांक्षा. अनत्याचाराच्या तत्त्वावर जीवनाची प्रतिष्ठा करण्यासाठीं धडपडणें म्हणजे द्वंद्वमय व म्हणून स्वभावतःच कलहात्मक अशा जीवनाच्या कठोर वास्तव स्वरूपाकडे दुर्लक्ष करणेंच होय. निर्द्वंद्व स्थिति हें अध्यात्मवाद्यांचें केवळ एक मनोराज्य आहे; व त्यांत रमण्यामध्यें जरी कदाचित् बौद्धिक आनंदाची नशा असली, तरी तें व्यवहारांत कधीं उतरेल अशी आशा करणें वेडेपणाचें होईल. गांधींची मोठी चूक ही कीं, त्यांनीं अनत्याचाराचें ध्येय स्वतःपुरतें मर्यादित न करतां तें सर्व राष्ट्रावर लादण्याचा अट्टाहास चालविला आहे. व त्यामुळें व्यक्तिशः त्यांच्यापासून तो संघशः काँग्रेसपर्यंत आज सर्वत्र ढोंगीपणा बोकाळलेला दिसत आहे. हिंसा आणि स्तेय नको म्हणून गाईचें दूध प्यावयाचें नाहीं आणि बकरीचें मात्र प्यावयाचें, हा दांभिकपणा नव्हे तर काय ? जमीनदारी आणि भांडवलशाही यांची उभारणीच मुळीं पिळणुकीच्या तत्त्वावर झाली आहे; व श्रमजीविकांच्या कष्टांचा अन्याय्य फायदा घेतल्याविना जमीनदारी किंवा भांडवलशाही एक क्षणभरहि टिकणें शक्य नाहीं. अशा या अत्याचारी वर्गांशीं किसान आणि कामगार यांनीं झगडा न करितां तडजोड करावी असें जो म्हणतो, तो अन्यायी आणि अत्याचारी समाजपद्धति कायम

ठेवावयाला उघड उघड मदत करीत नाहीं काय ? आणि गांधींनी तर या दोन्ही वर्गांना वारंवार अभयवचन दिलें आहे. अमदाबादच्या गिरणी कामगारांपुरती भांडवलवाल्यांशीं झगडा न करण्याची आपली कल्पना त्यांनीं अंमलांतहि आणली आहे. पुढें कधीं काळीं जर हिंदुस्थानांत गांधीराज्य खरोखरीच स्थापन झालें, तर औद्योगिक कलह उत्पन्न करणं हा गुन्हा ठरून कामगारांचा संपाचा प्राथमिक हक्क हिरावून घेतला गेला, तर नवल वाटावयाला नको ! अत्याचारी समाजपद्धति जिवंत ठेवावयाला जो अनत्याचार वचनबद्ध झालेला असतो, तो अनत्याचार नव्हे; तर अत्यंत आत्मवंचक असा दांभिकपणा होय.

गांधींनीं सुरू केलेल्या ज्या या कायदेभंगाच्या चळवळीला 'स्वातंत्र्य-युद्ध' असें भडक नांव देऊन तींत सामील होण्याचा आग्रह पंडितजीं-सारखे जुने क्रांतिवादी आपल्याला अट्टाहासानें करीत आहेत, त्या चळव-ळीला तें नांव कितपत शोभतें याचा विचार त्यांनीं केला आहे काय ? गांधींनीं ही चळवळ कांहीं स्वयंस्फूर्तीनें सुरू केलेली नाहीं; तर त्यांच्या इच्छेविरुद्ध त्यांना ती सुरू करणें भाग पडलें आहे. ब्रिटिश सत्तेविरुद्ध देशांत धुमसत असलेला तीव्र प्रक्षोभ लाहोरच्या राष्ट्रीय सभेंत स्वातं-त्र्याच्या घोषणेच्या रूपानें प्रकट झाला; व बाँबच्या ठरावावर जी चर्चा विषयनियामक मंडळांत झाली, तिच्यावरून गांधींना हें स्पष्ट कळून चुकलें कीं, देशांतील एकंदर सुशिक्षित वर्ग तर राहोच, पण खुद्द कॉंग्रे-सच्या अनुयायिवर्गांतहि अनत्याचारावर यत्किंचितहि श्रद्धा नसणारांचीच प्रबल अल्पसंख्या आहे. लाहोरच्या राष्ट्रीय सभेमध्यें देशांतील या वाढत्या अत्याचारी प्रवृत्तीच्या—जिला गांधी वारंवार 'दुष्ट शक्ति' ( *The Forces of Evil* ) या नांवानें संबोधित असतात—साम-र्थ्याची चुणूक त्यांच्या अनुभवाला आली; व परकीय सत्तेचा उच्छेद करण्यासाठींच केवळ नव्हे; तर या 'दुष्ट शक्तीं'चा नायनाट करण्या-साठीं त्या अहिंसेच्या प्रणेत्यानें ही कायदेभंगाची चळवळ सुरू केली आहे. व्हाईसरॉयाला पाठविलेल्या निर्वाणीच्या खलित्यांत त्यांनीं असें स्पष्टच

म्हटलें आहे कीं, "ही चळवळ सुरू करण्यांत माझा उद्देश ब्रिटिश सरकारच्या संघटित अत्याचारी शक्तीप्रमाणेंच देशांतील वर्धिष्णु असंघटित अत्याचारी शक्तींचा प्रतिकार करण्याचा आहे." ( *It is my purpose to set in motion that force as well against the organised violent force of the British rule as the unorganised violent force of the growing party of violence.* ) दहा वर्षांपूर्वी असहकारितेची चळवळ सुरू करितांना गांधींचा उद्देश निर्भेळ स्वराज्यसंपादनाचा होता. पण, आजची ही चळवळ सुरू करण्यांत मात्र त्यांचा मुख्य हेतु स्वातंत्र्यप्राप्ति हा नसून देशांत बळावत असलेल्या क्रांतिकारक पक्षाच्या चळवळीला शह देण्याचा—तिचा नायनाट करण्याचा आहे. आज चालू असलेली त्यांची सारी तळमळ आणि धडपड ही स्वातंत्र्यासाठीं नाहीं; तर स्वातंत्र्याच्या आकांक्षेनें उद्दीपित होऊन जो तरुण पक्ष निःशस्त्र वा सशस्त्र, जमेल तशी क्रांति घडवून आणावयाला उत्सुक झाला आहे, त्याला हाणून पाडण्यासाठीं आहे. अशा उद्देशानें सुरू केलेल्या या चळवळीला 'स्वातंत्र्ययुद्ध' हें नांव कोणत्या तोंडानें द्यावें ? आणि तीत सामील तरी कशासाठीं व्हावयाचें ? मी तरी या चळवळीला स्वातंत्र्ययुद्ध म्हणत नाहीं; तर स्वातंत्र्योपासकांच्या विरुद्ध पुकारलेलें युद्ध म्हणतों. कारण, गांधींना स्वातंत्र्यापेक्षां अहिंसा अधिक प्रिय असून, अहिंसेसाठीं ते स्वातंत्र्यावर पाणी सोडावयाला बेशक तयार होतील.

सत्याचा उदो उदो करीत आरंभिलेल्या या चळवळींत क्रांति, युद्ध किंवा स्वातंत्र्य या शब्दांचा दुरुपयोग करून जनतेची जितकी पद्धतशीर फसवणूक आज केली जात आहे, तितकी ती पूर्वीं कधींहि करण्यांत आलेली नव्हती. कायदेभंगाच्या चळवळीला युद्धच काय पण क्रांति म्हणून संबोधणेंहि अतिशयोक्तीचें ठरेल. शिवाय, नुसता कायदेभंग हा शब्द उच्चारल्याबरोबर जो काय बंडखोरीचा थोडासा ध्वनि त्यांतून उमटतो, तोहि 'सविनय' (civil) या विशेषणाची पुस्ती त्याला

जोडून गांधींनीं गारद् करून टाकला आहे. जी दशा कायदेभंगाची, तीच स्वातंत्र्याचीहि. तरुण पिढीच्या समाधानासाठीं जरी स्वातंत्र्य या शब्दाचा जप गांधी सारखा करीत असले, तरी त्यांच्या मनांत मात्र वसाहतीच्या स्वराज्याशिवाय दुसरें कांहींहि नाहीं. वसाहतीच्या स्वराज्याची कल्पना हें भांडवलशाही मुत्सद्देगिरीचें गोंडस अपत्य आहे. आपल्या ताब्यांतील दुबळ्या राष्ट्रांना नुसतीं कच्च्या मालाचीं कोठारें बनवून टाकल्यानें बाजारपेठ या दृष्टीनें त्यांचा फारसा उपयोग होऊं शकत नाही, असें जेव्हां ब्रिटिश भांडवलशाहीच्या प्रत्ययाला आलें, तेव्हां तिनें वसाहतीच्या स्वराज्याची कल्पना काढली. वसाहतींतील भांडवलदार आणि मध्यम वर्गांना आर्थिक आणि राजकीय बाबतीत दुय्यम दर्जाची भागीदारी द्यावयाची आणि त्यांच्या साह्यानें तेथील बहुजनसमाजाला पिळून काढण्याचा आपला क्रम अव्याहत चालावावयाचा, हें या कल्पनेचें मर्म आहे. हिंदुस्थानाला वसाहतीचें स्वराज्य देण्याचें अभिवचन ब्रिटिश सरकारच्या तोंडून बाहेर पडल्याबरोबर जो राष्ट्रीय पक्ष आज स्वातंत्र्याच्या, क्रांतीच्या आणि ब्रिटिश साम्राज्यांतून बाहेर पडण्याच्या वल्गना करीत आहे, त्याची ती बडबडताबडतोब थांबेल; व ब्रिटिश भांडवलशाहीची भागीदारी मिळण्याच्या आशेमुळें तो उलट क्रांतिविरोधी होईल. हिंदुस्थानाला वसाहतीचें स्वराज्य मिळणें म्हणजे आज राष्ट्रीय चळवळीच्या आघाडीला असलेल्या भांडवलदार आणि मध्यमवर्गांना ब्रिटिश भांडवलशाहीची भागीदारी प्राप्त होऊन ते वर्ग क्रान्तिविरोधी *( de-revolutionization of the Nationalist Bourgeoisie )* होणें होय. गांधींच्या चळवळीमुळें जर कोणती क्रांति घडून येणार असेल, तर ती ही! जया, गांधी जी ही क्रांति घडवून आणण्यासाठीं धडपड करीत आहेत, तिचें हें प्रतिगामी स्वरूप लक्षांत घेतल्याबरोबर, त्यांच्या मनानें क्रांतिकारकांच्या अत्याचारी चळवळीची एवढी दहशत कां घेतली आहे, हें तुला कळून येईल. क्रांतिकारकांचा मार्ग धोक्याचा तर आहेच, पण कदाचित् अव्यवहार्यहि असेल. तथापि, तो मार्ग बहुजनसमाजाला

स्वातंत्र्य आणि लोकशाही यांच्याकडे घेऊन जाईल, हें मात्र निःसंशय. त्यांचा मार्ग धोक्याचा असला, तरी त्यांत फसवणूक नाहीं. गांधी स्वतः-ला दरिद्रनारायण खुशाल म्हणवून घेवोत; पण त्यांच्या चळवळीमुळें कल्याण मात्र नवकोट नारायणांचेंच होणार आहे. असल्या या वंचक आणि प्रतिगामी चळवळींत आपण भाग घ्यावा, असें तुला खरोखरीच वाटतें का?

जया, गांधींचे गुण मला दिसत नाहींत, असें नाहीं. त्यांची कळकळ, त्यांचा चिवटपणा, त्यांचें संघटनचातुर्य, त्यांचा विशाल दृष्टिकोन, स्वतःच्या मतानुसार राष्ट्राची सर्वांगांनीं पुनर्घटना करण्याचे त्यांचे प्रयत्न, या त्यांच्या गुणांपुढें मी दहादां मस्तक नमवीन. पण त्यांच्या मागाहून जाणें मात्र मला कालत्रयींहि शक्य नाहीं. उलट, त्यांनीं पुकारलेल्या बेगडी स्वातंत्र्ययुद्धाच्या दांभिक स्वरूपाचा परिस्फोट करून त्यांचें तत्त्वज्ञान आणि नेतृत्व हें कसें प्रतिगामी आहे, ही गोष्ट लोकांच्या निदर्शनास आणून देणें हें मी माझें कर्तव्य समजतों. पंडितजींसारख्या बुद्धिमान् पुरुषानें या युद्धांत भाग घेण्याचा उपदेश आपल्याला करावा, याबद्दल मला खरोखरीच त्यांची दया येते. आपल्या देशांतील सुबुद्ध व्यक्तींची तत्त्वनिष्ठासुद्धां किती लवचीक असते आणि एखाद्या नवीन चळवळीच्या धारक तत्त्वांची आपल्या स्वतःच्या मतांच्या दृष्टीनें कसून छाननी न करितां तिच्या भपक्यानें ते कसे भुलून किंवा भांबावून जातात, याचा पंडितजींचा उपदेश हा एक उत्तम मासला आहे. पण, आपण मात्र देशांतील वाढत्या लढाऊ चळवळींचे पाय ओढण्या-च्या गांधींच्या या कारस्थानांत सामील न होतां शक्य त्या उपायांनीं ते हाणून पाडण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

पुढच्या महिन्याच्या १८ तारखेकडे लक्ष ठेव.

तुझा
जयंत

# १४

# अपुरें राहिलेलें प्रणयवचन

" त्याच्या पत्रांतल्या त्या शेवटल्या वाक्याचा उमज पडला नाहीं मला, चारू !—"

" कांहीं तरी विलक्षण घडणार असलं पाहिजे त्या दिवशीं ! एरवीं त्यानं लिहिलं नसतं तें वाक्य ! "

" मला आश्चर्य वाटतं तें या गोष्टीचं कीं, त्यानं जर एवढी तारीख दिली आहे, तर त्याला थोडंसं सूचक लिहायला काय हरकत होती ? इतका सुद्धां कां विश्वास असूं नये त्याला आपला ?—"

" मी त्याला दोष नाहीं देणार त्याबद्दल, जया ! तूं पाहिलंस ना ?—तें पत्र वाचल्यावर दिद्दी किती तरी वेळ स्तब्ध न् गंभीर होती अगदीं; तिला कांहीं तरी कल्पना असली पाहिजे काय घडणार आहे याची ! कारण त्या दिवसापासून तिच्या वृत्तींतला उल्हास मावळून गेलाय अगदीं न् तिच्या बोलण्यांत विसंगतपणा आलाय एक प्रकारचा—"

" खरं आहे तुझं म्हणणं ! मी जेव्हां तिला विचारलं, जयंत सूर्य-सेनाला भेटण्यासाठीं डाक्याला जातो आहे का, म्हणून, तेव्हां ती हो म्हणाली प्रथम ! पण मागाहून तिनं निराळंच कांहीं तरी सांगायला सुरवात केली—"

" त्याचा अर्थ एवढाच कीं, तिला कांहीं तरी नक्की माहित आहे, पण ती कांहींहि बोलायला तयार नाहीं त्या बाबतींत—"

" पण असं कां ? तुझा सुद्धां विश्वास असू नये का, चारू, तिला ?—"

" जया, हा विश्वासाचा प्रश्न नाहीं. पुष्कळदां असं होतं कीं, कोणतीहि योजना तडीस जाण्यापूर्वीं जर तिची वाच्यता प्रमाणाबाहेर झाली, तर विघ्नें उपस्थित होतात नाहीं तिथून ! शिवाय, गुप्त संस्थांचा असा एक अलिखित नियमच आहे कीं, जें सांगण्याची गरज नाहीं तें सांगायचं नाहीं निष्कारण दुसऱ्याला—"

" पण मला चैन नाहीं तें पत्र वाचल्यापासून, चारू ! सारखं वाटतंय कीं आपणहि त्याच्याबरोबर डाक्याला जावं—"

" पण त्याच्या डाक्याला जाण्याचा तूं कां संबंध जोडतोस त्या तारखेशीं ?—"

" नाहीं. माझ्या मनानं अगदीं पक्कं घेतलंय कीं, त्याच्या डाक्याला जाण्याचा न् त्या तारखेचा संबंध असला पाहिजे कांहीं तरी ! तो कांहीं सूर्य-सेनाला भेटायला उगाच जात नाहीं—"

" कोणाला ठाऊक ! पण, जया, आपणहि मागें रहातां कामा नये आतां—"

" नाहीं. कदाचित् आपण आघाडीच मारूं ! रेल्वेचा खजिना लुट-ण्याचा आपला बेत जर तडीस गेला, तर मला वाटतं, आपलं पाऊल पुष्कळच पुढं पडलं, असं म्हणतां येईल !—तुला नाहीं वाटत आज दुपारचं आपलं वेषांतर बेमालूम साधलं होतं असं ! विजू कांहीं ओळखूं शकली नाहीं आपल्याला पहिल्या सपाट्याला !—"

" पण का रे ! उमाला तूं कां वगळतोस अलिकडे आपल्या बेतांतून ?—"

" कारण कांहींच नाहीं !" जयानें खांकरल्यासारखें करून म्हटलें. " त्याच्या मनाची तयारी झालेली नाहीं, असं वाटतं मला ! आजचंच पहा तूं ! आपण चौघे हरियलची शिकार करण्याच्या निमित्तानं दूर दूर भटकत गेलों; पण तो आपला मोटेवर बसून विजूशीं गप्पा मारीत होता—"

" न् मागाहून तर तीं दोघं संध्याच्या बगीचांत कुठं अदृश्य झालीं, तीं त्यांना बोलवायला मनुष्य पाठवल्यावरच परत आलीं ! उमाची मनोवृत्ति अगदीं

भिन्न आहे, जया, आपल्यापेक्षां न् त्या दृष्टीनं तुझं त्याला वगळण्याचं धोरण योग्य वाटतं मला अगदीं—"

" मनोवृत्ति फारशी भिन्न म्हणायला कांहीं मी तयार नाहीं. आपल्यापैकीं प्रत्येक जण थोडा फार प्रेमांत पडलेला आहे. पण, विजूला न् त्याला जी मोकळीक न् सवलत सुदैवानं लाभली आहे, ती आपल्याला मिळाली नसल्यामुळंच आपल्या त्या बाबतींतील भावना दबल्या गेल्या आहेत इतकेंच!—"

" असं नाहीं मला वाटत, जया! प्रणयाची प्रवृत्ति ही तारुण्यांत अत्यंत प्रबळ असते, हें खरें. पण साहसाची ईर्ष्याहि तितकीच प्रबळ नसते का या वयांत? तुझंच उदाहरण घे! पारव्याप्रमाणें आपल्या आवडत्या पोरीभोंवतीं पिंगा घालीत इष्काचं नशेबाज आयुष्य कंठण्यापेक्षां ससाण्याप्रमाणं आकाशांत संचार न् शिकार करीत ईर्ष्येचं उत्संखल आयुष्य घालविणं तुला खचित अधिक आवडेल. प्रणय आणि पराक्रम या दोहोंतहि नशा आणण्याचा गुण आहे; पण प्रणयाची नशा ही माणसाला शेवटीं दुर्बल बनविते; तर पराक्रमाच्या नशेनं मनुष्य जास्त जास्तच ईर्ष्येला चढतो. उमा जात्याच प्रणयलोलुप आहे, जया!— "

" कुणाला ठाऊक! मी सुद्धां कदाचित् तसाच असेन! त्याच्या हृदयाच्या हांकेला तत्परतेनें साद देणारी विजू मिळाली म्हणून त्याची प्रणयलोलुपता आपल्या नजरेस आली! आपल्या हृदयाच्या हांकेला ओ देणारी कोणी भेटली नाहीं, म्हणून आपला उत्साह कदाचित् या मार्गाकडे वळला असेल! यौवनांतील उसळत्या रक्ताचा आणि उमलत्या शक्तींचा उन्माद हा कोणत्या रूपानं प्रकट व्हायचा हें माणसाच्या अभिरुचीइतकंच त्याला मिळणाऱ्या संधीवरहि अवलंबून असतें, चारू! मी असं ठरवून टाकलंय पण आतां कीं, उमाला कांहीं आपल्याबरोबर ओढायचा नाहीं होतां होईल तों या भानगडींत—"

" याचा विचार तू आधींच कां नाहीं केलास, जया? तुला एक गोष्ट माहित नाहीं.—या पंथांत अर्धवट ओढलीं गेलेलीं माणसं हीं आपलाहि घात करतात न् दुसऱ्याचाहि घात करतात पुष्कळदां!—"

त्याचे ते शब्द कानांवर पडतांच जयाच्या हातांतली सिगारेट गळून पडली.

पण चारूच्या तें लक्षांत आलें नाहीं. सप्तमीच्या चांदण्याची छायाबहुल शोभा न्याहाळण्यांत त्याचे डोळे गुंतले होते. आंब्याचे डेरेदार गर्द वृक्ष, चिंचेच्या चिमुकल्या पानांचा विरळ विस्तार, अगस्त्याच्या पानें गळून गेलेल्या पांढुरक्या फांद्या आणि संत्र्याचीं पर्णभारानें लवलेलीं ठेंगणी झाडें यांची त्या कलत्या चांदण्यांत दिसणारी शोभा जितकी वैचित्र्यपूर्ण तितकीच मनांत गूढता उत्पन्न करणारी होती. झोंपड्यांतून बाहेर पडलेल्या धुराला धुक्याची जोड मिळून मध्येंच एखादा बगीचा त्यांनीं अर्धवट झांकून टाकल्यासारखा दिसत होता. जणुं कांहीं राखी रंगाचें विरविरीत अस्तरच त्या डुबऱ्या झाडांवर घाल- ण्यांत आलें होतें. पलिकडच्या बाजूचें कांपणीला आलेलें गव्हाचें शेत पांढरें पांढरें दिसत होतें; व त्यांत उभे केलेलें बुजगबाहुलें पाहून त्या पांढुरक्या शेतांत आणि पांडुर चंद्रप्रकाशांत डोक्याला टापशी बांधून एखादा म्हातारा उभा राहिला असावा, असा भास होत होता. झाडांच्या लांबट सांवल्या, आंबा आणि संत्री यांचा काळसर गहिरा रंग, चिंच, अगस्ति आणि शेवगा यांचीं अधिकाधिक विरळ होत गेलेलीं पानें व गव्हाचें लांबच लांब पसरलेलें पांढरें भुरकें शेत—सारी सृष्टि वृद्ध आणि विषण्ण दिसत होती त्या छायासंमिश्र प्रका- शांत ! मोटेच्या पाण्याचा दुरून येणारा आवाज, पिंगळ्याचें मधून मधून कानांवर पडणारें क्रंदन, चिंचेवर बसलेल्या दिवाभीताचा अंतराअंतरानें होणारा घूत्कार आणि मध्येंच डोक्यावरून जाणाऱ्या वाघळाच्या पंखांची फडफड— मनाला उदास करणारे असले नाना प्रकारचे विचित्र आवाज त्या निःशब्द शांततेंतून एक सारखे उठत होते ! जयाच्या हातांतून पडलेली सिगारेट मातीच्या ढकळावर जळत होती. तिच्याकडे लक्ष जातांच त्याचा हात एकदम घट्ट धरून चारूनें विचारलें, " कां रे, बोलत कां नाहींस, जया ? "

" मी बोलत नाहीं का ? तूंच बोलतां बोलतां मध्येंच गप्प झालास एकदम ! कसलं एवढं ध्यान लागलं होतं तुझं, चारू ?—"

" ध्यान ?——मी तुझ्या महाराष्ट्राचं रूप न्याहाळून पहात होतों. तुमच्याकडलीं हीं शेतं, हे डोंगर न् या नद्या पाहिल्या, म्हणजे माझ्या मनांत पुष्कळदां असं येतं कीं, तुम्हीं महाराष्ट्रीय इतके रुक्ष आणि गंभीर असावेत हें साहजिक आहे अगदीं ! पाण्याच्या लाटांवर नाचणाऱ्या चांदण्याचं निर्भय हास्य किंवा विपुल जलसिंचनानं बहरलेल्या वेलींचं विलोल नृत्य ज्यांच्या डोळ्यांना सदैव पहायला मिळतं त्या आम्हां बंगाल्यांचा स्वभाव तरल आणि भावनोत्कट असावा हें जितकें नैसर्गिक, तितकाच उन्हानें होरपळून गेलले उघडेवाघडे डोंगर आणि पाण्यासाठीं हपापलेली रखरखीत काळी जमीन यांच्या सान्निध्यांत वाढलेल्या तुम्हां महाराष्ट्रीयांचा स्वभाव विचारी आणि भावनाविमुख असावा यांत नवल नाहीं ! मी प्रथम मुंबईला गेलों, तेव्हांचा प्रसंग नेहमीं आठवतो मला ! नागपूरला आल्यापासून समुद्र दृष्टीस पडला नव्हता माझ्या. म्हणून जयंताला मी म्हटलं, मुंबईस गेल्याबरोबर पहिल्यांदा सागरदर्शन घडवलं पाहिजेस तूं मला ! म्हणून त्या दिवशीं संध्याकाळीं तो मला जुहूला घेऊन गेला. तिथलें तें मर्मर ध्वनि करणारं रमणीय तालवन आणि त्या ध्वनीनं गुंगूनच जणुं कांहीं पुढं पुढं येत असलेल्या समुद्राच्या लाटा पाहून मला अगदीं वेड्यासारखं झालं ! मी धांवत धांवत त्या लाटांकडे जाऊन त्यांचं फेसाळ पाणी डोक्यावर घेतलं ! मला रडूं कोसळलं आणि त्या वाळूंत एखाद्या शिंगरासारखा हुंदडलों मी ! जयंता मिस्किलपणानं हंसत होता माझा तो सारा पोरकटपणा पाहून ! मी त्याला सांगितलं मागाहून, मनुष्य मायदेशावर म्हणून जें प्रेम करतो, तें कांहीं एखाद्या अमूर्त कल्पनेवर नव्हे ! बंकिमबाबूंचं 'वंदेमातरम्' तुम्हां महाराष्ट्रीयांच्या कानाला जरी लिबलिबीत न् नेभळं वाटलं, तरी त्यांतले नादमधुर शब्द आम्हां बंगाल्यांच्या अंतःकरणांत आपल्या मातृभूमीची करुणकोमल मूर्ति उभी करतात ! तिच्या तरुलतांचें मृदु आंदोलन आणि नदीनिर्झरांचें मंजुळ गायन यांचे पडसाद ते आमच्या मनांत उठवितात ! पण माझें हें बोलणें ऐकून जयंता हंसला आणि थट्टेनें म्हणाला, " समाजवादी क्रांतिकारकाला स्वतःचा देश ही चीज माहित असतां कामा नये, चारू ! " जयंतासारख्या क्रांतिवाद्याच्या तोंडची ही भाषा ! नवल नाहीं, बंगालमध्यें क्रांतिकारकांची परंपरा

गेलीं तीस वर्षे अप्रतिहत चालू असतां महाराष्ट्रामध्ये तिला मधून मधून खंड पडलेला दिसावा ! बंगाल्यांतील पहिल्या कादंबरीकारानें तरुण पिढीला क्रांतीचा संदेश दिला, तर महाराष्ट्रांतील पहिल्या कादंबरीकारानें समाजसुधारणेचे धडे शिकविले. बंगाल्यांतील पहिल्या जहाल पुढाऱ्यानें कधीं कायद्याचा मुलाजा केला नाहीं; तर महाराष्ट्राचा पहिला जहाल पुढारी आमरण कायद्याच्या मर्यादेंत राहून झगडला. जया, तुम्हां महाराष्ट्रीयांच्या या बुद्धिवादाच्या प्रखरतेमुळें साऱ्या भावना आहाळून जळून जातात ! पण मनुष्य नुसता बुद्धीनं चालत नाहीं. सामान्य माणसाला केवळ बुद्धिगम्य अशा अमूर्त कल्पनेबद्दल आकर्षण वाटणं अशक्य आहे. त्याच्या मनाला आणि बुद्धीला आकृष्ट आणि उद्दीपित करण्या साठीं कांहीं तरीं प्रतीक, कसल तरी दृश्य चिन्ह लागत असतं ! सोव्हियटांनीं सुद्धां आपल्या रक्तध्वजावर विळा आणि कोयता रेखाटला आहे ! 'वंदेमातरम्'ला जे लोक नाकं मुरडतात, त्याना सृष्टि ज्या अनेक भावांनीं आणि भाषांनीं मानवी मनाशीं बोलते, त्यांच्या सामर्थ्याची जाणीव नाहीं !—"

"पण, चारू, ही एक बाजू झाली ! महाराष्ट्राचे आजचे पुढारी आणि लेखक हे बुद्धिजीवी वर्गांतून वर आलेले आहेत. शहरी संस्कृतींत मुरलेल्या त्यांच्या पढीक मनाला निसर्गाचं आकर्षण नसावं, यांत नवल नाहीं. त्यामुळंच आमच्या कवींच्या आणि लेखकांच्या निसर्गवर्णनांत जिवंतपणा आणि जाति-वंतपणा इतका कमी आढळतो. वातचक्राच वर्णन करण्यासाठीं आमच्या केशव-सुताला शेलेपासून स्फूर्ति घ्यावी लागते ! शहरी संस्कृतीनं मानवी जीवनाचा असा कांहीं अजब सांचा निर्माण केला आहे कीं, त्या सांचांतून घडलेल्या माणसांची स्वाभाविकता आणि सहृदयता या दोन्ही नष्ट होऊन जातात; व पढीक वातावरणांत वाढल्यामुळं त्यांची संवेदनक्षमता इतकी कांहीं बधिर होऊन जाते कीं, सृष्टीच्या विशाल हृदयाची धडधड त्यांच्या हृदयाला जाणवत नाहीं; तिची चराचरांत घुमणारी शब्दातीत वाणी त्यांच्या कानांना ऐकूं येत नाहीं. व्हिटमननें म्हटलें आहे कीं, त्या थोर मूक भूमातेचें वक्तृत्व तिच्या लेकरांना कळल्याशिवाय रहात नाहीं *(to her children the words of the eloquent dumb great Mother never fail)* पण ही

त्या निसर्गोपासकाची प्रौढी आमच्या पढीक पांढरपेशांनीं खोटी पाडली आहे ! मायदेशाचा शेवटचा निरोप घेतांना जॉं ख्रिस्तोफनं हिरवळीचं पुन:पुन्हा चुंबन घेतल्याचं वर्णन जेव्हां मी वाचलें, तेव्हां त्याच्याप्रमाणें माझ्याहि डोळ्यांत अश्रु उभे राहिले ! आमच्या मराठी वाङ्मयांत नाहीं म्हणायला शिवरामपंतांच्या कादंबऱ्यांमध्यें मात्र अशा तऱ्हेचा जिव्हाळा दृष्टीस पडतो. जमीन आणि पाणी यांच्यावर ज्यांचं जीवित अवलंबून आहे अशा श्रमजीवी वर्गांतून जेव्हां माणसं पुढं येतील, तेव्हां आमचं राजकारण आणि वाङ्मय ही दोन्ही अधिक जिवंत आणि प्रभावी होतील. जयंताच्या मनावरून तूं एकंदर महाराष्ट्राच्या मनोरचनेची कल्पना करूं नकोस, चारू ! जयंताचं मन म्हणजे पोलाद आहे नुसतं !— पण काय रे, उमाचा पत्ता नाहीं ! हीं दोघं गेलीं कुठं ? चल बर ! आपण पाहूं या तरी—"

" इतकं भिण्याचं कारण नाहीं, जया ! पलिकडल्या संत्र्याच्या बगीचांतच असतील कुठं तरी ! आपण गेल्यानं विरस मात्र व्हायचा त्यांच्या हितगुजाचा—"

चारू उठतां उठतां हंसून उद्गारला.

\+ + + +

आणि खरोखरीच संत्र्याच्या बगीचाच्या टोंकाला असलेल्या विहिरीवरील मोटेच्या बांधावर तीं दोघें बसलीं होतीं. संत्र्याच्या फुलांचा बहर आतां बहुतेक सर्व गळून गेला होता. पण, उरल्या सुरल्या फुलांचा सुवास आणि आंब्याच्या मोहराचा परिमळ यांच्या संमिश्र गंधानें वातावरणांत मादकता उत्पन्न झाली होती. संत्र्याचीं डुबरीं झाडें त्या सौम्य चंद्रप्रकाशांत काळसर दिसत होतीं; तर त्यांच्या काळ्याभोर आळ्यांतील सोकलेल्या पाण्याचा तवंग सायीसारखा पांढुरका दिसत होता. चंद्र अगस्त्याच्या झाडाआड असल्यामुळें त्या दोघांच्या अंगावर चांदण्याचे कवडसे पडले होते. छाया आणि प्रकाश यांची त्या रमणीय दृश्यांत झालेली मनोहर सरमिसळ म्हणजे जणुं कांहीं त्यांच्या प्रणयसंभ्रमानें चाळवलेल्या भावनांचें प्रतिबिंबच होतें.

रहाटाच्या दांड्याला ओठंगून तीं दोघें बसलीं होतीं. तिनें आपलें मस्तक त्याच्या खांद्याला टेंकलें होतें; व त्याचा गाल तिच्या मस्तकाला बिलगला होता.

त्या चमत्कारिक प्रसंगानंतर इतक्या एकांतांत भेटण्याची ही प्रथमच संधि लाभली होती त्यांना !

"—मग तूं वचन दिलं पाहिजेस, उमा, मला असल्या भानगडींत पुन्हा कधीं पडणार नाहीं म्हणून—"

"तूं असं कांहीं बोलायला लागलीस कीं नाहीं म्हणजे संशय येतो तुझा मला, विजू !—"

"कसला रे ?—" तिनें एकदम उठून त्याच्याकडे पहात विचारलें.

"तूं काकांशीं त्या बाबतींत कांहीं तरी बोलली असशील असा—"

"उमा, तूं ही तिसऱ्यांदा शंका घेतली आहेस माझ्याविषयीं ! पुन्हा जर तूं त्या दिवसाची आठवण दिलीस मला अशा रीतीनं तर आपलं जमायचं नाहीं मुळींच !—"

"पण त्या दिवशीं घडलेल्या त्या प्रसंगामुळंच आपल्याला एकमेकांच्या हृदयाची ओळख पटली ना ? मग त्याच्या आठवणीनं एवढं चिडून जाण्यासारखं काय आहे त्यांत ?—"

"तुला नसेल. पण मला आहे. माझ्या आवडत्या माणसाला मी ज्या दिवशीं चोरी करतांना पाह्यलं, त्याची आठवण सहन नाहीं होत मला अगदीं—"

"चोरी ?—विजू, शब्दांचे अर्थ कळत नाहींत तुला—"

"शब्दांचे नाहीं कळले तरी चालतील. पण कृत्यांचे अर्थ कळले पाहिजेत. तुला तर ते मुळींच कळत नाहीत—"

"कोणत्या कृत्याचा अर्थ कळला नाही ग मला ?—"

त्यानें रागानें विचारलें.

"सगळ्याच ! नाहीं तर जयाच्या नादीं लागून तूं अशा रीतीनें वागला नसतास ! जयाचा स्वभाव निराळा, तुझा निराळा—"

"तुझं म्हणणं असं आहे का, विजू, कीं तुझ्यावर प्रेम करण्यापलीकडे मी दुसरं कांहींसुद्धां आयुष्यांत करूं नये ?—"

"तें सुद्धां नीट करतां येत नाहीं तुला--"

"मग प्रेम कसं करायचं तें शिकव तरी मला तूं!"

त्यानें झटकन तिची हनवटी वर करून चुंबनाच्या अपेक्षेनें आपलें तोंड तिच्या तोंडाजवळ नेलें.

त्याबरोबर तिनें त्याचा हात बाजूला करून आपली मान दुसरीकडे वळविली.--तत्क्षणींच तिच्या त्या नितळ, गोऱ्यापान मानेवर चांदण्याचा कवडसा पडला.--

तेव्हां त्या उजळलेल्या जागेचें त्यानें पुनःपुन्हा चुंबन घेतलें आणि तें घेतां घेतां हळूच तिच्या कानाच्या नाजुक पाळीला दंश केला--

"अग आई ग! ही काय रे तुझी प्रेम करण्याची पद्धत?--"

त्याच्या तोंडावर हात ठेवीत तिनें किंचित् रोषानें म्हटलें.

"मग तुझी पद्धत तूं कां नाहा शिकवीत मला?"

तो तिच्या त्या हाताचें चुंबन घेत म्हणाला.

"शिकवीन. पण तूं वचन दे मला आधीं--"

त्याचा चेहरा एकदम गंभीर झाला व तिच्या खांद्यावर दोन्ही हात ठेऊन स्थिर दृष्टीनें तिच्याकडे पहात त्यानें तिला विचारलें--

"खरं सांग मला, विजू! थट्टा नको. तूं आज हा सारखा वचनाचा हट्ट काय घेऊन बसली आहेस! जयाला मी साथ देऊं नये असं वाटतं का तुला? मी त्याचा सहकारी व्हायला अपात्र आहे अशी समजूत आहे का तुझी?--"

ती क्षणार्ध स्तब्ध होती.

नंतर त्याचे हात हळूच आपल्या खांद्यावरून काढून घेऊन ती म्हणाली, "उमा, तूं रागावतां कामा नयेस मी आतां सागणार आहे तें ऐकून. जया पहिल्यापासूनच अतिशय व्रात्य आणि करारी. साहेब एवढे तापट न् जिद्दी असूनसुद्धां त्यांचं कांहीं चाललं नाहीं त्याच्या निर्धारापुढें! त्याच्यासारखा जर तुझा स्वभाव धाडसी असता, तर मागितलं नसतं असलं वचन तुझ्याजवळ मी! पण त्याचा कडवेपणा तुझ्यांत नाहीं. शिवाय साहेबांचीहि मला फार भीति

वाटते ! आपल प्रेम जर सफल व्हायला हव असेल, तर सोडला पाहिजेस हा नाद तूं—"

यावर तो कांहीं बोलला नाही. त्या पिस्तुलाच्या प्रसंगापासून जयाचें जें या बाबतींत त्याच्याशी तुटक वर्तन होत असे, त्याची आठवण झाली त्याला एकदम; व स्वतःच्या अपात्रतेची जाणीव होऊन त्याचें मन व्यथित झालें.

" उमा, तूं बोलत कां नाहींस ? माझ्या बोलण्याचा राग आला का तुला ?—"

" तुझ्या बोलण्याचा राग कशाला येईल, विजू ? मला स्वतःचाच राग आला ! माझ्या लायकीविषयीं तुझं मन साशंक आहे. आणि तरीहि अशा नालायक माणसावर प्रेम करावंसं वाटतं तुला, विजू ?—"

" तूं नालायक आहेस असं कधीं रे म्हटल मी ? फक्त जयाचा न् तुझा स्वभाव भिन्न आहे आणि म्हणून तूं भलत्याच बाबतींत त्याचा साथ करूं नयेस एवढंच सांगितलं मी तुला ! उमा, तूं वचन नाहीं देणार मला ?– "

" देतों ! पण तें जर मोडलं गेलं पुढं मागं माझ्या हातून तर तू दोष नाहीं देतां कामा मला—"

" हें काय रे ? मग वचन कसलं तें ?—"

तो कांहीं बोलला नाहीं.

" उमा, तू विचार कसला करतो आहेस एवढा ? "

" माझ्या नालायकींचा—"

" कांहीं तरी बोलतोस ! मी जवळ असतांना माझ्याशिवाय दुसरा कसलाहि विचार करतां कामा नयेस तूं—"

" पण तू स्वतःच तर मला विचार करायला लावतेस !—विजू, तुला खरच वाटतं का कीं माझ्या भोंवतालचीं सारीं माणसं आपआपल्या परीनं स्वतःच्या आयुष्याचं सार्थक करण्यासाठीं झटत असतां मी मात्र एखाद्या भंगड माणसाप्रमाणं प्रणयाच्या नशेंत आयुष्य घालवावं ? तुला तरी असला अळणी आयुष्यक्रम असलेला प्रियकर फार दिवस आवडेल का ? ज्या तीन घराण्यांशीं आपला अत्यंत निकट संबंध आहे, त्या घराण्यांतील प्रत्येक पुरुषानं स्वतःच्या

कर्तबगारीची चमक कोणत्या ना कोणत्या तरी रीतीनं दाखविलेली आहे! मग मीच तेवढ तुझ्या प्रेमपाशांत स्वतःला गुरफटून घेऊन निष्क्रिय जीवन कंठावं असा आग्रह तूं कां धरतेस? तुझ्या प्रेमाचा एवढा जबर मोबदला, असली विचित्र किंमत तूं कां मागतेस, विजू? माझ्या कर्तबगारीवर तुमचा कोणाचाच विश्वास नाहीं, याची जाणीव आहे मला. इतरांच्या अविश्वासाची तितकीशी पर्वा करीत नाहीं मी. पण, आपल्यावर प्रेम करणाऱ्या आपल्या प्रियकरणीचा जर आपल्या कर्तृत्वावर विश्वास नसेल, तर तिच्या मनांत आपल्याविषयीं केव्हां ना केव्हां तरी अत्यंत तीव्र असा अनादर उत्पन्न झाल्याशिवाय रहाणार नाहीं हें मला समजतं; न् म्हणून तुझ्या प्रेमाची भीति वाटते मला. पुढें मागें माझी कर्तृत्वशून्यता पाहून तुला माझा वीट येण्यापेक्षां तुझ्या प्रेमाचा लोभ मी आतांच सोडलेला बरा असं मला वाटूं लागलंय तूं तें वचन मागितल्यापासून! प्रेमाची भावना ही मोठी विचित्र आहे, विजू! जगांत इतकी विचित्र भावना दुसरी क्वचितच असेल. एकीकडे हें मत्सरी प्रेम अशी अपेक्षा करतें कीं, त्याच्या-शिवाय दुसऱ्या कोणत्याहि विषयाला प्रेमिकाच्या हृदयांत थारा मिळतां कामा नये. पण त्याबरोबरच त्या प्रेमाची उत्कटता टिकवण्यासाठीं त्याला सतत कांहीं तरी आकर्षण, कांहीं तरी नावीन्य लागत असतं! प्रेमाइतकी मत्सरी पण गुणलोलुप भावना जगांत दुसरी सांपडणार नाहीं. विजू, तूं आपल्या प्रेमाची भलतीच किंमत मागूं नकोस. त्यामुळं आपल्या दोघांच्याहि आयुष्याचं मातेरं होईल!——"

बोलतां बोलतां त्याच्या डोळ्यांत अश्रु आले; व ते तिच्या दृष्टीस पडूं नयेत म्हणून त्यानें मान फिरविली.

ती उठून त्याच्या अगदीं जवळ गेली; व त्याच्या गळ्यांत आपले हात घालण्याचा तिनें प्रयत्न केला.

" नको नको, विजू!—— "

" तो एकदम बाजूला होऊन दुःखानें उद्गारला.

आपल्या हातून चुकून जाया झालेल्या आपल्या आवडत्या पक्ष्याला आपण नंतर मायेनें कुरवाळण्यासाठीं हात पुढें केले असतां, तो जसा भीतीनें

पंख फडफडावीत दूर होण्याची धडपड करितो, तशी हालचाल होती त्याची ती!

" नाहीं, नाहीं. मी तुझ्या जवळ कसलेंहि वचन मागत नाहीं; मागणार नाहीं, उमा!––" ती पुन्हां त्याच्या जवळ जाऊन म्हणाली आणि त्याच्या खांद्यावर तिनें आपलें तोंड टेकलें.

प्रथम तिच्या श्वासाचा स्पर्श त्याच्या उघड्या मानेला जाणवला, नंतर तिच्या ओठांच्या स्पर्शानें त्याचें शरीर थरारून गेलें.

त्यानें हळूच तिचें तोंड वर उचललें आणि तिच्या ओठांना आपल्या ओठांनीं स्पर्श केला.

अगदीं त्याच क्षणाला, एवढा वेळ अगस्त्याच्या फांदीआड असलेला चंद्र थोडा खालीं येऊन, त्याचा हंसरा प्रकाश त्यांच्या अंगावर पडला.

आणि त्या प्रकाशांत त्यांना एकमेकांचीं आसवांनीं भिजलेलीं मुखें स्पष्ट दिसलीं.

त्याबरोबर तीं एकमेकांना अगदीं दृढतेनें बिलगलीं.

आणि तिच्या ओठांत ओठ मिसळलेले असतांनाच तो तिला कांहीं तरी सांगूं लागला–

––पण तें त्याचें प्रणयवचन पुरतें होण्यापूर्वीच त्यांच्या कानांवर हांक पडली–

" उमा! उमा!–"

" अगबाई, जया न् चारू जवळ आलेले दिसताहेत–"

ती त्याच्यापासून गडबडीनें दूर होत उद्गारली.

" हो, जयाचीच हांक ही!–" तो गडबडीनें उठून कपडे नीट करीत म्हणाला.

आणि त्याच्या विषण्ण मनांत एकदम अशी कल्पना आली कीं, जयाच्या हांकेमुळें आज जसें आपलें प्रणयवचन अपुरें राहून आपल्याला विजूपासून दूर व्हावें लागलें, तसेंच पुढें आयुष्यभर तर घडणार नाहीं ना?

१५

# सत्याच्या नांवावर केलेली प्रतारणा

" तुझं त्या दिवसाचं भाषण मोरूपेक्षां सुद्धां जहाल झालं असं ऐकलं मी,. प्रिया !—"

सर महादेव हातांतील कांटा प्लेटवर ठेवून नॅपकिननें जिवणीच्या कडा पुशीत म्हणाले.

" असं ? मला तर कांहींच कल्पना नाहीं. कदाचित् काकांना माहित असेल !—"

" माझ्याकडे रिपोर्ट आला नाहीं तुझ्या भाषणाचा, प्रिया, अद्याप !—"

यादवराव अगदीं निर्विकार मुद्रेनें म्हणाले.

" त्याला कशाला ओढतोस मध्यें ? भाषण करतांना तूं शुद्धीवर नव्हतास असं दिसतंय मला तुझ्या या बोलण्यावरून !—"

" आतां तरी शुद्धीवर आला आहे का तो, दद्दा ? नाहीं तर त्यानं काकांना अशा रीतीनं उगाच टोमणावलं नसतं—"

" नाहीं, राधा, मी काकांना टोमणावण्याच्या उद्देशानें बोललों नाहीं तसं ! नेहमींच्या पद्धतीप्रमाणं त्यांच्याकडे रिपोर्ट आला असेल माझ्या भाषणाचा, अशा समजुतीनं म्हटलं तसं मी——"

" माझ्याकडे रिपोर्ट आला नाहीं आणि आतां येण्याचाहि संभव नाहीं, प्रिया ! आजच रजा मंजूर झाली माझी——"

" रजा ? केव्हां घेतलीस आणि कां घेतलीस तूं ? नव्या गृहमंत्र्यांशी

जमलं नाहीं का तुझं, यादव ? तूं माझा माणूस म्हणून त्रास तर दिला नाहीं त्यांनीं तुला कांहीं ? तूं सांगायला हवं होतंस मला सगळं रजा घेण्यापूर्वीं !—"

सर महादेव हातांतील चमचा खालीं ठेऊन रोषयुक्त आश्चर्यानं उद्गारले.

"नव्या गृहमंत्र्यांचा यांत कांहीं संबंध नसल्यामुळेंच मी बोललों नाहीं आपल्याजवळ, दद्दा ! आपले आणि माझे संबंध त्यांना अर्थातच माहीत आहेत. पण, त्यांनीं एका शब्दानंहि कधीं मला जाणीव न देतां मोठ्या संभावितीनं वागले ते माझ्याशीं ! मी रजा घेतली ती मनस्ताप असह्य झाल्यामुळें ! आणि त्याच कारणामुळं मी नागपूर सोडून हे उन्हाळ्याचे तीन महिने बंगलोरला घालविणार आहे, दद्दा !—"

पण यादवरावांचं हें शेवटलं वाक्य सरसाहेबांनीं ऐकलं कीं नाहीं कोण जाणें. ते एकदम संतप्त आवाजांत उद्गारले—

"मनस्ताप ! कसला आला आहे मनस्ताप ? माझ्या तालमींत वाढलेल्या माणसाच्या तोंडीं असली भाषा शोभत नाहीं, यादव !—"

यादवरावांकडे वळून ते हे शब्द रागारागानं उच्चारीत असतांना संतापातिरेकानं फुगलली त्यांच्या मानेची शीर विद्युद्दीपाच्या झगझगीत प्रकाशांत प्रियदर्शनला स्पष्ट दिसली—

—आणि विषय बदलण्याच्या हेतूनें तो कांहीं बोलणार, तोंच यादवराव अगदीं लीनतेनें म्हणाले—

"माझ्या मनस्तापाचीं कारणं मी आपल्याला सांगितलेलीं आहेत, दद्दा !"

"होय. माझ्या लक्षांत आला तुझ्या बोलण्याचा अर्थ ! पण मला तीं कारणं त्या वेळीं पटलीं नाहींत आणि आजहि पटत नाहींत. जे वडील माणसांची अवज्ञा करून बेफामपणानं वागतील, ते प्रायश्चित भोगतील आपल्या त्या अविचाराचं ! पण त्यांच्या बेजबाबदार वर्तनामुळं कच खाऊन आपण आपल्या कर्तव्याला चुकणें भित्रेपणाचं आहे. तूं अशा रीतीनं वागशील असं वाटलं नव्हतं कधीं मला, यादव ! माझ्या भोंवतालच्या प्रत्येक माणसानं माझी निराशा करायची ठरवली आहे का रे ?—

सर महादेवांनीं इतक्या दुःखपूर्ण आवाजांत ते शब्द उच्चारले कीं, त्यांवर

काय बोलावें हें कोणालाच समजेना. क्षणमात्र सारीच मडळी स्तब्ध होती. जेवणाला नुकताच प्रारंभ झाला असल्यामुळें अर्ध्यावरून उठणेंहि शक्य नव्हतें. सरसाहेबांनीं रुमालानें तोंडाला आलेला घाम पुसला; व मुकाट्यानें प्लेटमधील पदार्थ चमचानें खावयाला सुरवात केली. त्याबरोबर इतरांचेंहि जेवण पुन्हा सुरू झालें.

पण, ती क्षणोक्षणीं अधिकाधिक दुःसह होत चाललेली निःशब्दता कशा रीतीनें नष्ट करावी, हें मात्र कोणालाच सुचेना.

शेवटीं सरसाहेबांच्या उजव्या हाताला बसलेल्या प्रियंवदेनें त्यांना हळूच विचारलें, " आजच्या टाइम्समध्यें आलेलं पं० मालवीयांचं राजीनाम्यांचं पत्र वाचलंत का आपण ?—"

" वाचलं. कां बरं ?—"

" त्यांनीं भलत्याच मुद्यावर राजीनामा दिला असं नाहीं वाटत आपल्याला ? "

" मी तुम्हांला सांगतों त्यांतला खरा मुद्दा ! " बॅ० गुप्ता मध्येंच हंसून म्हणाले.

" हें आर्थिक स्वायत्ततेचं जें चऱ्हाट वळलंय त्या बुढ्ढ्यानं आपल्या पत्रात, त्यांत कांही अर्थ नाहीं, प्रियंवदाबाई ! बिर्ला शेठजींनीं तगादा लावला असेल राजीनामा द्या म्हणून; तेव्हा पंडितजींनीं हें टॅरिफ बिलाचं निमित्त सांगून कसं तरी एकदां उपरणं झाडलंय निरुपायानं ! कांग्रेसचे पुढारी महात्मा गांधीजी हे बजाज शेठजींच्या मुठींत, तर हिंदु महासभेचे पुढारी महामना मालवीयजी हे बिर्ला शेठजींच्या मुठींत ! पंडितजी लोकमताचा जोर पाहून पश्चात् बुद्धीनें वागत आले आहेत आजपर्यंत !—"

" त्यांच्यासारख्या पापभीरु माणसाविषयीं आपण असं कसं बोलतां ? " प्रियंवदेनें किंचित् नाराजीनें म्हटलें.

तिच्या गोऱ्यापान कपाळाला त्या ईषद्भ्रूभंगानें पडलेल्या नाजूक आठ्यांच्या रेषांकडे लालस दृष्टीनें पहात बॅ. गुप्ता मोठ्यानं हंसून उद्गारलं—

" पापभीरु ?—होय. पापभीरु खरेच ! पण पाप करायला भितात या अर्थानं मात्र नव्हेत हो ! तर भीत भीत पाप करतो तो पापभीरु या अर्थानं !

संस्थानिकांची खुशामत करण्यांत, भांडवलवाल्यांच्या तंत्रानं वागण्यांत आणि ब्रिटिश सरकारशीं अंत:सूत्र ठेवण्यांत महात्माजी आणि पंडितजी यांत अधिक तरबेज कोण हें सांगणं कठीण जाईल ! एक सत्यावतार, तर दुसरा धर्मावतार !"

" आपण निष्कारण एका थोर पुरुषाची नालस्ती करतां आहांत, गुप्ता-साहेब ! पंडितजी जर सच्चे देशाभिमानी नाहींत तर काय तुमच्यासारख्या सर-कारी वकिलाला देशाभिमानी म्हणावं लोकांनी ?—"

प्रियदर्शन एकदम रागानें उद्गारला.

त्याबरोबर प्लेटमधील पदार्थ हळूहळू खात तो संवाद इतका वेळ संथ-पणानें ऐकत असलेले सर महादेव म्हणाले, " अरे, इतकं एकदम रागवायला काय झालं तुला, प्रिया ? नालस्ती ही कीर्तीची सांवली आहे. कीर्तीच्या प्रखर प्रकाशांत जो मनुष्य जीवनाचा मार्ग आक्रमीत असतो, त्याची सांवली ही नालस्तीच्या रूपानें पडायचीच ! त्यांत एवढं चिडून जाण्यासारखं काय आहे ? पंडितजींच्या देशाभिमानाबद्दल शंका घेतल्याचा जसा तुला राग येतो, तसा ना० शास्त्र्यांच्या देशाभिमानाविषयीं संशय व्यक्त केल्याबद्दल तुला कधीं आला आहे का रे ? देशाभिमानाच्या कल्पनांत सुद्धां प्रकार न् प्रती असतात ! गांधीं-सारखा दुसरा देशाभिमानी मनुष्य नाहीं असं तुला वाटतं. पण एखाद्या अराजक क्रांतिकारकाच्या किंवा समाजवाद्याच्या मतानं गांधी हे ब्रिटिश साम्राज्यशाहीचे प्रच्छन्न हस्तक ठरतात हें तूं विसरूं नकोस ! शिवाय प्रियंवदेनं जी शंका काढली तिच्यांत तथ्य आहे थोडंसं. पंडितजींनीं राजीनामा दिला, तो खरोखरी गांधींच्या चळवळीला मिळत असलेला वाढता पाठिंबा लक्षांत घेऊन ! ती गोष्ट नाकारण्यांत अर्थ नाहीं. बिर्ला शेठजींनीं त्यांना राजीनामा द्यायला सांगितलं असेल किंवा नसेलहि. पण त्यांच्यासारख्या मुरब्बी न् वस्ताद माणसाच्या ही गोष्ट सहज लक्षांत येण्यासारखी आहे कीं, या वेळीं जर आपण गांधींना साथ दिली नाहीं, तर आजपर्यंत आपण देशाभिमानी म्हणून जो लौकिक आणि लोकप्रियता मिळविली ती सारी संपुष्टांत येईल ! मला तर असं वाटतं कीं, विठ्ठलभाईंचा सल्ला घेऊनच पंडितजींनीं राजीनामा दिला असून, स्वत: विठ्ठल-भाईहि राजीनामा देतील त्यांच्या पाठोपाठ ! प्रिया, तुला वाटतं तितकी ही

माणसं सरळ किंवा सोज्वळ नाहींत ! त्यांना वित्तैषणा नसेल कदाचित् ! पण लोकैषणा मात्र खास आहे. आणि जगांत पैशासाठीं जितक्या लबाड्या केल्या जातात, त्यापेक्षां कितीतरी जास्त लबाड्या कीर्तीसाठीं आणि नेतृत्वासाठीं केल्या जातात ! कारण पैसा हें किती झालं तरी केवळ एक साधन आहे. या लोकशाहीच्या युगांत लोकप्रियता आणि नेतृत्व कायम ठेवण्यासाठीं कर्तबगार आणि महत्वाकांक्षी माणसें कोणतें कृत्य करतील, याचा कांहीं नेम उरलेला नाहीं ! लोकमत हें ज्या दिवशीं राजसत्तेचें अधिष्ठान झालें, त्या दिवशीं राज्य-सत्ता ही लक्ष्मीपेक्षांहि लहरी आणि थिल्लर होऊन बसली !–"

बोलतां बोलतां सरसाहेबांनीं चमचानें सूपचा घुटका घेतला.

सरसाहेबांच्या त्या मार्मिक भाषणानें मध्यंतरीं निर्माण झालेली विषण्णता पूर्णपणें नाहींशी झाली; व गंभीरपणानें चाललेल्या त्या भोजनप्रसंगांत आतां उल्हास उत्पन्न झाला. आपण केलेलें विषयान्तर इतकें यशस्वी झालेलें पाहून प्रियंवदाहि संतुष्ट झाली. तिनें पुन्हां त्यांना विचारलें–

" मग पंडितजींचं राजीनाम्याचं पत्र योग्य वाटतं आपल्याला ?——"

" होय. आपल्या राजीनाम्यासाठीं इंपिरियल प्रेफरन्सचा मुद्दा निवडून काढण्यांत त्यांनीं मोठाच मुत्सद्दीपणा दाखविला आहे, यांत शंका नाहीं. एका परीनं गांधींच्या चळवळीला जोडच दिली त्यांनीं ही एक नवी ! देशांत मिठाचा कर मोडण्याची चळवळ सुरू असतां ब्रिटिश सरकारनं तिच्याकडे पूर्ण दुर्लक्ष करून साम्राज्यसवलतीचं तत्त्व हट्टानं देशावर लादण्याचा प्रयत्न करावा, या परता दुसरा अविवेक कोणता ? खरोखरी, पंडितजींनीं अगदीं योग्य वेळीं आणि योग्य कारणं देऊन राजीनामा दिला आहे ! त्यांच्या राजीनाम्याच्या मागें जाऊन त्यांचे हेतु हुडकीत बसण्यांत अर्थ नाहीं ! तसले आरोप कोणा-वरहि करतां येतील. राजकारणांत इतकी कुटिलता ही असायचीच–असलीच पाहिजे ! "

" पण गांधी तर आपलं राजकारण सत्यावर उभारलं असल्याचा बाणा बाळगतात, तें कसं काय ? " हिमगौरीनें मध्येंच विचारलें.

"ती सुद्धां एक मुत्सद्देगिरीचीच भाषा आहे, हिमा! रावसाहेब रानडे इंग्रजी राज्याला ईश्वरी वरदान म्हणत असत; व या त्यांच्या मताबद्दल स्वत:कडे साऱ्या देशाभिमानाचा मक्ता आला आहे असं समजणाऱ्या जहालांनीं त्यांची कांहीं थोडी थोडकी टवाळी केली नाहीं. पण, त्या जहालांना ही साधी गोष्ट कळली नाहीं कीं, मराठ्यांच्या सत्तेच्या अभ्युदयावर ज्या महापुरुषानें इतका स्फूर्तिदायक ग्रंथ लिहिला, तो पारतंत्र्य हें ईश्वरी वरदान आहे असें जेव्हां म्हणतो तेव्हां त्याचं तें विधान वाच्यार्थानं घेणं मूर्खपणाचं आहे. हिंदुस्थानाच्या कल्याणासाठींच आम्ही हिंदी लोकांवर राज्य करीत आहोंत अशी भाषा तोंडानें बोलत बोलत त्याचा पद्धतशीर रक्तशोष करणाऱ्या ब्रिटिश मुत्सद्यांना शह द्यायला इंग्रजी राज्य हें ईश्वरी वरदान आहे असें तोंडानं म्हणत म्हणत त्यांच्या विरुद्ध चळवळीची उठावणी करणारा तितकाच धूर्त मुत्सद्दी आपल्यांत निघाला याबद्दल आम्ही आनंद मानायचा कीं त्याला नांवें ठेवायचीं? टाटांच्या कारखान्यांतील मजूर हे सुस्थितींत असल्याबद्दल जो जाहीर प्रशस्तिपत्रक देतो किंवा भोपाळांत रामराज्य नांदत असल्याची घोषणा जो निःशंक मनानें करतो, त्याचें सत्यसंधत्व, आपलें ब्रम्हचर्य पणाला लावून परिक्षितीला उठविणाऱ्या श्रीकृष्णाच्या सत्यवादित्वाच्या सदरांत घालावें लागेल! शिवाय सत्य सत्य म्हणजे तरी काय? सत्य सापेक्ष असतें, हें तर झालंच! पण, राजकारणांत ही त्याची सापेक्षता तत्त्वं, पक्ष आणि परिस्थिति यांच्यामुळें इतकी कांहीं वाढते कीं, शेवटीं एका माणसाचें सत्य हें दुसऱ्या माणसाच्या दृष्टीनें असत्य ठरल्याशिवाय रहात नाहीं. ज्या गांधींनीं १९२२ साली चौरीचुऱ्याला दंगा झाल्याबरोबर बारडोलीचा संकल्पित सत्याग्रह एकदम तहकूब केला, तेच गांधी या वेळीं कोणी कितीहि अत्याचार केले तरी आपण पुढं टाकलेलं पाऊल मागं घेणार नाहीं असें जाहीर करितात, यावरूनच राजकारणांतील सत्य हें किती चंचल आणि सापेक्ष असतें, हें आपल्याला कळलें पाहिजे. राजकारण म्हणजे उदात्त तत्त्वांचा तोंडानें उद्घोष करणारें संभावित आणि संघटित कौटिल्य!—"

"म्हणजे राजकारणांत चारित्र्याची गरज नाहीं असं समजायचं का, दद्दा?—"

" नाहीं. राजकीय चारित्र्य ही एक अगदीं स्वतंत्र्यच वस्तु आहे, प्रिया! ज्या सर्वसाधारण नीतितत्त्वांच्या अनुरोधानं समाजाचे एकंदर व्यवहार चाललेले असतात, व ज्यांच्या कसोटीला लावून आपण सामान्य माणसांच्या चारित्र्याचा बरेवाईटपणा ठरवितों, तीं लौकिक नीतितत्त्वें लोकोत्तर प्रतिभेच्या आणि कर्तृत्वाच्या व्यक्तींना लागू करणें अन्यायाचें ठरेल. आद्यऋषींच्या वाणीमागून अर्थ धांवत जातो, असें भवभूतीनें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें अलौकिक व्यक्तींच्या चारित्र्यामागून नीतितत्त्वें धांवत जातात, असें म्हटलें तर तें चूक होणार नाहीं. ज्यांचें बुद्धिसामर्थ्य अचाट असतें, त्यांच्या बौद्धिक आणि मानसिक गरजाहि अचाट असतात; व त्या तृप्त करून घेतांना जर त्यांच्या हातून लौकिक नीतितत्त्वांचें उल्लंघन झालें, तर जगानें त्याबद्दल त्यांना जाब विचारणें न्याय्य ठरणार नाहीं. त्यांच्या खाजगी वर्तनाचा उपसर्ग जोंपर्यंत सार्वजनिक कार्यांना होत नाहीं, तोंपर्यंत लोकांना त्याची दखल घेण्याचें कारण नाहीं. " माझ्या सार्वजनिक जीवनावर आयर्लंडचा हक्क आहे. पण माझें खाजगी जीवन हें सर्वस्वी माझें स्वतःचें आहे, " या पार्नेलच्या उद्गारांचें मर्म न ओळखल्यामुळेंच आयर्लंडची अपरिमित हानि झाली! अंगीकृत कार्याविषयीं अविचलित निष्ठा, सार्वजनिक बाबतींत चोख वर्तन आणि लोकांची प्रतारणा न करण्याची वृत्ति या तीन गुणांनाच मी राजकीय चारित्र्य समजतों; व त्या दृष्टीनें गोखले, टिळक आणि मोतीलालजी हे तिघेहि मला आपआपल्या परीनें चारित्र्यवान् मुत्सद्दी वाटतात—"

" गांधींना नाहीं आपण चारित्र्यवान् समजत ?—"

" प्रिया, तूं अगदींच सरळ मुलगा आहेस ! " इतका वेळ गंभीरपणानें बोलत असलेले सरसाहेब हंसून उद्गारले. " मी गांधींचं नांव घेतलं नाहीं यावरूनच तुला कळायला हवं होतं कीं, त्यांच्या राजकीय चारित्र्याविषयीं माझं मत अनुकूल नाहीं—"

" तें कां बरं ?—"

" गांधींचं खाजगी जीवन अत्यंत शुद्ध आहे, याबद्दल मला शंका नाहीं मुळींच. तसेंच, हातीं घेतलेल्या कार्याविषयीं त्यांची निष्ठाहि अमर्याद असते. पण

लोकांची प्रतारणा करण्याच्या बाबतींत मात्र त्यांनीं युरोपांतल्या निर्ढावलेल्या मुत्सद्यांवरहि ताण केली आहे! 'एका वर्षांत स्वराज्य' हा त्यांचा शब्द-प्रयोग तुझ्या लक्षांत आहे ना?—मला तो शब्दप्रयोग ऐकला म्हणजे लॉयड जॉर्जच्या 'हँग द कैसर' या शब्दप्रयोगाच्या जोरावर हुल्लड माजवून जिंकलेल्या निवडणुकीची आठवण होत असे!"

"पण आपल्याच भाषेंत बोलायचं म्हणजे तो शब्दप्रयोग वाच्यार्थानं घेणं न्यायाचं होणार नाहीं, दद्दा!—"

"बरोबर बोललास तूं! पण, 'एका वर्षांत स्वराज्य' हा शब्दप्रयोग वापरून लोकांच्या कल्पनाशक्तीला झुलविण्यापूर्वीं लोकांची कुवत गांधींनीं कां लक्षांत घेतली नाहीं? असहकारितेचा कार्यक्रम अक्षरशः आणि एकदम अंमलांत आणणें अशक्य आहे हें गांधींना दिसत नव्हतें काय? जर दिसलें नसेल तर गांधींनीं स्वतःची प्रतारणा केली असें म्हटलें पाहिजे; व दिसूनहि जर त्यांनीं तो शब्दप्रयोग वापरला असेल तर त्यांनीं लोकांची प्रतारणा केली असें म्हटलें पाहिजे! कालच त्यांनीं एका भाषणांत असें सांगितलें कीं, "एक तर मला जें हवें आहे तें घेऊन तरी मी परत येईन किंवा माझें प्रेत तरी समुद्रावर तरंगतांना दिसेल! (***Either I shall return with what I want or my dead body will float in the ocean.***)" असली भाषा म्हणजे निव्वळ हुल्लडबाजी आहे, प्रिया!—"

यावर प्रियदर्शन कांहीं बोलला नाहीं. सरसाहेबांच्या त्या विधानामुळें जें उपरोधिक स्मित भोवतालच्या मंडळीच्या डोळ्यांत खेळलें, त्यामुळें तो अगदीं वरमल्यासारखा झाला. जेवण आतां बहुतेक संपलेंच होतें; व चपराशानें आण-लेल्या कांचपात्रांत हात धुऊन सरसाहेबांनीं उठण्याच्या अपेक्षेनें एकवार सभोंवती नजर फेंकली.

त्यांच्या मागोमाग सारी मंडळी उठून बाहेरच्या पटांगणांत आली. लगेच चपराशानें कॉफीचे पेले भरून दिले. तिचा घुटका घेत घेत बॅ. गुप्तांनीं सर-साहेबांना म्हटलें—

"गांधींना अद्याप अटक करण्यांत आली नाहीं हें आश्चर्य आहे मोठं!—"

" आश्चर्य कसलं आलं आहे त्यांत ? इर्विन हा धिम्मा माणूस आहे. तो पहातो आहे कीं, गांधींना कितपत पाठिंबा मिळतो ! परवां दिल्लीला शिया परिषदेपुढें मोठें मुत्सद्देगिरीचें भाषण करून त्यानं मुसलमानांना गांधींच्या चळवळींतून फोडण्याचा डाव शिताफीनं टाकला आहे ! गांधी दांडीला पोंचल्यावर जर सर्व देशभर सत्याग्रहाची उठावणी झाली, सर सरळ दडपशाहीला सुरवात होईल ! तोंपर्यंत गांधींना पकडून उगाच लोकक्षोभ कशाला उत्पन्न करील तो?"

सर महादेव कॉफी चमचानें ढवळीत म्हणाले.

" बाकी आपल्या नागपुरांत त्या मानानं चळवळीला बराच जोर आहे. नाहीं, प्रिया ? "

राधामोहननें प्रियदर्शनकडे पहात उपरोधिक आवाजांत म्हटलें.

" खरंच राधा, तूं सुद्धां आपल्या कौन्सिलांतील जागेचा राजीनामा देऊन या चळवळींत भाग घ्यावास अशी सूचना आहे माझी तुला ! तुझ्यासारख्या बुद्धिमान् माणसाची जोड जर या चळवळीला मिळाली, तर तिचं सामर्थ्य किती तरी वाढेल !— "

प्रियदर्शननें तितक्याच उपरोधबुद्धीनं उत्तर दिलें.

त्या दोन भावांमध्यें तो तशा रीतीनें चाललेला संवाद सरसाहेबांना आवडला नाहीं. कारण अर्धवट प्यालेला कॉफीचा कप एकदम टेबलावर ठेवून ते उद्गारले—

" राधा, प्रिया, अरे, एका कुटुंबांतल्या माणसांनीं एकमेकांना अशा रीतीनं उपरोधिक बोलणं म्हणजे एकमेकाच्या हृदयाला घरें पाडणं आहे ! असल्या कुत्सित बोलण्यामुळेंच परस्परांविषयीं मनं विटून अखेर कुटुंबांत फाटाफूट होते ! आपसांतले मतभेद हे स्पष्ट आणि सरळ शब्दांनीं एकमेकांना सांगावेत नेहमीं !—"

राधामोहन यावर कांहीं बोलला नाहीं. तो त्यांना अदबीनें अभिवादन करून बॅ. गुप्ता यांच्यासह आपल्या खोलींत गेला. जेवणानंतरच्या कॉफीपानांत तो कधींच भाग घेत नसे. फक्त आपल्या वडिलांचें कॉफीपान संपेपर्यंत तेथें थांबण्याची त्याची पद्धत होती.

तो गेल्यावर सरसाहेबांनीं चपराशानें पुढें केलेल्या तबकांतील विडा तोंडांत घातला; व ते यादवरावांकडे वळून म्हणाले, " तूं खरोखरीच बंगलोरला जाणार आहेस का, यादव ?—"

" होय, दद्दा ! रजेचे तीन महिने प्रांताबाहेर दूर कुठं तरी घालवायचा विचार आहे माझा !—"

" मग माझ्याबरोबर पचमढीला येणार नाहींस तूं नेहमीप्रमाणं ?—"

" आपण केव्हां निघणार आहां ?—"

" मी पहिल्या तारखेलाच निघायला हवं होतं खरोखरी ! सर मॉंटेग्यूंनीं इथून जातांना तशी आठवण मला दिलीहि ! पण, मी इथून गेल्यावर मागं काय घडेल याची खात्री नसल्यामुळं मला धीर होत नाहीं नागपूर सोडण्याचा ! गेल्या पंधरा वर्षांत पंचमढीला जाण्याच्या बाबतींत एप्रिलची पहिली तारीख चुकली नव्हती माझी कधीं! वय झाल्यावरसुद्धां माणसाला कुटुंबाच्या काळजींतून मुक्त होतां येऊं नये, हें खरोखरी दुर्दैव आहे !—"

ते प्रियाकडे पाहून बोलत होते. पण तो अगदीं स्तब्ध उभा होता. विद्युद्दीपाचा झगझगीत प्रकाश त्यांच्या तोंडावर पडला होता. त्या प्रकाशांत त्यांच्या आरक्तगौर चेहऱ्यावरील प्रत्येक सुरकुती आणि कानशिलांवरील फुगलेल्या शिरा स्पष्ट दिसत होत्या. त्यांच्याकडे पहातां पहातां प्रियदर्शनच्या मनांत एकदम विचार आला,—या महिना दीड महिन्यांत त्यांची प्रकृति खालावली तर नाहीं ? आणि ती खालावयाला आपलें वर्तन तर मुख्यतः कारण झालें नसेल ?—

तोंच ते पुन्हा यादवरावांना म्हणाले, " तूं सगळी मंडळी बरोबर घेऊन जाणार आहेस बंगलोरला ?—"

" हो. विचार तरी आहे तसा. पण सगळी मंडळी बरोबर येतीलच असा काय नेम ?—"

" म्हणजे ? मी अर्थ समजलों नाहीं तुझ्या बोलण्याचा ? "

" आज सकाळींच विजू सांगत होती मला, जया नागपूर सोडून कुठंहि बाहेर जायला तयार नाहीं म्हणून !—"

यादवरावांचे ते निराशायुक्त उद्गार ऐकून सर महादेव संताप आणि

आश्चर्य यांनीं पुन्हा अगदीं लाल होऊन गेले. त्यांना काय बोलावें, हें सुचेना. आपल्या समोर उभ्या असलेल्या प्रियदर्शनकडे आणि यादवरावांकडे ते टकमका पहात होते. त्यांच्या कपाळावरची शीर फुगली होती; व नाकपुड्यांचें स्फुरणहि स्पष्ट दिसत होतें. ते अगदीं स्तब्ध होते फक्त गुडघ्यावर एकांत एक गुंतवून ठेवलेले त्यांचे हात मात्र सारखे हलत होते.

त्यांची ती चमत्कारिक स्तब्धावस्था पाहून प्रियदर्शनला भीति वाटली. आपल्याकडे बघत असलेल्या त्यांच्या त्या भेदक डोळ्यांत शून्यता उत्पन्न होत असल्याचा भास त्याला झाला; त्यानें हळूच यादवरावांना खूण करून त्यांच्याशीं कांहीं तरी बोलण्याविषयीं सुचविलें.

तेव्हां त्यांनीं हळूच इंग्रजींत विचारलें, " आम्हांला जायला परवानगी आहे ना आपली ?—"

त्यांच्या त्या प्रश्नाचा अपेक्षित परिणाम झाला. सरसाहेबांनीं एकदम त्या मूर्छेनेंतून दचकून सावध होऊन त्यांना विचारलें, " काय म्हणालास तूं ?—"

" कांहीं नाहीं. म्हटलं, आम्हांला जायची परवानगी आहे ना ?—"

" हो. प्रिया, तूंहि निघालास का ?—"

" कांहीं काम असेल तर थांबतों—"

" काम ? माझं काय काम असणार आहे तुझ्याशीं ?" ते विमनस्कतेनें उद्गारले.

" मी उद्यांच बहुतेक पंचमढीला जायला निघेन. तूं जर मोकळा राहिलास तर जरूर ये तिथं ! कांताची प्रकृति कशी आहे ? मी नेली असती तिला आपल्याबरोबर पंचमढीला ! पण ती कांहीं तयार व्हायची नाहीं तुला सोडून तिथं यायला !—तिच्या प्रकृतीची काळजी घे !—"

त्यांचें बोलणें संपण्याचें लक्षण दिसेना; व प्रत्येक शब्दाबरोबर त्यांची मनोव्यथा वाढत असल्याचें स्पष्ट दिसत होतें.

प्रियदर्शनला तें दृश्य बघवेना. तो मध्येंच म्हणाला, " मी जमल्यास जरूर येईन पंचमढीला ! मग आम्हीं जायचं ना आतां ?—"

" ठीक. गुड नाईट !—"

त्यांनीं कपाळावर हात ठेवून अगदीं सावकाश म्हटलें.

त्यांच्या तोंडून ते अनुज्ञेचे शब्द बाहेर पडतांच यादवराव आणि प्रियदर्शन त्यांना अभिवादन करून झपाझप पटांगणाच्या पहिल्या फाटकाशीं आले. त्याबरोबर तेथें उभ्या असलेल्या गुरखा पहारेकऱ्यानें त्यांना अदबीनें लवून सलाम केला; स्टॅंडमध्यें ठेवलेली प्रियदर्शनची सायकल बाहेर काढली.

तोंच यादवराव त्याला म्हणाले, " माझ्या गाडींतूनच चल तूं आज, प्रिया. मला तुझ्याशीं बोलायचंय थोडंसं !—"

तो क्षणार्ध घुटमळला. पण लगेच त्यानें म्हटलं, " ठीक आहे !—"

—आणि तो आंत बसला.

यादवराव त्याला गाडी चालू करतां करतां म्हणाले, " प्रिया, कां कोणाला ठाऊक ! पण मला सारखं मघाच पासून वाटतंय कीं, दद्दांची न् आपली भेट कांहीं पुन्हां होणार नाहीं—"

प्रियदर्शन कांहीं बोलला नाहीं.

त्याच्या डोळ्यांतून अश्रु ठिबकत होते.

# १६

# युगांतराची साक्ष देणारे अश्रु

कांता बागेंत एकटीच उभी होती.

पण तो एकटेपणा तिच्या आतां अंगवळणीं पडला होता.

आज तिचा तो आवडता दिलरुबाहि तिच्याजवळ नव्हता. मनुष्य ज्या वेळीं एकांतासाठीं आसुसतो, त्या वेळीं त्याला आपल्या अंतर्मनाचें अस्तित्वसुद्धां दुःसह होतें. मग तिच्या हृदयांतील शब्दातीत भावनांना साथ देऊन बोलत्या करणारें तें वाद्य जर तिला आज नकोसें झालें असलें, तर त्यांत नवल काय ?

तिचें मन अत्यंत अस्वस्थ होतें. पडक्या घरांत जशा पाकोळ्या गिरक्या घेत असाव्या, तसे सकाळीं घडलेल्या त्या प्रसंगाविषयींचे विचार तिच्या उदास मनांत सारखे घोळत होते.

आज सकाळीं सर महादेवांनीं मुद्दाम मोटार पाठवून तिला आपल्या भेटीसाठीं बोलावून नेली होती. ते पंचमढीला जाण्याच्या गडबडींत होते. ती आली त्या वेळीं त्यांचा प्रातरुपहार चालला होता. वेताच्या सुंदर टेबलावर चहा, टोस्ट, निरनिराळ्या प्रकारचीं बिस्किटें आणि वड्या, ताजीं आणि सुकीं फळें वगैरे पदार्थ ठेवलेले होते. मालिनी आणि ऊर्मिला त्यांच्यासमोर ठेवलेल्या खुर्च्यांवर बसल्या होत्या.

ती आंत आल्याबरोबर सर महादेव म्हणाले, "ये, बैस कांता! कशी काय प्रकृती आहे तुझी ? दर आठवड्याला नेमानं मार्टिनकडे जात असतेस ना तूं !—"

" हो. कालच प्रकृती पाहिलीन् तिनं माझी. सध्यां तरी सारं कांहीं ठीक आहे म्हणाली ती !—"

कांतानें लीनतेनें उत्तर दिलें; व मालिनीच्या शेजारीं असलेल्या रिकाम्या खुर्चीवर ती बसली.

ऊर्मिलेनें तिच्या कपांत चहा ओतला; व सरसाहेबांकडे पाहून म्हटलें, " दद्दा, तुम्ही ताईला कां नाहीं घेत बरोबर आपल्या ? नाहीं तरी प्रिया आतांशा दिवसभर घरीं नसतोच ! मग हिला तरी इथं राहून काय करायचंय ? "

" असं कसं म्हणतां तुम्ही ? भाऊजी दिवसभर घरीं नसले म्हणून काय झालं ? ते जोंपर्यंत नागपुरांत आहेत, तोंपर्यंत सध्यांच्या स्थितींत तरी त्यांना हलतां येत नाहीं इथून ! पुरुष घरांत राहोत वा न राहोत. ते जोंपर्यंत घर अजिबात सोडून जात नाहींत, तोंपर्यंत त्यांची आणि घराची आपल्याकडून होईल तितकी काळजी घेणं हें काम आहे बायकांचं !—"

" बरोबर आहे तुझं म्हणणं, मालिनी ! " सरसाहेब आपल्या समोर बसलेल्या दोन्ही सुनांकडे आदरमिश्र कौतुकानें पहात उद्गारले. " पुरुषांचं पाऊल घरांत टिकत नाहीं म्हणून बायकांनीं जर घराची आबाळ केली, तर जगांतील शेंकडा नव्वद संसार धुळीला मिळतील उद्यां ! संसाराच्या बाबतींत पुरुषांपेक्षां बायकांची जबाबदारी मोठी आहे, ऊर्मि !—"

" पुरुषांवर जबाबदारीच नाहीं मुळीं कसली, दद्दा !—"

ऊर्मिलेनें संत्र्याच्या फोडी सोलून सरसाहेबांच्या पुढें ठेवीत किंचित् हंसून म्हटलें.

" खरं आहे तुझं म्हणणं, पोरी ! निदान तुझ्या दोघां भावांना तरी जबाबदारी म्हणजे काय चीज आहे याची जाणीव नाहीं मुळींच !—"

त्यांचें भाषण अशा रीतीनें अप्रिय विषयाकडे वळत असल्याचें पाहून कांतानें मध्येंच विचारलें, " आपण कालच निघणार होतां असं ऐकलं होतं मी !—"

" होय. पहिला बेत होता खराच तसा ! पण काल सकाळीं उठल्याबरोबर माझ्या मनाचा निश्चय होईना. तुला माहितच आहेत कारणं ! पण काल

संध्याकाळीं सर मॅांटेग्यूंचं आग्रहाचं पत्र आलं ! तेव्हां असा विचार केला कीं, आपण इथं राहिलों तरीहि कांहीं होणार तें टळत नाहीं. मग चार पावलं दूरच असलेलं काय वाईट ? म्हणून काल रात्रीं निघायचं नक्की ठरवलं न् सकाळीं तुझ्याकडे गाडी पाठविली—"

" पण, दद्दा, मी तर असं ऐकलंय कीं, आपल्या प्रांतांत कांहीं दडप-शाही सुरू होणार नाहीं इतक्यांत ?—"

"कोणी सांगितलं, पोरी, तुला ?—"

सरसाहेबांच्या कपाळाला एकदम रागानें आंठ्या पडल्या.

पण ऊर्मिलेचें त्यांच्या चेहऱ्याकडे लक्ष नव्हतें. ती त्यांच्यासाठीं संत्र्याच्या फोडी सोलून तयार करीत होती. ती एकदम अल्लडपणानें उद्गारली—

" काल गुप्ताबाबू सांगत होते, पंचमढीला जाण्यापूर्वीं ना० नायडूंची न् त्यांची......"

" कोणाची ?—"

सरसाहेब कडाडले.

त्याबरोबर ऊर्मिलेच्या हातांतील संत्र्याची फोड गळून पडली; व तो विषय काढण्यांत आणि त्याहिपेक्षां तें नांव उच्चारण्यांत आपण केवढी चूक केली आहे, हें तिच्या तत्क्षणींच लक्षांत आलें.

नवे गृहमंत्री ना० बॅ. नायडू हे सर महादेव यांच्यापेक्षां वीस वर्षांनीं लहान होते; व त्यामुळें त्या दोघांत स्पर्धामूलक तेढ उत्पन्न व्हावयाला खरोखरी कांहीं कारण नव्हतें. सर महादेव यांची ज्या वर्षीं गृहमंत्री म्हणून नेमणूक झाली, त्याच वर्षीं ना. नायडू हे स्वराज्यपक्षातर्फे जबलपूर विभागांतून कौन्सिलांत निवडून आले. डॉ. मुंजे हे तेव्हां स्वराज्यपक्षाचे पुढारी होते; व डॉक्टरसाहेबांचा सरसाहेबांशीं अनेक वर्षांचा खाजगी स्नेह असल्यामुळें त्यांचें धोरण गृहमंत्र्यांना फक्त जरूर तेथें विरोध करण्याचें असे. त्यांच्या या स्नेह-संबंधामुळें अशीहि एक कंडी स्वराज्यपक्षांतील कांहीं जहाल सभासदांनीं उठविली होती कीं, मंत्रिपदाचा स्वीकार करून सरसाहेबांच्या सहकारितेनें प्रांताचा राज्यकारभार आपल्या हातांत घेण्याची मसलत डॉक्टरसाहेबांच्या

मनांत घोळत असल्यामुळेंच ते गृहमंत्र्यांना करावा तसा जोरदार विरोध कौन्सिलांत करीत नाहींत.

बॅ. नायडू हे ती कंडी उठविणारांत प्रमुख होते; व डॉक्टर मुंजे यांच्या या कारस्थानाची कागाळी पं. मोतीलालजींच्या कानांपर्यंतहि त्यांनीं नेऊन पोंचविली. पुढें हिंदुमुसलमानांचा समेट घडवून आणण्यासाठीं पंडितजी नागपूरला आले असतां सर महादेव यांनी त्यांना आपल्याकडे चहाला बोलाविलें. त्या प्रसंगीं स्वराज्यपक्षाच्या धोरणाविषयीं बोलणें चालू असतां पंडितजींनी आपल्या कानांवर आलेल्या या कागाळीची हकीकत सर महादेवांना सांगितली.

तेव्हां सरसाहेब हंसून म्हणाले, " डॉक्टरसाहेबांचा आणि माझा स्नेह लहानपणापासूनचा आहे. मग आपणहि त्यांना आतां चांगले ओळखत असाल, असें मी समजतों. त्यांना ज्या दिवशीं आपल्या धोरणाप्रमाणें चालणें अशक्य होईल, त्या दिवशीं ते सरळ विरोध करायला उभे रहातील. पक्षांत राहून अशा प्रकारचीं कारस्थानें करणार नाहींत—— "

"——महाराष्ट्र ब्राह्मणांना असा शापच आहे, पंडितजी, कीं दोन महाराष्ट्र ब्राह्मण कोणत्याहि कारणामुळें एकत्र आले, तरी इतर लोकांना लगेच कारस्थानाचा संशय येतो ! " डॉ. मुंजे मध्येंच म्हणाले.

" पण माझे हे शब्द आपण लक्षांत ठेवा, पंडितजी ! ज्यांनीं ही कंडी आमच्या विरुद्ध उठविली आणि तिची कागाळी आपल्या कानांपर्यंत नेऊन पोंचविली, ते गृहस्थ मात्र अनुकूल संधि दिसतांच कॉंग्रेस आणि स्वराज्यपक्ष या दोहोंचाहि त्याग करून माझ्या जागेवर येऊन बसण्याचा प्रयत्न केल्याशिवाय रहाणार नाहींत !—"

सर महादेव यांचें हें भाकित अक्षरशः खरें ठरलें. बॅ० नायडू हे स्वराज्य-पक्षांतून लवकरच निघाले; व पुढील निवडणुकींत ' स्वतंत्र राष्ट्रीय ' म्हणून कौन्सिलांत निवडून आले. मात्र कॉंग्रेसपासून त्यांची ज्या प्रमाणांत फारकत होत गेली, त्या प्रमाणांत त्यांचा सर महादेव यांच्याविषयींचा विरोध वाढत गेला.

त्यांच्या या विरोधाचें वर्णन करितांना कौन्सिलांतील राष्ट्रीय पक्षाचे पुढारी श्री. खापर्डे यांनीं एकदां असा मार्मिक टोमणा त्यांना मारला होता कीं,

" माझे मित्र बॅ. नायडू हे आपली मूळची भूमिका सोडून जसजसे कॉंग्रेसमधून दूर जात आहेत, तसतशी त्यांची गृहमंत्रिपदाविषयींची आस्था वाढत चालली असून, सध्यां सर महादेवांकडून होत असलेला त्या पदाचा दुरुपयोग त्यांना जास्त जास्त दुःसह होत चालला आहे ! "

पण या विरोधाबद्दल जों जों बॅ. नायडू यांचा राष्ट्रीय पक्षाच्या सदस्यां-कडून उपहास होत गेला, तों तों त्याची धार जास्तच तीव्र होत गेली; व सर महादेव हे हंगामी गव्हर्नर झाल्यावर त्यांच्या नेमणुकीच्या कायदेशीरपणा-विषयीं शंका व्यक्त करण्यापर्यंत त्यांच्या खुनशीपणाची मजल पोंचली. त्यामुळें सरसाहेबांच्या एरवीं अत्यंत उदार आणि राजकीय पक्षभेदांच्या बाबतींत विस्मरणशील असलेल्या मनांत बॅ. नायडू यांच्याविषयीं कायमचा उबग उत्पन्न झाला; व त्यांचें नांवहि आपल्यासमोर कुणी उच्चारलेलें त्यांना सहन होत नसे.

" हं ! काय सांगत होते गुप्ताबाबू , ऊर्मी ? "

सरसाहेबांनीं तिच्याकडे वळून विचारलें. त्यांचा आवाज आतां नरमला होता; व आपल्याला अप्रिय असलेलें नांव आपल्या लाडक्या मुलीनें उच्चारलें याबद्दल त्यांना प्रथम आलेला राग कमी होऊन त्याची जागा आतां जिज्ञासेनें घेतली होती.

वाचतांना चूक केल्याबद्दल मुलाला दरडावलें असतां तें जसें वर न पाहतां पुन्हा निमुटपणानें वाचण्याचा प्रयत्न करितें, त्याप्रमाणें ऊर्मिला त्यांच्या-कडे न पाहतां अगदीं संथपणानें म्हणाली—

" गुप्ताबाबू सांगत होते, ना॰ नायडू पंचमढीला जाण्यापूर्वीं त्यांची न् गुप्ताबाबूंची भेट झाली असतां, दडपशाही सुरू करण्याच्या बाबतींत आपल्या प्रांताचा नंबर सगळ्यांच्या शेवटीं लागेल, असे उद्गार नव्या गृहमंत्र्यांनीं त्यांच्याजवळ काढले—"

" नव्या गृहमंत्र्यांच्या अंगावरील सफेद खादीला शोभण्यासारखेच उद्गार आहेत त्यांचे हे ! रायपूर, उमरावती, जबलपूर वगैरे ठिकाणीं जी धरपकड आज चालली आहे, ती काय दडपशाही नव्हे ? खरं बोलण्याच्या न् बोलण्या-

प्रमाणं वागण्याच्या कलेंत नव्या गृहमंत्र्यांइतका तरबेज इसम दुसरा सांपडणार नाहीं कुणी !—"

तो विषय थांबविण्याच्या उद्देशानें कांतानें मध्येंच विचारलें, "चहा झाल्याबरोबर लगेच निघणार ?—"

"होय." सर महादेव हातांतील घड्याळाकडे पाहून म्हणाले; व लगेच चहाचा उरलेला घोट घेऊन त्यांनीं चपराशाला आपले कपडे आणण्याची आज्ञा केली.

त्याबरोबर त्या तिथी तिथून उठल्या; व पलिकडच्या बाजूला ठेवलेल्या खुर्च्यांवर बसल्या.

त्यांचे कपडे घालून होत आहेत, तोंच दोन्ही मोटारी कमानीखालीं येऊन उभ्या राहिल्या. त्यांनीं लगेच त्या दोघींना आंत बसण्याची सूचना केली; व किंचित् करड्या आवाजांत ते चपराशाला म्हणाले—

"छोटा साबकू बुला देव जलदी !—"

नंतर आपल्यासमोर उभ्या असलेल्या कांताला ते म्हणाले, "प्रकृतीची काळजी घे नीट आपल्या. दर तीन दिवसांनीं पत्र आलं पाहिजे तुझं आम्हांला ! त्याला शिक्षा झाल्याबरोबर पंचमढीला निघून ये ! मग इथं राहण्याचं कांहीं कारण नाहीं—"

एवढें बोलून ते एकदम थांबले.

ती यावर कांहीं बोलली नाहीं. फक्त तिनें त्यांना वांकून नमस्कार केला.

त्याबरोबर त्यांच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. त्या अश्रूंत केवढा अर्थ भरला होता !

त्यापूर्वीं फक्त एकदांच त्यांच्या डोळ्यांत अश्रु आलेले तिनें पाहिले होते. तिच्या लग्नाच्या वेळीं त्या दोघांना मांडीवर घेऊन जेव्हां त्यांच्या तोंडांत त्यांनीं साखर घातली, तेव्हां त्यांच्या डोळ्यांत अश्रु आले होते. आपल्या अकालीं मरण पावलेल्या धाकट्या भावाचा एकुलता एक मुलगा !—त्याच्या-संबंधींची आपली जबाबदारी आपण उत्तम रीतीनें पार पाडल्याबद्दलच्या समाधानाचे अश्रु होते ते !

त्या अश्रूंची आठवण होतांच तिच्या मनांत विचार आला,—पण प्रियानं त्यांच्याविषयींची आपली जबाबदारी पार पाडली का ?

तो विचार तिच्या मनांत येतो न येतो, तोंच तिच्या कानांवर हांका आल्या—

" ताई, ताई ! कुठं आहेस ग तूं ?——"

तिनें एकदम विस्मयानें मागें वळून पाहिलें. विजू धांवतच तिच्याकडे येत होती.

" हें काय ग, ताई ? संध्याकाळच्या वेळीं एकटच्यानं अंधारांत येऊन बसण्याची ही काय तऱ्हा काढलीस तूं ?——मी सारा बंगला धुंडाळला तुझ्यासाठीं !——"

" बरं, पण या वेळीं इकडे कुठं तूं ? "

" कांहीं नाहीं. अगदीं सहज आलें, पुष्कळ दिवसांत तुझी भेट झाली नाहीं म्हणून !——"

" अगदीं सहज आलीस ना ? विजू, माणसानं आपल्या मनांतलं लपवूं नये, गडे, अशा रीतीनं ! आज उमा आला नव्हता का तुमच्याकडे ? "

" ताई, तूं सुद्धां अशा रीतीनं बोलावंस का !——"

" अग, मी बोललें त्यांत कांहीं वावगं आहे का ? उमा तुमच्याकडे येत नाहीं रोज ?—"

" येतो ना ! ताई ग !——"

" काय, विजू ? " तिला आपल्याजवळ ओढून कांतानें तिच्या केंसांवरून हात फिरवीत म्हटलें. " सांग ना तुझ्या मनांत काय आहे तें अगदीं मोकळेपणानं ! "

" तूं एक काम करशील का माझं ?——"

" कोणतं ग ?——"

" साहेबांनीं बंगलोरला सारी मंडळी घेऊन जायचं ठरवलंय्. पण तो नाहीं म्हणतो. तूं वळवशील का त्याचं मन ?——"

" जया नाहीं म्हणतो ? आणि तें काय म्हणून ? "

" तें कांही विचारूं नकोस ! तो कांहीं कारण सांगत नाहीं न् येण्याचा हट्ट सोडत नाहीं ! साहेब आज इतके कांहीं रागावले कीं, आम्हांला वाटलं मारतात त्याला आतां हंटरनं ! आई उपाशी आहे ग आज सबंध दिवस ! काय करावं ग या जयाला ? ताई, पुरुषांचा हट्ट म्हणजे आपलं बायकांचं मरण—"

ती अगदीं केविलवाण्या डोळ्यांनीं कांताकडे पहात होती.

कांताला वाटलें, आपल्याहि डोळ्यांत अश्रु येतात कीं काय ?

" ताई, तूं तरी सांग त्याला नीट समजावून ! तुझं तो खास ऐकेल. सगळीं माणसं तुझं ऐकतात !—"

" विजू, मी प्रयत्न करून पाहीन. पण तूं म्हणालीस तेंच खरं.—पुरुषांचे हट्ट म्हणजे आपलं बायकांचं मरण ! तूं पाठवून दे त्याला माझ्याकडे—"

" म्हणजे तो म्हणेल तूंच कांहीं तरी चहाड्या केल्यास माझ्या ताईकडे जाऊन ! छे, तसं नको मुळींच ! तूं उमा आल्याबरोबर त्याला पाठवून बोलावून घे जयाला इथं ! मला कीं नाहीं साहेबांची फार भीति वाटते ! ते एखादे वेळीं संतापाच्या भरांत गोळीसुद्धां घालतील जयाला !—"

" वेडी आहेस तूं ! अग, वडील कितीहि रागावले, म्हणून ते काय गोळी घालणार आहेत का स्वतःच्या पोटच्या गोळ्याला ?—"

" नाहीं ग, तुला माहीत नाहीं साहेबांचा संतापी स्वभाव ! मघांशीं ते स्पष्टच म्हणाले जयाला, " तूं जर कबूल झाला नाहींस माझ्याबरोबर बंगळोरला यायला अठ्ठेचाळीस तासांच्या आंत, तर तुझा निकाल लावून मग घरांतून बाहेर पडेन मी ! मला माहीत आहे, मागं राहून तुला कोणते ढंग इथं करायचे आहेत ते !—"

तिनें उच्चारलेलें तें शेवटचें वाक्य ऐकतांच कांताची मुद्रा एकदम गंभीर होऊन तिनें विजूला विचारलें—

" मग जया काय म्हणाला यावर ? "

" तो एक शब्द बोलला नाहीं. त्याचं नेहमीचंच आहे तें. तोंडांतून एक शब्द काढायचा नाहीं, पण ठरवलेलं करायला चुकायचं नाहीं !—"

" का ग, पारडाशिंग्याला तुम्हीं गेलां होतात, तेव्हां जया, चारू, उमा न् त्यांचे ते दुसरे दोस्त यांनीं काय केलं ग तिथें ?—"

" मला माहित नाहीं !—"

विजूनें खालीं मान घालून उत्तर दिलें.

" विजू, तूं हें खरं नाहीं सांगत मला ! "

कांतानें बोलतां बोलतां हनुवटी वर करून तिचें तोंड वर उचललें.

तिचे डोळे पाण्यानें भरले होते.

" बरं, मीं तुला आग्रह करीत नाही कांहा सांगण्याचा. पण विजू, उमावर प्रेम आहे ना खरोखरीच तुझं !—"

" हो. "

" त्याच्याशीं आपलं लग्न व्हावं न् आपला संसार सुखाचा व्हावा असं वाटतं ना तुला ? "

" हो— "

" मग तूं एक वचन त्याच्याकडून घेशील ?—"

" कोणतं ?—"

" जया न् चारु यांच्या नादीं लागून कोणत्याहि भलत्याच फंदांत मी पडणार नाहीं म्हणून !—"

" मी तसं वचन मागितलं होतं, ताई, त्याच्याजवळ पारडाशिंग्याला असतांना—"

" मग दिलंन् त्यानं तें तुला ?—"

" नाहीं. उलट मीच त्याला वचन दिलं, मी तुझ्या आड कधीं येणार नाहीं म्हणून—"

" वेडे पोरी ! काय केलंस हें ?—"

कांतानें दुःखभरानें म्हटलें.

" पण ताई, तूं मला कां दोष देतेस ? प्रियानं कायदेभंगांत सामील होऊं नये असं दद्दांचं न् साहेबांचं निक्षून मत होतं आणि तूं त्याचं मन वळवशील अशी दद्दांना केवढी आशा होती ! पण, त्यानं कायदेभंगांत सामील

व्हायचं ठरवल्यावर तूंच शेवटीं दद्दांकडे जाऊन त्याची तरफदारी केलीस ना ? स्त्रियांचा हा स्वभावच आहे मुळीं कीं, आपल्या प्रियकराचं कृत्य त्यांना मनांतून कितीहि नापसन्त असलं, तरी शेवटीं तें त्या गोड मानून घ्यायला तयार होतात ! द्यूत न खेळण्याबद्दल धर्मराजाच्या परोपरीनें विनवण्या करणारी द्रौपदी अखेर त्याच्याबरोबर वनवासाला जायला तयार झाली ना ?—"

कांता यावर कांहींच बोलली नाहीं. दिवसभर टेनिस खेळण्यांत आणि पियानो वाजविण्यांत कृतकृत्यता मानणाऱ्या या अल्लड पोरीला इतकें शहाणपण आज कोठून आलें, याचें तिला राहून राहून आश्चर्य वाटत होतें.

" ताई, मी जातें बाई आतां ! तूं तर कांहींसुद्धां बोलत नाहींस ! मला कांहीं बाई तुझ्यासारखं अंधारांत बसून विचार करणं आवडत नाहीं ! काळोखांत डोळे फाडून जगाकडे पहाणारं घुबड हें जरी ग्रीक पुराणांत ज्ञानदेवतेचं प्रतीक मानलेलं असलं, तरी आपल्या पुराणांत सुंदर पिसारा उभारून थयथय नाचणारा मोर हाच सरस्वतीचा आवडता पक्षी मानलेला आहे ! पण तूं जयाला खरोखरीच बोलावून समजुतीच्या गोष्टी सांगशील कीं तेंहि विसरून जाशील या काळोखांतल्या समाधींत ?—"

तिनें हंसत हंसत कांताच्या गळ्यांत हात घातला.

" उगाच नाहीं उमाला वेड लागलंय तुझं ! तुझा हा खेळकरपणा जन्मभर असाच कायम रहावा, अशी इच्छा आहे माझी, विजू !—मी खरंच जयाला बोलावून त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न करतें. तूं काळजी करूं नकोस अगदीं—"

बोलतां बोलतां तिनें विजूचे गालगुच्चे घेऊन तिच्या कपाळावरले केंस मागें सारले.

ती जशी धांवत आली होती, तशीच पुन्हां धांवत परत गेली.

सुंदर पांखरांचा थवा किलबिल करीत एखाद्या झाडावर येऊन बसावा आणि कांहीं वेळानें त्या झाडावरून तो उडून गेल्यावर तें जसें पुन्हां स्तब्ध आणि उदास दिसावें, तशी अवस्था झाली ती गेल्यावर कांताच्या मनाची !

पूर्व दिशा उजळल्यामुळें बाहेरचा अंधार आतां कमी होत चालला होता. पण तिच्या मनांतला अंधार मात्र वाढत होता. प्रिया सकाळीं घरा-बाहेर पडल्याला आतां बरोबर बारा तास होत आले होते. पण तो अद्याप घरीं परत आला नव्हता आणि केव्हां येईल याचाहि कांहीं नेम नव्हता. गेले तीन चार दिवस अशी दाट बातमी होती—प्रियानेंच तिला सांगितली होती—कीं, तो लवकरच पकडला जाईल.

त्यामुळें तिचें मन अधिकच त्रस्त झालें होतें. एखादी अनिष्ट गोष्ट घडणार असल्याचें नक्की कळल्यावर ती जर अपेक्षेप्रमाणें चटकन् घडून आली नाहीं, तर मनावर जो बेसुमार ताण पडतो, त्याचा असह्य त्रास सध्यां तिला होत होता. त्यांतच आज सकाळीं दद्दा पंचमढीला गेल्यामुळें आपण आतां अगदीं निराधार झाल्यासारखें तिला वाटत होतें. ते येथें राहिल्यानें प्रियावरील खटला टळत होता, असें नाहीं. पण, ते नागपुरांत आहेत या भावनेमुळें जो एक धीर तिच्या मनाला मिळत होता, तो त्यांच्या जाण्यामुळें सुटून आज तिचें मन पराकाष्ठेचें अस्वस्थ आणि उदास झालें होतें.

विजूच्या येण्यामुळें तिच्या मनाची अस्वस्थता वाढली मात्र. तिच्या मनांत पुनःपुन्हां असा विचार येई कीं, चुलत्यापुतण्यांतील आणि बापलेकां-तील राजकीय मतभेदांमुळें ठाकूर आणि कदम या दोन्ही कुटुंबांची वाताहात होणार का ? आणि ती थांबविण्याचा कांहींच का उपाय नाहीं ?

त्या विचाराची टोंचणी आणि तो एकांत तिला आतां दुःसह झाला. तिला वाटलें, आपण जर या वेळीं दिलरुबा वाजविला, तर आपल्या मनाचा उदासपणा कमी होईल.

चतुर्थीचा चंद्र आतां क्षितिजावर आला होता. त्याचें तें वरची बाजू कापून टाकल्यासारखें दिसणारें अपुरें बिंब कोरड्या काळसर ढगांच्या शकलांतून वाट काढीत होतें. त्याच्या प्रकाशामुळें अंधार जरी बहुतेक नाहींसा झाला होता, तरी वाऱ्यानें डुलणाऱ्या झाडांच्या सांवल्यांचे मनोहर खेळ सुरू झाले होते.

त्या चंद्रप्रकाशामुळें हवेंतील काळोख आणि उष्मा कमी झाल्याकारणानेंच

कीं काय तिच्या मनाची उदासीनताहि कमी झाली. ती उठली आणि समोरच्या फुलझाडांच्या गर्द ताटव्यापाशीं गेली--

चांदण्याचा शुभ्र प्रकाश त्या ताटव्यावर पडला होता---

आणि त्या प्रकाशांत अर्धवट उमललेल्या कळ्या हळुवारपणानें हंसत होत्या.---त्यांचें तें लाजरें मधुरहास्य पाहून तिच्या मनाला कसलीशी सूक्ष्म वेदना झाली आणि तिच्या हृदयांतल्या अबोध भावना गाऊं लागल्या--

*या वेळीं माझ्या ये रमणा*
*शांतीची द्वाहि फिरे सजणा*
*कानोसा मी घेतां थकलें*
*तुझीं न ऐकूं येति पाउलें*
*कां मग मजला वेड लाविलें ?*
*किति विलंब करिशिल आगमना ?*

तिच्या मुखांतून गाण्याचे सूर निघत होते आणि डोळ्यांतून अश्रु ठिबकत होते.

त्या गानसंमूढ अवस्थेंत ती असतांनाच प्रियदर्शनच्या सुखोष्ण श्वासाचा स्पर्श आपल्या मानेला होत आहे असें तिला वाटलें--

--आणि तिनें एकदम मागें वळून पाहिलें.

--त्याबरोबर त्याच्या आतुर ओठांचा स्पर्श तिच्या कपाळाला झाला.

त्यानें तिच्या खांद्यावर हात ठवले आणि तिच्या आर्त दृष्टींत आपली दृष्टि मिसळून तो म्हणाला--

" मी सारा बंगला पालथा घातला तुझ्यासाठीं न् मग तुझा आवाज ऐकून शेवटीं इथं आलों. ही काय बागेंत येऊन बसण्याची वेळ आहे, कांता?"

" मग सारा दिवस घरांत एकट्यानं बसून तरी काय करूं मी ?---"

त्या प्रश्नाला काय उत्तर द्यावें हें त्याला सुचेना.

म्हणून त्यानें विचारलें, " सकाळीं दद्दा काय बोललं तुझ्याशीं हें तूं सांगितलं नाहींस मला अद्याप---"

" केव्हां सांगणार बरं ? मी त्यांच्याकडून परत आलें, त्या वेळीं तुम्ही घरीं होतात का ? तुम्ही नवाला जे घरांतून बाहेर पडलांत, ते आतां बारा तास झाल्यानंतर पुन्हा दृष्टीस पडतां आहांत माझ्या !—तुम्हांला शिक्षा झाल्यावर पंचमढीला रहायला बोलावलंय दद्दांनीं मला– "

" मग तूं कबूल केलंस जायचं ? "

" मी तुमच्या मागोमाग सत्याग्रहांत सामील होऊन तुरुंगांत येण्याचा विचार करतें आहे !– "

" भलतंच कांहीं तरी !—"

" भलतंच काय आहे त्यांत ?– "

" अशा स्थितींत बायका कुठं तुरुंगांत जातात का ?–"

" अशा स्थितींत आपल्या बायकोला टाकून पुरुष कुठं तुरुंगांत जातात का ?—– "

" दद्दांचं छत्र डोक्यावर असल्यामुळंच मी तुला सोडून तुरुंगांत जायचा धीर केला आहे, कांता !– "

" आज दद्दांच्या डोळ्यांतून टिपं पडलीं मला निरोप देतांना– "

" त्या अश्रूंबद्दल वाईट वाटण्याचं कारण नाहीं, कांता ! त्यांच्यासारख्या मानधन आणि कर्तबगार पुरुषांच्या डोळ्यांत येणारे अश्रु हे त्यांच्या कर्तृत्वाचें युग संपल्याचे निदर्शक असतात !–"

# १७

## कहने के तो मैं भूल गया

विजयेनें उठून उशालगतच्या टेबलावर ठेवलेल्या घड्याळाचा गजर बंद केला.

चारच्या ठोक्याबरोबर झालेल्या त्या खणखणाटानें तिला जागें केलें, पण अंथरुणावरून उठण्याची इच्छा मात्र तिला होईना. गजर बंद केल्यावर पुन्हा अंथरुणावर पडण्यापूर्वीं तिनें पायथ्याशीं असलेल्या खिडकींतून बाहेर पाहिलें. उन्हाळ्यांतील तिरपें ऊन्ह समोरच्या शेत जमिनीवर पडलें होतें; व त्याच्या प्रकाशांत झाडांच्या हिरव्या रंगांतल्या निरनिराळ्या छटा खुलून दिसत होत्या. त्या उन्हानें तापलेल्या वातावरणांतील लहरींतून क्षितिजाचा नीलिमा आणि त्याच्या कडेनें पसरलेल्या झाडांची हरित द्युति यांची झालेली सरमिसळ तिच्या आळसावलेल्या डोळ्यांना सुखकर वाटली. तिनें पुन्हां डोळे मिटले; व उशाला हात घेऊन ती अंथरुणावर पडली.

पण तिला जसें उठावेंसें वाटत नव्हतें, तसेंच आतां निजावेंसेंहि वाटेना.

झोंपेचें असें असतें कीं, एकदां ती मोडली, म्हणजे तिची तंद्री जरी डोळ्यांवर शिल्लक राहून सुस्तावल्यासारखें वाटलें, तरी पुन्हा कांहीं मग पहिल्यासारखी स्वस्थ झोंप लागत नाहीं. त्यांतून विजया तर अर्धवट पाहिलेल्या स्वप्नांतून जागी झाली होती. तें स्वप्न तिला आतां चांगलेंसें आठवत नव्हतें. पण, अर्धवट उमललेल्या फुलाच्या सुवासाप्रमाणें तिचें मन मात्र त्या स्वप्नाच्या माधुरीनें कोंदून गेलें होतें.

त्यामुळें तिला झोंप येईना, पण अंथरुणावरून उठावेंसेंहि वाटेना. शेवटीं अंगावरली चादर तिनें पायानें दूर भिरकावली; व चटकन् उठून उभी होऊन उशा-लगतच्या टेबलावरील आरशांत पाहिलें.

तेव्हां तिला दिसून आलें कीं, आपले केंस पूर्णपणें विसकटून गेले आहेत.

तिनें उशीवर गिरदी ठेवली; व तिच्यावर हनुवटी टेकून आरशात पहात निजल्या निजल्याच वेणी उकलावयाला प्रारंभ केला.

वेणी उकलीत असतांनाच तिला काय वाटलें कोण जाणें! ती एकदम उठली; निळ्या सुरईतील पाणी तिनें दोन्ही हातांनी आपल्या तोंडावर यथेच्छ शिडकावलें, व टुवालानें तोंड पुसून ती आरशासमोर येऊन उभी राहिली.

तोंच तिला आपल्या पायाला गुदगुल्या झाल्यासारख्या वाटल्या.—

—तिचा आवडता ससा तिच्या पायाला तोंड घाशात होता.

तिनें त्याला उचलला; त्याच्या तोंडाला आपलें तोंड भिडविलें; व त्याला टेबलावर ठेवला.

नंतर पुन्हा आपली वेणी उकलावयाला सुरवात केली.

तिच्या अंगांत शुभ्र मलमलीचा सैल बनियन होता; व त्याच प्रकारचा सुतना तिनें पेहरला होता. त्या तलम बनियनमधून तिचा उरोभाग स्पष्ट दिसत होता. वेणी उकलतां उकलतां तिनें बनियनची बटनें काढलीं; व घामानें ओला-वलेल्या आपल्या उरोभागावर आणि मानेवर पावडरीचा हपका दिला.

वेणी पूर्ण उकलून होतांच तिनें कंगवा हातांत घेतला.

आणि तो केसांतून फिरवीत असतानाच ती गाऊं लागली.—

*महरूमे तरब है दिलें दिलगीर अभीतक*
*बाकी है तेरी इष्ककी तासीर अभीतक*

तिचे ते स्नेहशून्य, सळसळणारे, सोनेरी छटा असलेले पिंगट केंस सशाच्या अंगावर पडले होते. गजलाचा चरण म्हणतां म्हणतां तिनें केसांतून कंगवा फिरवीत फिरवीत ते झटकन आपल्या हातावर घेतले.

त्याबरोबर त्या सशानें आपल्या मागल्या पायांवर उभे राहून तिच्या गालाला आपलें तोंड भिडविलें.

तेव्हां ती हंसली आणि त्याच्या तोंडावर हळूच चापट मारून उद्गारली,—

" तुला सुद्धां कळतो का रे या गझलाचा अर्थ ?—"

आणि ती केस विंचरतां विंचरतां पुन्हा गाऊं लागली—

**कहने के तो मैं भूल गया हो मगर ऐ यार**
**है खानए दिलमें तेरी तस्वीर अभीतक**

ती तो शेवटचा चरण पूर्ण करते न करते, तोंच दार ढकललें गेलें—

—आणि उमा आंत आला.

त्याच्या त्या अचानक आंत येण्यानें तिची विलक्षण धांदल उडाली. तिनें हातावर घेतलेले केंस एकदम मागें भिरकावले; घाईघाईनं बनियनचीं बटणं लावलीं; किंचित् खालीं घसरलेला सुतना वर केला; व रागानें त्याला म्हटलें—

" तूं कां आलास रे मला आधीं विचारल्याशिवाय आंत ?—"

" तूं माझी आठवण केलीस म्हणून आलों मी !—"

" केव्हां केली रे आठवण ?—"

" आतांच तूं नाहीं म्हणालीस ?—"

**कहने के तो मैं भूल गया हो मगर ऐ यार**
**है खानए दिलमें तेरी तसबीर अभीतक**

" वात्रट कुठला ! त्या गजलाचा न् तुझा काहीं अर्थाअर्थी संबंध ? काल साहेबांनीं माझ्याकडून हसरत मोहानीचा हा गजल ऑर्गनवर बसवून घेतला. म्हणून तो गुणगुणत होतें मी स्वतःशीं !—"

" मला वाटलं, तूं मलाच आठवून म्हणत आहेस तो !—"

" आणखी नाहीं कांहीं वाटलं का ?—"

" आणखी पुष्कळच वाटलं तुला पाहिल्यावर !—"

" बरं बरं !—पण उमा, माझ्या मनांत की नाहीं एक छान कल्पना आली आहे आज—"

"कसली ग ?—"

"तूं वचन दे प्रथम मला मी तिला संमति देईन म्हणून—"

"छट् ! तूं भलभलतीं वचनं मागत असतेस अलिकडे, विजू !—"

"मग बाहेर हो आधीं खोलींतून माझ्या !—"

"होत नाहीं ! तूं माझी आठवण काढलीस म्हणून आलोंय मी !—"

"माझं अडलंय तुझी आठवण काढायला ! पहा आतां बंगलोरला गेल्या-वर एक ओळ तरी तुला कधीं लिहिते आहे का ?—"

"ठरलं तुमचं बंगलोरला जायचं नक्की ? जयानं कबूल केलं तुमच्या-बरोबर यायचं ?—"

"हो, ताईनं वळवलं अखेर मन त्याचं !—मी अगदीं ठरवून टाकलंय तूं जर माझं ऐकलं नाहींस, तर तुला एक चिठोरंसुद्धां पाठवायचं नाहीं बंगलोरहून."

आणि त्याच्याकडे पाठ वळवून तिनें पुन्हा केंस विंचरावयाला आणि गजल म्हणावयाला सुरवात केली.

**कहने के तो मैं भूल गया हो........**

तो शीळ घालून त्या गजलाला साथ देत देत तिच्या मागें येऊन उभा राहिला.

आणि आपल्या हातानें घट्ट लोटून त्यानें तिला जवळ घेण्याचा प्रयत्न केला.

त्याबरोबर झटकन् त्याचा हात झिडकारून ती म्हणाली, "तुला वचन द्यायचं नाहीं ना मला ? मग येऊं नकोस जवळ माझ्या !—"

"पण तुझी कल्पना काय आहे एवढी तें तर ऐकूं या आधीं !—"

"माझी कल्पना अशी आहे कीं, तूं उद्यां आमच्याबरोबर बंगलोरला चलावंस—"

"विजू, तूं शुद्धीवर आहेस का ? ताईला हल्लींच्या स्थितींत एकटी इथं टाकून मी बंगलोरला कसा येऊं तुझ्याबरोबर ?—"

"खरंच ! माझ्या लक्षांत नाहीं आलं !—"

"खरोखरीच निघणार तुम्ही उद्यां ? मला वाटलं, प्रियाच्या प्रश्नाचा निकाल लागेपर्यंत जाऊं नये काकांनीं इथून ! आतां दहा सुद्धां नाहींत इथ—"

"मी म्हटलं तसं रात्रीं साहेबांना ! तेव्हां ते म्हणाले, "प्रियाला अटक झालेली आपल्या डोळ्यांनीं पहावी अशी इच्छा नाहीं माझी ! त्यांतून तो जर बचाव देणार असता, तर इथं राहण्यांत कांहीं स्वारस्य होतं ! पण तो मुकाट्यानं तुरुगांत जाणार ! मग करायचंय काय इथं थांबून आपण ?" त्यांचं हें म्हणणं बरोबर नाहीं वाटत तुला ?—"

"बरोबर कसं समजतेस तूं ? प्रियानं जरी बचाव दिला नाहीं, तरी अशा अनेक गोष्टी आहेत कीं, ज्यांत काकांची मदत होऊं शकेल. उद्यां प्रिया पकडला जायचा न् ताई आणि मी यांच्याशिवाय कोणीहि त्या प्रसगीं इथं नसायचं;—बरं दिसतं कां हें तुला तरी ? आणि तूं पाहिलंस का, ताई आतांशा किती खगाब झाली आहे ?—"

"हो. मला त्या मागच्या तिच्या ऑपरेशनची आठवण झाली, म्हणजे भीति वाटते बघ !"

"आणि नेमका तोच महिना चालू आहे सध्यां तिला !—"

"काल की नाहीं तिनं मला तुझ्याबद्दल विचारलन—"

"काय विचारलंन ?—"

"विशेष कांहीं नाहीं. तिचं म्हणणं असं कीं, तूं जयाच्या नादीं लागूं नयेस—"

"तिच्या जिवाला जी विवंचना आहे, ती खरोखरी माझ्याबद्दल नाहीं; तर प्रियाबद्दल आहे. तो जर या चळवळींत पडला नसता, तर तिला वाटली नसती एवढी काळजी माझ्याविषयीं—"

"असं कां म्हणतोस रे ? तिचं प्रियाइतकेंच तुझ्यावरहि प्रेम आहे, उमा !—"

"कळत नाहीं तुला कांहीं अजून, विजू ! आमच्याकडे एक बंगाली योगी आला होता मागें. तो म्हणत असे, स्त्रियांची प्रीति ही अधोगामी असते. पित्याकडून पतीकडे, पतीकडून पुत्राकडे आणि पुत्राकडून पौत्राकडे अशी ती

बद्लत, बद्लत खालीं खालीं जाते; न् तिच्या या अधोगामित्वामुळेंच मानव-जातीचं संगोपन चांगल्या रीतीनं होतं ! तुला अजून नवऱ्याच्या प्रेमाची गोडी कळली नाहीं म्हणून !—"

" तुझ्या आपल्या कांहीं तरीच कल्पना ! बाकी ताईची आपल्या लग्नाला संमति आहे, उमा !—"

" कशावरून ? तिचा तर ऊर्मीकडे फार ओढा आहे—"

" पण आपलं दोघांचं प्रेम लक्षांत आल्यामुळं कदाचित् मन बद्ललं असेल तिचं—"

" पण विजू, आपलं प्रेम सफल होईल का ग कधीं ? "

" कां रे शंका येते अशी भलतीच तुझ्या मनांत ?—"

ती एकदम जवळ जाऊन त्याच्या गळ्यांत हात घालून म्हणाली.

" कुणाला ठाऊक कां येते ती ! पण, असं वाटतं खरं कीं आपलं हें प्रेम कांहीं सफल—"

" मी बोलूं देणार नाहीं तुला ते शब्द ! मी निश्चय केलाय तसलं कांहीं ऐकायचं नाहीं म्हणून !—"

तिनें त्याच्या तोंडावर हात ठेवून म्हटलें.

तो हात त्यानें बाजूला केला आणि आपले ओठ तिच्या ओठांजवळ नेले—

तोंच दार उघडलें गेलें आणि जया आंत येतां येतां म्हणाला—

" उमा, अरे प्रियाला अटक झाली ना ?—"

" केव्हां ?—"

उमा झटकन तिच्यापासून दूर होऊन म्हणाला.

" आतां इतक्यांत. अभ्यंकरांच्या बंगल्यावरच अटक झाली त्याला. मी युनिव्हर्सिटी लायब्ररींतून परत येत होतों, तों वाटेंत गर्दी दिसली म्हणून आंत घुसलों.—तोंच मोरूभाऊंनीं मला हांक मारून सांगितलं—"

" ताईला कळलं असेल ?—"

" बहुधा नसावं. मोरूभाऊंनीं पटवर्धनांना किंवा दातारांना पाठवून मुद्दाम कळवलं असलं, तर कोण जाणें ! पण आपण जाऊं या ना तुमच्या घरीं ?–"

" मी नाहीं येत तुमच्याबरोबर ! तूं विजूला न् माला घेऊन जा–"

त्याचे डोळे पाण्यानें भरून आले.

" असं कसं करून चालेल, उमा ? तूं नको का ताईजवळ असायला या वेळीं ? दद्दा इथं नाहींत. ती बिचारी एकटी काय करील ?–"

" काकांना कळवलंस तूं ?–"

" नाहीं. ते घरीं कुठं आहेत ! मी चपराशाजवळ चिठ्ठी लिहून दिली आहे त्यांना आल्याबरोबर देण्यासाठीं ! पण आम्ही कोणीहि गेलों, तरी तुझ्या जाण्याची गोष्ट निराळी आहे, उमा ! चल तूं–"

" नाहीं. मी नाहीं येणार. तुम्ही दोघं जा व ही बातमी सांगा तिला, तोंपर्यंत येतों मी ! मी सांगणार नाहीं ही बातमी माझ्या तोंडानं तिला–"

त्याच्या डोळ्यांतील अश्रु गालांवर आले.

त्याच्याशीं जास्त बोलून कांहीं उपयोग होणार नाहीं, हें जयाच्या लक्षांत आलें. म्हणून तो विजूला घेऊन खालीं आला. त्यानें आईलाहि आपल्याबरोबर घेतलें; व तीं तिघें व्हरांड्यांत आलीं.

तोंच यादवराव पायऱ्या चढून वर आले.

त्यांचा चेहरा घामानें डबडबला होता.

त्या तिघांना समोर पाहून ते घुटमळले. पण लगेच म्हणाले, " काय रे, प्रियाला पकडल्याचं कळलं का तुम्हांला ?–"

" हो. आम्ही ताईकडेच चाललों आहों. आपण येताहांत ना ?–"

" नाहीं, मी आधीं कोतवालींत जाऊन सगळी चौकशी करतों; दद्दांना तार पाठवतों; न् मग ताईकडे येतों. तुम्ही हलूं नका तिच्याजवळून. ती जर कबूल असेल, तर इथंच घेऊन या तिला. उमा असेलच बहुतेक घरीं–"

" नाहीं. तो वर आहे विजूच्या खोलींत.–तो येत नाहीं म्हणतो घरीं ! इतक्यांत !"

" वेडा मुलगा ! असं करून कुठं चालतंय का ? ठीक आहे. नसेल येत तर राहूं दे. त्यालाहि जपलं पाहिजे आपल्याला. मी त्याला घेऊन जाईन माझ्याबरोबर कोतवालींत—"

ते कपाळाला आलेला घाम पुशीत जयाला म्हणाले; व वऱ्हांड्यांतील खुर्चीवर बसून त्यांनीं चपराशाला गाडी काढावयाला सांगितली.

ती बातमी ऐकल्यापासून त्यांच्या मनांत एकच विचार वारंवार येत होता,—दद्दांच्या मनावर या बातमीचा काय परिणाम होईल ? प्रिया पकडला जाणार याबद्दल त्यांची खात्री होती, हें खरें. पण तशी खात्री असणें निराळें आणि प्रत्यक्ष तो पकडला जाणें निराळें ! प्रियाच्या या बाबतींतील वर्तनाचा विचार दद्दा सबंध घराण्याच्या दृष्टीनें करीत असत, याची त्यांना जाणीव होती; व त्यामुळेंच त्यांचें मन ती बातमी ऐकल्यापासून चिंताग्रस्त झाल होतें. एकदां त्यांना वाटे, अपेक्षेप्रमाणें सारा प्रकार घडल्यामुळें दद्दा अगदीं शांत मनानें आपले व्यवहार करतील. पण, पुन्हा वाटे, प्रियाला जर बाजवीपेक्षां कडक शिक्षा झाली, तर त्याचा परिणाम त्यांच्या मनावर काय होईल ? ना. नायडूचे आणि त्यांचे संबंध लक्षांत घेतां असल्या कोणत्याहि घटनेमुळें त्यांचें मन क्षुब्ध होणें अगदीं स्वाभाविक आहे. त्या मनःक्षोभाचा परिणाम त्यांच्या प्रकृतीवर काय होईल ?

तो प्रश्न त्यांच्या मनांत उद्भवला आणि त्यांच्या अंगावर एकदम शहारे आले. तेव्हां, तो प्रश्न मनांतून घालवून टाकण्यासाठीं त्यांनीं चपराशाला हांक मारून, गाडी बाहेर काढावयाला इतका उशीर कां झाला, हें पहावयाला सांगितलें.

तोंच बॅ. गुप्ता यांची मोटार बंगल्याच्या कमानीखालीं येऊन उभी राहिली; व तें दांपत्य पायऱ्या चढून वर आलें.

बॅ. गुप्ता डोक्यावरील टोपी काढून उद्गारले, " काय, तुम्हांला कळलीच असेल बातमी ?—आम्ही कांताला भेटण्यासाठीं निघालों. पण म्हटलं वाटेंत तुम्ही घरीं असल्यास पाहून घ्यावं. चलतां आमच्याबरोबर ?—"

" नाहीं. मी कोतवालींतून जाऊन चौकशी करून येतों आधीं. दद्दांना कळवलं पाहिजे तार करून सारं कांहीं–"

" हो. मला बातमी ऐकल्यापासून सारखं वाटतंय, त्यांच्या मनावर काय परिणाम होईल या प्रकाराचा ?–"

हिमगौरीनें भुंवया आकुंचित करून म्हटलें.

" अं: ! ते आनंदानं तोंड देतील या प्रसंगाला ! मला शंका नाहीं त्याबद्दल ! जें संकट अपेक्षित असतें, त्याच्या परिणामाची तीव्रता बोथट होऊन जाते अगदीं !–तुला उगाच काळजी वाटते, हिमा !–"

" त्यांची काळजी अगदीं बरोबर आहे, गुप्तासाहेब ! प्रियाला अटक झाली यांत कांहीं विशेष नाहीं. पण त्याला जर वाजवीपेक्षां कडक शिक्षा ठोठावण्यांत आली, तर दद्दांच्या मनावर तिचा काय परिणाम होईल हें सांगणं कठीण आहे. "

" पण कडक शिक्षा होईल असं वाटायला कारण ? "

" कारण अगदीं सरळ आणि सबळ आहे, हिमा ! नागपुरांनला हा अशा प्रकारचा पहिलाच खटला आहे. तेव्हां चळवळींत पडणाऱ्या लोकांना धडा मिळावा न् दहशत बसावी अशा दृष्टीनंच शिक्षा देण्यांत येईल बहुधा प्रियाला ! साऱ्या प्रांतांत किंबहुना साऱ्या हिंदुस्थानांत खळबळ उडेल या बातमीमुळें !–सर महादेवांच्या पुतण्याला सत्याग्रहामुळें अटक !–आठच दिवसांपूर्वी ना. नायडू म्हणाले होते मला,–आरंभीं आरंभीं तरी सरकारला कांहीं शिक्षा जरब बसण्यासारख्याच द्याव्या लागतील. "

" पण ते तर दडपशाही इतक्यांत सुरू होणार नाहीं असं म्हणाले होते ना तुमच्याजवळ ? "

" तें खरंच आहे. अग, एका कोकिळाच्या कूजनानं वसंत ऋतु सुरू झाला असं ज्याप्रमाणं म्हणतां येत नाहीं, तशीच एका माणसाच्या अटकेनं दडपशाही सुरू झाली असं म्हणतां येणार नाहीं. प्रियाबरोबर जर आणखी पांच सहा माणसांना अटक झाली असती, तर मग म्हणतां आलं असतं दडपशाहीला तोंड लागलं म्हणून !—"

" अहो, एवढ्या मोठ्या मोहऱ्याला पकडल्यावर आतां दडपशाहीला काय शिंगं असतात आणखी ?—मला सारखी काळजी वाटते दद्दांच्या मनावर काय परिणाम होईल याची !—"

" हें पहा, तुला पचमढीला जायचं असलं तर आज आतांच चालती हो ! उगाच भलतींच निमित्तं कशाला शोधून काढतेस ?—मग परवांच सरसाहेबां-बरोबर कां नाहीं गेलीस पचमढीला प्रियंवदाबाईप्रमाणं ? "

बॅ. गुप्ता यांच्या भाषणांत उमटलेलें तें गृहच्छिद्र बघण्याची यादव-रावांना इच्छा नव्हती. म्हणून ते बॅ. गुप्तांना म्हणाले, " मग तुम्हीं जाता आहांत ना दोघं कांताला भेटायला ?—"

" हो तर !—पण मला कीं नाहीं सुचत नाहीं, काय जाऊन तिच्याशीं बोलावं हें !—"

" त्यांत एवढं कठीण काय आहे, हिमा ? तिला सांग, प्रियाला शिक्षा झाल्याबरोबर आपण दोघी पचमढीला जाऊं सरसाहेबांच्या प्रकृतीची काळजी घेण्यासाठीं !—"

" आणि मी इथून टळल्यावर तुम्ही न् राधामोहन सदरमधल्या अँग्लो-इंडियन पोरींना घेऊन रात्रभर धुमाकूळ घाला ! गोरेवाड्याचा बंगला आहेच शृंगारून ठेवलेला तुमच्यासाठीं ! "

" पण राधामोहन इथ आहे कां तरी ? उगाच कां कांहीं तरी बोलतेस ? "

" तुम्हीं कसं तोंडाला येईल तें बोलतां ? राधामोहन आज इथं नसला म्हणून काय झालं ? येणारच तो दर शनिवारच्या शनिवारीं नेहमीप्रमाणं ! त्याला कुठं चैन पडायचंय पचमढीला ?—"

" बरं, पण तुम्हीं आतां जा कांताकडे ! मी चाललों कोतवालींत.—"

आपली गाडी आलेली पहातांच त्या संभाषणाला कंटाळलेले यादवराव उठतां उठतां म्हणाले.

तें जोडपेंहि लगेच उठून मोटारींत जाऊन बसलें.

त्यांच्या मागोमाग यादवराव स्वतः आपल्या मोटारींत जाऊन बसणार, तोंच त्यांना वर उमा एकटाच असल्याची आठवण झाली.

त्याबरोबर त्यांनीं चपराशाला वर जाऊन त्याला ताबडतोब खालीं पाठवून देण्याविषयीं सांगितलें.

आणि ते पुन्हा खुर्चीवर येऊन बसले.

तेव्हां त्या दांपत्याच्या संभाषणाची आठवण होऊन त्यांच्या मनांत असा विचार आला, किती विचित्र नवराबायको आहेत हीं! कांताचा समाचार घ्याव-याला म्हणून बाहेर काय पडतात आणि गिऱ्हाइकासमोर एकमेकांचीं उणीं दुणीं काय काढतात! अँग्लो-इंडियन पोरींसंबंधीं जो टोमणा हिमगौरीनें बॅ. गुप्तांना मारला होता, त्यावरून त्यांना दोन वर्षांपूर्वीं घडलेल्या एका चमत्कारिक प्रसंगाचें स्मरण झालें. त्या दिवशीं रात्रीं राधामोहन आणि गुप्ता हे डान्सिंग हॉलमधून दोघां पोरींना बरोबर घेऊन बाहेर पडले आणि त्यांनीं दारूच्या धुंदीमध्यें रस्त्यांत एका पानवाल्याच्या ठेल्यासमोर गडबड केली. तेव्हां पोलिसांनीं मोठ्या प्रयासानें त्यांना पकडून ठाण्यावर नेलें. तिथें त्यांचीं नांवें विचारलीं असतां बॅ. गुप्तांनीं जेव्हां शिवीगाळ करीत आपलें आणि राधाचें नांव त्या सब–इन्स्पेक्टरला सांगितलें, तेव्हां तो चपापला; व एवढ्या अपरात्रीं त्यानें आपल्याला फोन करून या बड्या मेहमानांचा कसा इंतजाम करावयाचा याची चौकशी केली. त्यावर आपण त्यांना बंदोबस्तानें तावडतोब घरीं पोंचविण्याची व्यवस्था करण्याविषयीं त्या सब इन्स्पेक्टरला कळविलें.

हा प्रसंग त्यांना आठवला आणि त्यांच्या मनांत अशी कल्पना आली, आपण राधा आणि गुप्ता यांना त्या वेळीं जसें सोडविलें, तसें पिंगाला आपल्याला आज कां सोडवितां येऊं नये? कायद्याचें उल्लंघन त्या बाबतींत जसें झालें होतें, तसेंच तें याहि बाबतींत झालें आहे. तिथें आपण दाबादाबी करूं शकलों, पण इथें मात्र......

हा चमत्कारिक विचार त्यांच्या मनांत येत आहे, तोंच उमा त्यांच्या-समोर येऊन उभा राहिला.

त्याबरोबर ते त्याच्या पाठीवरून हात फिरवून हिंदींत म्हणाले, "बेटा, असं धीर सोडून कसं चालेल! चल, आपण कोतवालींत जाऊं या—"

मोटार शहरांतून येत असतां रस्त्यांत जागोजाग लोकांचे थवे चर्चा करीत उभे असलेले त्यांच्या दृष्टीस पडले. पूनमचंदजींच्या दुकानावर लावलेल्या फळ्यावर प्रियाला पकडल्याची खडूनें लिहिलेली बातमी त्यांना दिसली; व दुकानांत आणि बाहेर शंभर दीडशें माणसेंहि त्या बातमीसंबंधीं मोठमोठ्यानें बोलत उभीं होतीं.

त्या गर्दीतून वाट काढून ते पुढें आले, तों कोतवालीसमोरहि माणसांचा मोठा जमाव त्यांच्या दृष्टीस पडला.

त्यांची मोटार गर्दीतून वाट काढीत कोतवालीच्या आवारांत शिरत असतां लोकांनीं त्यांचें नांव घेऊन उच्चारलेले दुःशब्द त्यांच्या कानांवर पडले; व त्यांच्या आधींच दुखावलेल्या मनाला डागण्या दिल्यासारख्या वेदना झाल्या.

मोटार थांबतांच एका शिपायानें धांवत पुढें येऊन दार उघडलें. तेव्हां उमाला आंत बसावयाला सांगून ते एकटेच खालीं उतरले.

सिटीसाहेबांच्या अभिवंदनाचा स्वीकार करून त्यांनीं हळूच विचारलें,

"केव्हां नेलं सेंट्रल जेलमध्यें ?—"

"लगेच ! खटला उद्यां अकराला सुरू होईल—"

"तुमचा अंदाज काय आहे ?"

"हा प्रश्न आपण मला विचारतां ?—"

"हो. मी सध्यां रजेवर आहे ना ?—"

"रजेवर असलां म्हणून काय झालं ? माझ्यापेक्षां आपली माहिती केव्हांहि गहिरी रहाणार ! माझा अंदाज असा आहे कीं, शिक्षा फार कडक—*Exemplary*—होईल !—"

ते शब्द कानांवर पडतांच यादवरावांनीं टेबलाचा आधार घेतला.

# १८

## कृपाछत्र कोसळलें

जयसिंग 'ठाकूरभवना'च्या आवारांत शिरला, त्या वेळीं बरेच लोक त्याला तेथें उभे असलेले दिसले.

कांता व्हरांड्यांतील खुर्चीवर बसली होती; व अभ्यंकर आणि खरे यांच्याकडील मंडळींशीं बोलत होती.

जयसिंग आपल्या आईसह पायऱ्या चढून वर येतांच ती उठून उभी राहिली; व पुढें येऊन त्याच्या आईला तिनें अदबीनें खुर्चीवर बसविलें.

" प्रियाला अटक झाल्याचं तुला केव्हां कळलं, ताई ?" जयानें विचारलें.

" इथंच आले होते पहिल्यांदा वॉरंट घेऊन ! मीच पाठविले त्यांना मोरूभाऊंकडे ! " —

तिनें हंसतमुखानें उत्तर दिलें.

" साहेब कोतवालींत गेले आहेत चौकशी करायला न् ते बहुधा दद्दांना तार करूनच येतील इथं "—

" हो. त्यांना प्रत्येक गोष्ट वेळेवर कळवणं जरूर आहे—"

ते शब्द उच्चारतांना तिच्या चेहऱ्यावर उमटलेली विषादाची सूक्ष्म छटा जयाच्या नजरेंतून निसटली नाहीं.

पण, त्याला एवढेंच वाटलें कीं, या पहिल्या आघाताला तरी तिनें हिंमतीनें तोंड दिलें आहे; व त्याच्या मनांत असा विचार आला कीं, तिच्या प्रकृतेविषयीं जी धास्ती उमा अलीकडे वारंवार प्रकट करीत असे, त्या धास्तींत प्रेममूलक अतिशयोक्तीचा भागच अधिक आहे.

हा विचार त्याच्या मनांत येत आहे, तोंच बॅ. गुप्ता यांची मोटार कमानीखाली येऊन उभी राहिली; व तिच्यांतून जवळ जवळ उडी टाकूनच वर आलेल्या हिमगौरीनें आपल्या स्वागतार्थ उठून पुढें आलेल्या कांताचे दोन्ही हात घट्ट धरले.

क्षणार्ध त्या दोघी एकमेकींकडे पहात स्तब्ध उभ्या होत्या.

तोंच बॅ. गुप्ता म्हणाले, "यादवरावदद्दांना तार करणार आहेत सारी चौकशी करून. एकंदरींत आपल्या अपेक्षेप्रमाणेच घडलं सारं—"

"हो. जयानं आतांच सांगितलं तसं मला—"

"त्यांची तार मिळाल्यावर दद्दा कदाचित् येतीलहि इथं!—त्यांच्यावर काय परिणाम होईल कोण जाणें या बातमीचा!—"

हिमगौरीनें रुमालानें डोळे पुशीत म्हटलें.

"त्यांनीं येतां कामा नये आणि येऊन कांहीं फायदाहि नाहीं! मला वाटतं, उद्यां दुपारपर्यंत निकाल लागेल सगळ्या गोष्टींचा! ते इथं आल्यानं उगाच त्यांना मनस्ताप मात्र व्हायचा—"

"होय. तुझं म्हणणं बरोबर आहे, कांता! पण ते स्वतः नाहीं आले तरी राधाला पाठवितील तूं इथं एकटी आहेस—"

"एकटी कशानं? आपण दोघं आहांत, काकासाहेब आहेत. शिवाय मोरूभाऊंनीं आणि डॉक्टरसाहेबांनीं सगळा कांहीं पत्कर घेतला आहे त्यांचा—"

"घेतला असला तर त्यांत नवल काय? ज्यांनीं प्रियाला तुरुंगांत घातलं त्यांना त्याचा पत्कर घेणं जरूरच आहे—"

"असं कां म्हणतां आपण? ते तुरुंगांत गेले यांत अभ्यंकरांचा न् खऱ्यांचा काय दोष? त्यांना वाटलं म्हणून ते चळवळींत पडले; व पूर्ण विचारांतीं केलेल्या कृत्याचा परिणाम मुकाट्यानं भोगण्यांत शहाणपणा असतो—"

"पण तुला खरंच वाटतं का ग, प्रियानं जें कांहीं केलं तें सारं पूर्ण विचारांतीं केलंय म्हणून? आपली त्याची कड घेऊन बोलायचं म्हणून तूं आतां हें बोलते आहेस? आपल्या कृत्याचा स्वतःचा भवितव्यावर, कुटुंबाच्या

परिस्थितीवर न् दद्दांच्या प्रकृतीवर काय परिणाम होईल याचा थोडा तरी विचार केला होता का ग प्रियानं ?—"

"तुझ्या सारखे हळवे नाहींत दद्दा असल्या बातमीनं खचून जायला, हिमा ! कांताबद्दल तुला किती धास्ती वाटत होती सारखी ! पण तिनं किती धैर्यानं तोंड दिलं आहे पहा या प्रसंगाला ! "

"बायकांचं धैर्य कीं नाहीं थिजलेल्या तुपासारखं असतं ! तें तूप दगडासारखं घट्ट होतं थिजल्यावर; पण जरा आंच लागतांच विरघळतं ! प्रियाला आता कुठं अटक झाली आहे. अजून खरं दुःख पुढंच आहे—"

"तूं कांताला धीर द्यायला आली आहेस कीं घाबरवून सोडायला ?—" डॉ. गुप्तांनीं विचारलें.

"त्यांनीं मला घाबरवून सोडायला मी काय लहान मूल आहे का ? त्या म्हणाल्या तेंहि बरोबर आहे. कांहीं असलं तरी दद्दा इथं न आलेलेच चांगले—"

"मीहि तसं कळवलंय त्यांना तारेंत स्पष्ट !" मोटारींतून उतरलेले यादवराव वर येतां येतां उद्गारले.

त्यांच्या मोटारी मागोमाग बगीचांत उभी असलेली मंडळीहि सर्व व्हरांड्यांत आली; व त्यांना कोतवालींत कळलेली माहिती ऐकण्यासाठीं त्यांच्या भोंवती जमा झाली. पण, उद्यां अकरा वाजतां खटला तुरुंगांत सुरू होणार आहे, एवढेंच फक्त यादवरावांनीं त्यांना सांगितलें.

मंडळींची पांगापांग झाल्यावर त्यांनीं कांताला आपल्या घरीं येण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला. पण, तिनें सांगितलें कीं, पचमढीहून दद्दा कोणाला तरी पाठविण्याचा नक्की संभव असल्यामुळें आपण घरांतून हलणें इष्ट होणार नाहीं.

तेव्हां आपल्या पत्नीला आणि जयाला ते तिथें ठेवून विजूसह घरीं परत गेले.

कांताचा अंदाज खरा ठरला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं प्रियंवदा पचमढीहून आली. तिच्याबरोबर राधालाहि सरसाहेबांनीं पाठविला होता. पण तो डॉ. गुप्ता यांच्याकडे मुक्कामाला गेला. नऊच्या सुमाराला तो डॉ. गुप्ता यांच्यासह

कांताला भेटावयाला आला, व तिच्याशीं औपचारिक बोलून ते दोघे तुरुंगांत प्रियदर्शनला भेटण्यासाठीं गेले.

ते तेथें जाऊन पोंचले, त्या वेळीं प्रियदर्शननें कोर्टात वाचून दाखविण्यासाठीं जें पत्रक तयार केलें होतें, त्याबद्दल तो अभ्यंकरांशीं चर्चा करित होता. तें त्यानें गुप्ता आणि राधा यांनाहि दाखविलें. बॅ. गुप्ता यांनीं तें मुकाट्यानें चाळून राधाला दिलें. राधानें तें काळजीपूर्वक वाचून त्यांतील कांहीं भाग अजिबात गाळण्याची व कांहीं बदलून लिहिण्याची सूचना प्रियाला केली. त्यानें त्या सूचना निमूटपणें ऐकून घेतल्या. पण, अभ्यंकरांनीं त्याच्याशीं वाद घालावयाला सुरवात केली; व तो वाद लवकरच इतका विकोपाला गेला कीं, प्रियदर्शन आणि गुप्ता यांना मध्यें पडून तें भांडण मिटवावें लागलें.

" गुलामी वातावरणांत वाढलेल्या तुझ्यासारख्या इसमाला या पत्रकाचा 'टोन' कसा कळणार ? "

अभ्यंकर त्याला शेवटीं तुच्छतेनें हंसून म्हणाले.

" मग प्रिया तरी दुसऱ्या कोणत्या वातावरणांत वाढला आहे ? " राधानें संतापून विचारलें.

" अरे, तो गेलीं तीन वर्षं माझ्याबरोबर काम करतो आहे ना ? तुझ्यासारखा वडिलांचा वशिला सांगून मागच्या दारानं कौन्सिलांत नाहीं जाऊन बसला !—"

अभ्यंकरांचे ते उद्गार त्याला मर्मी झोंबले; व त्यानंतर तो जो तेथून बॅ. गुप्तांसह परत गेला, तो कांहीं मग खटल्याच्या वेळीं सुद्धां हजर राहिला नाहीं.

खटल्याचा निकाल लागेपर्यंत कांताच्या वृत्तींतील उल्हास कायम होता. पण, निकाल देतांना जेव्हां न्यायाधीशानें अठरा महिने सक्त मजुरी आणि पांच हजार रुपये दंड अशी जबर शिक्षा जाहीर केली, तेव्हां तिच्या मनाचा धीर तर सुटलाच, पण अभ्यंकर आणि खरे यांचेहि चेहरे अगदीं उतरून गेले.

तरीहि तिनें आपलें मन धैर्यानें आवरलं; व घरीं आल्यावर प्रियदर्शनला नेहमीं लागणाऱ्या सर्व वस्तु आणि त्याचे कपडे घेऊन ती प्रियवदेसह दुपारीं चारच्या सुमारास पुन्हा तुरुंगांत आली.

सकाळीं खटला ऐकावयाला जेव्हां ती तुरुंगांत आली, तेव्हां तेथील अमानुष वातावरणाची जाणीव तिला झाली नव्हती. पण, या वेळीं त्या दोघींना जेलरच्या कचेरींत बराच वेळ थांबावें लागलें; व ती वेळ तुरुंगाच्या निरनिराळ्या भागांत आणि बाहेरील आवारांत कामें करणाऱ्या कैद्यांना परत आणण्याची असल्यामुळें, तेथील यांत्रिक जीवनाचा अमानुषपणा तिच्या निदर्शनाला आला. पळून जातां येऊं नये म्हणून पायांत बेडचा ठोकलेले कैदी पाण्याच्या कावडी किंवा खडीचीं घमेलीं डोक्यावरून कष्टानें आणतांना जेव्हां तिनें पाहिले, तेव्हां तिच्या हृदयाची विलक्षण कालवाकालव झाली.

पण, त्याहिपेक्षां त्या कचेरीच्या समोरच्या बाजूला उभारलेल्या एका मोठ्या थोरल्या पिंजऱ्यांत बाहेर गांवाहून आणलेल्या राजकीय कैद्यांच्या शारीरिक झडतीचा जो विधि चालला होता, तो पाहून तिच्या काळजाचा थरकांप झाला. प्रत्येक कैद्याचे कपडे उलटे सुलटे करून आणि त्याला उघडा वाघडा करून वॉर्डर त्याची कसून झडती घेत होते. त्या खानेतलाशींत एका सोळा सतरा वर्षांच्या पोरसवदा कैद्याची तुमान सैल करून वॉर्डर झटकीत असतां तिच्यांतून एक कागदाची घडी खालीं पडली. ती उचलावयाला तो मुलगा खालीं वाकला त्याबरोबर त्या वॉर्डरचें लक्ष एकदम त्या कागदाकडे जाऊन तो "ये क्या है बेवकूब ?" असें वसकन् त्याच्या अंगावर खेंकसला; व त्यानें ताडदिशीं त्या कैद्याच्या तोंडांत भडकाविली. त्या तिरमिरीसरसा तो मुलगा कोलमडून खालीं पडला. तेव्हां वॉर्डरनें त्याला हात देऊन सांवरण्याऐवजीं उलट त्याच्या पाठींत रपाटे घातले. त्याच्या भोंवतालीं उभे असलेले कैदी भयचकित होऊन तो प्रकार मुकाट्यानें पहात होते. कांताला तें दृश्य बघवेना. म्हणून तिनें तोंड फिरविलें. तथापि, तिच्या मनांत चटकन् कल्पना येऊन गेली, प्रियाचे तर असे हाल होणार नाहींत ना ? पण छे ! तो किती झालें तरी वकील आणि त्यांतून सर महादेवांचा पुतण्या ! त्याची व्यवस्था त्याच्या दर्जाला शोभेसारखीच केव्हांहि केलेली असणार !

जेलर कचेरींत हजर नसल्यामुळें प्रथम त्यांची कोणी दादच घेईना. पण, प्रियंवदा ही तुरुंगाची सरकारनियुक्त व्हिजिटर असल्यामुळें, तिनें आपली

परिचयपत्रिका काढून दुय्यम जेलरच्या हातीं देतांच, त्यांना बसावयाला खुर्च्या मिळाल्या; व लगच तो प्रियदर्शनची चौकशी करावयालाहि गेला.

थोड्या वेळानें परत येऊन तो प्रियवदेला म्हणाला–

"आपण आणलेल्या सामानाची गरज नाहीं त्यांना !–"

"कां बरं ? त्यांनीं सामान ठेवून घेऊं नका असं सांगितलं का तुम्हांला ?– "

"नाहीं. त्यांना सी क्लासांत ठेवलेले असल्यामुळें खाजगी सामान वापरतां येणार नाहीं !– "

"काय म्हणतां ? सी क्लासांत ठेवले आहेत त्यांना ? अहो, ज्यांना पांच हजार रुपये दंडाची शिक्षा ठोठावण्यांत आली आहे, त्यांना सी क्लासांत कसे ठेवलेत तुम्ही ?– "

"आपण म्हणतां तें खरं आहे, मिसेस देशमुख ! पण, शिक्षा देणाऱ्या न्यायाधीशानं जर आपल्या निकालांत कैद्याला कोणता वर्ग द्यावा हें स्पष्ट नमूद केलेलं नसलं, तर स्थानिक सरकारचा हुकूम येईपर्यंत त्याला सी क्लासांत ठेवण्याची पद्धत आहे आमची !–"

"चांगली आहे ही पद्धत तुमची ! न्यायधीशाला फक्त पांच हजार रुपये दंड ठोठवण्यापुरती त्यांच्या दर्जाची आठवण राहिली. नंतर त्याची स्मरणशक्ति एकदम लटकी पडलेली दिसते आहे !–"

"पण आमच्यावर रागावण्यांत काय अर्थ आहे, मिसेस देशमुख ? आम्हांला काय माहित नाहीं का मि. ठाकूर कोणाचे कोण आहेत ते ! पण इथं नियम म्हणजे नियम ! आपण सरळ सुपरिंटेंडेन्टसाहेबांच्या बंगल्यावर जाऊन विचारा त्यांना ! आपल्या परिचयाचे आहेतच ते नाहीं तर !–"

"खरंच ! यांनीं सांगितलं तें बरोबर आहे, माई ! यांच्याशीं वाद घालण्यांत काय फायदा आहे ? आपण निघू या आतां इथून !–"

आपल्या डोळ्यांत येणारे अश्रु आवरण्याच्या फिकिरींत असलेली कांता म्हणाली.

प्रियंवदेला तें तिचें म्हणणें बरोबर वाटलें; व त्या दोघी तुरुंगाच्या मोठ्या दारांतून निघून बाहेरच्या पटांगणांत आल्या.

बाहेर आल्यावर प्रियंवदा तिला म्हणाली, " चल, आपण मेजर बखल्यांना भेटून आतांच्या आतां निकाल लावून घेऊं या भानगडीचा! त्यांना कदाचित् माहितहि नसेल प्रियाला सी क्लासांत ठेवलंय हें! हे खालचे अधिकारी म्हणजे नियमाच्या अक्षरांची तामिली करणारे निर्बुद्ध हमाल असतात केवळ!— "

" असं नाहीं मला वाटत! हें जें सारं चाललंय तें हेतुपुरःसर झालेलं दिसतंय मला तरी! न् म्हणून बखल्यांकडे जाऊन कांहींहि उपयोग व्हायचा नाहीं असं वाटतं मला! तुम्हांला जर आशा वाटत असेल, तर तुम्ही एकट्याच जाऊन प्रयत्न करून पहा! मी थांबतें इथेंच! मला इथं कुठंच जाऊन कांहीं करण्याची इच्छा नाहीं!—"

" अग, असा धीर सोडून कसं चालेल, कांता? बरं, तूं मोटारींत जाऊन बैस! मी आतां मेजरसाहेबांना भेटून क्लास बदलून घेतें प्रियाचा! तुला माहित नाहीं!—दद्दांच्या कारकीर्दींतच त्यांना हंगामी आय. जी. होण्याची संधि मिळाली न् ते मेजरहि पण त्यांच्याच शिफारशीनं झालेले आहेत.—"

" पण या जुन्या गोष्टींची आठवण असेल का त्यांना आतां? मला कठीण वाटतं. पण त्यांना तुम्ही भेटून यायला हरकत नाहीं मुळींच.—"

प्रियंवदा घाईघाईनें मेजर बखले यांच्या बंगल्यावर गेली; व आपली परिचयपत्रिका तिनें चपराशाबरोबर आंत पाठविली.

तो आंत जाऊन पंधरा मिनिटें झालीं; पण लवकर बाहेर येण्याचें कांहीं लक्षण दिसेना.

तेव्हां व्हरांड्यांतील खुर्चीवर तिष्ठत बसून कंटाळलेल्या प्रियंवदेनें अखेर दारावरील विजेची घंटी जोरानें दाबली.

त्याबरोबर चपराशी धांवत बाहेर आला; व त्यानें तिला साहेबांनीं आंत बोलाविलें असल्याचें सांगितलें.

ती आंतल्या खोलींत जातांच मेजर बखले आपल्या समोरच्या खुर्चीकडे हात करून म्हणाले, " आपल्याला थोडं थांबावं लागलं, नाहीं, मिसेस देशमुख ? पण काय करावं ? तुमच्या या नव्या चळवळीमुळं कीं नाहीं निवांतपणानं चिरूट ओढायला सुद्धां फुरसत मिळेनाशी झाली आहे अलिकडे ! "

बोलतां बोलतां त्यांनीं तोंडांतला पाईप काढून तो रक्षापात्रावर ठेवला.

" आमच्या चळवळीमुळं ? म्हणजे तुम्ही काय कायदेभंगांतली सत्याग्रही समजलांत मला, मेजरसाहेब ? "

प्रियंवदेनें उपरोधानें हंसून म्हटलें.

" तसं समजायला कांहीं हरकत नाहीं आतां फारशी !—पण आज या वेळीं कशा आलांत आपण ? आज कांहीं राऊंडचा दिवस नाहीं आपल्या— "

" तुम्हांला माहित आहे मी कां आलें आहे हें !— "

" नाहीं. मी खरंच समजलों नाहीं आपल्या येण्याचं कारण !— "

मे. बखले तिची उपरोधिक दृष्टि टाळण्यासाठीं आपल्या पुढील कागदांची चाळवाचाळव करीत म्हणाले.

" असं ? आपण सर महादेवांची ओळख विसरलेले दिसतां, मेजरसाहेब !— "

" कां बरं ? त्यांचा निरोप आणला आहे का आपण पचमढीहून ? आज सकाळींच राधा येऊन भेटून गेला मला. पण तो तर कांहीं बोलला नाहीं माझ्याजवळ— "

मेजरसाहेब रक्षापात्रावर ठेवलेला पाईप तोंडाशीं नेत उद्गारले.

" राधा भेटून गेला ना ? मग प्रियाहि भेटला असेल तुम्हांला ?— "

" प्रिया ?—हो, आजच शिक्षा होऊन तुरुंगांत दाखल झाला तो— "

" त्याला कोणत्या वर्गांत ठेवला आहे हें आठवतं तुम्हांला ?— "

" मला फुरसत नाहीं झाली अद्याप कचेरींत जायला ! कां ? आपण चौकशी करून आलांत होय ?— "

" मला असिस्टंट जेलरनं असं सांगितलं कीं, न्यायाधीशानं आपल्या निकालांत क्लास नमूद केलेला नसल्यामुळं त्याला सी क्लासांत ठेवला आहे तूर्त— "

"हें नियमाला धरून झालं अगदीं!—"

"मेजरसाहेब, आपणच बोलतां आहांत ही भाषा?—"

"मीच कशाला? आपण सुद्धां आजपर्यंत प्रत्येक राऊंडच्या वेळीं कैद्यांच्या तक्रारींना उत्तरं देतांना हीच भाषा वापरीत आलां आहांत, मिसेस देशमुख!—"

"पण ते कैदी आणि प्रिया यांना एकाच मापानं मोजतां आपण?—"

"तुरुंगांत सगळ्यांना एकच माप!—पण आपल्याला माझ्यापासून काय अपेक्षा आहे तें सरळ सांगा मला! उगाच वाद नको—"

मेजरसाहेब आपल्यापुढें ठेवलेल्या फाइलींच्या राशींतील एक फाईल काढून तिची फीत सोडीत उद्गारले.

त्यांच्या त्या वर्तनाचा अर्थ प्रियंवदेच्या लक्षांत आला; व ती एकदम उभी राहून म्हणाली—

"मला कसलीच अपेक्षा नाहीं आपल्यापासून!—आपला वेळ घेतला याबद्दल माफ करा, मेजरसाहेब!—"

आणि ती बाहेर आली.

ती मोटारीजवळ येतांच कांतानें उत्कंठेनें विचारलें, "काय म्हणाले मेजरसाहेब, माई?—"

तेव्हां प्रियंवदेनें विषण्ण आवाजांत उत्तर दिलें, "तूं म्हणालीस तें खरं ठरलं, बाई! मेजरसाहेब ओळख विसरले दहांची!—"

"हा दोष त्यांचा नव्हे! बदललेल्या परिस्थितीचा आहे. असलीं माणसं हीं बदलत्या काळाबरोबर बदलत असतात. मला खात्री आहे कीं, हें सारं वरून सुटलेल्या हुकुमानुसार घडलेलं आहे—"

प्रियंवदा कांहीं बोलली नाहीं.

मोटार चालू झाल्यावर ती म्हणाली, "कांता, आपण पंचमढीला जायचं आतांच्या आतां!—"

"त्यांना इथं अशा स्थितींत सोडून?—"

"तूं इथं राहिलीस, तरी प्रियाला काय उपयोग होणार आहे तुझ्या त्या राहण्याचा ? आपण पचमढीला जाऊं या. मी प्रथम ना. नायडूंना भेटतें !—"

"एक ठेच लागली तेवढी पुरे नाहीं का झाली ? आणि तुम्ही नव्या गृहमंत्र्यांना भेटलेलं दद्दांना आवडेल का, माई ?—"

"ही वेळ काय कोणाची आवड निवड पहाण्याची आहे का ? या वेळीं जर आपण अडून बसायचं ठरवलं, तर प्रियाचो नाहीं नाहीं ती अवहेलना होईल ! छे, छे ! दद्दा रागावले तर रागावले ! मी पाहून घेईन त्यांचा राग ! त्याची काळजी नको करूंस तूं ! आपण पचमढीला गेलंच पाहिजे आतांच्या आतां ! तशी तार करूं या दद्दांना—"

दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्या दोघी जेव्हां पचमढीला जाऊन पोंचल्या, तेव्हां प्रियंवदेनें ड्रायव्हरला म्हटलें, "प्रथम मोटार 'माउंट प्लेजंट' वर घ—"

"हें काय ? तुम्ही खरोखरीच दद्दांना आधीं न भेटतां परस्पर ना. नायडूंकडे जाणार !—"

कांतानें आश्चर्यानं विचारलें.

"हाय. मागाहून दद्दांनीं नाहीं म्हटलं, तर मग अशक्य होईल मला त्यांच्याकडे जाणं ! त्यापेक्षां आधींच त्यांना भेटून मला जें काय करतां येण्या-सारखें आहे तें करून टाकणार आहे मी !—"

कांताला तिच्या त्या उद्गारांत तथ्य आहे असें वाटलें, व ती कांहीं बोलली नाहीं.

प्रियंवदेला 'माउंट प्लेजंट' वर सोडून ती बंगल्यावर येऊन पोंचली. त्या वेळीं सरसाहेब व्हरांड्यांत फेऱ्या घालीत होते.

मोटार कमानीखालीं येऊन उभी रहातांच ते एकदम थांबले. त्यांचा चेहरा अगदीं शांत आणि गंभीर होता.

कांताला वाटलें, आपल्याला वाटला होता तितका कांहीं त्या तारेचा अनिष्ट परिणाम त्यांच्या प्रकृतीवर झालेला नाहीं.

ती मोटारींतून खालीं उतरून व्हरांड्यांत आली आणि तिनें त्यांना लवून नमस्कार केला.

त्याबरोबर हंसण्याचा प्रयत्न करून ते उद्गारले, "फिटली एकदां प्रियाची तुरुंगांत जाण्याची हौस! राधाचा कांहीं उपयोग झाला का तुम्हांला? तो बहुधा गुप्ताकडे राहिलेला दिसतो!—"

त्यांच्या आवाजांतील उपरोध प्रत्येक शब्दागणिक वाढत होता. म्हणून तिनें तें अप्रिय भाषण थांबविण्यासाठीं म्हटलें, "काकासाहेबांची फार मदत झाली! त्यांची तार पोचली होती ना वेळेवर?"

"हो. मला दोन्ही तारा अगदीं वेळेवर मिळाल्या. पण प्रियंवदा कुठं आहे? तीहि राहिली कीं काय नागपूरला?—"

कांता ज्या प्रश्नाला भीत होती, तोच त्यांनीं नेमका विचारला. त्याला काय उत्तर द्यावें, हें तिला सुचेना.

तिच्या त्या मौनामुळें ते किंचित् क्षुब्ध होऊन उद्गारले, "ती कशासाठीं थांबली आहे नागपूरला? कालच्या तिच्या तारेवरून मला वाटलं होतं तुम्हीं दोघीहि येणार म्हणून—"

"हो. त्याहि आल्या आहेत!—"

"मग कुठं आहे ती?—"

"त्या वाटेंत उतरल्या त्यांना सी क्लास देण्यांत आल्याचं कळल्यामुळं—"

"कुणाला सा क्लास? प्रियाला?—"

"होय. न्यायाधीशानं आपल्या निकालांत क्लास नमूद केलेला नव्हता. म्हणून तुरुंगाच्या नियमांप्रमाणं त्यांना सी क्लासांत ठेवण्यांत आलं आहे तूर्त—"

"मी मेलों नाहीं अजून माझ्या पुतण्याला सी क्लास देऊन ठाकूर घराण्याची अप्रतिष्ठा करायला! ज्याला पांच हजार रुपये दंड ठोठावण्याची अक्कल सुचली, त्याला त्या दंडाला अनुरूप असा क्लास प्रियाला देण्याचा मात्र विसर पडला अं! तुम्हीं तक्रार कां नाहीं केलीत तिथल्या तिथं या मूर्खपणाच्या कृत्याविरुद्ध? राधानं काय केलं नागपूरला जाऊन?—"

"आम्हांला हा प्रकार कळल्याबरोबर प्रियंवदाबाई मेजर मखल्यांना जाऊन भेटल्या. पण कांहीं उपयोग झाला नाहीं!—"

"बरोबर! मी गृहमंत्री कुठं आहे आतां?—"

" म्हणून तशाच आम्ही पचमढीला यायला निघालों—"

" आणि प्रियंवदा वाटेंत उतरली ? कुठें उतरली ? गव्हर्मेंट हाऊसवर उतरली ?—"

" नाहा—"

" मग कुठं उतरली ? सांग, सांग लवकर ! दुसऱ्या कुणाला भेटून उपयोग व्हायचा आहे इथ ?—"

" मला सुद्धां आशा नव्हती उपयोग होण्याची. पण या वेळीं तरी देव नवसाला पावला म्हणायचा—"

दिवाणखान्याच्या दारावरील पडदा बाजूला सारून घाईघाईनें व्हरांड्यांत आलेल्या प्रियंवदेनें म्हटलें.

ना. नायडूंच्या मोटारींतून आल्यामुळें ती बंगल्याच्या मागल्या बाजूला उतरली होती.

ती पुढें म्हणाली, " माझ्या समोरच तार केली त्यांनीं मेजर बखल्यांना ! प्रियाला साऱ्या सवलतींसह ए क्लास देण्याची शिफारस केली आहे त्यांनीं-"

एक प्रकारच्या उल्हासानें प्रियंवदा हें कांताकडे पाहून बोलत होती. त्यामुळें आपल्या त्या बोलण्याचा सरसाहेबांवर काय परिणाम होत आहे, हें तिच्या लक्षांत आलें नाहीं.

" कोणी तार केली ? तूं कोणाला भेटायला गेली होतीस ?—"

ते संतप्त आवाजांत उच्चारलेले कठोर शब्द कानांवर पडतांच तिचा सारा आनंद मावळला, सारें अवसान गळालें.

भीतीनें तिच्या तोंडून शब्द निघेना.

" कुणाकडे गेली होतीस तूं ? मला कळलं पाहिजे सारं, प्रियंवदे ! "

त्या हुकमी शब्दांनीं तिच्या हृदयाचा अगदी भेद केला.

" मी, ' माऊंट प्लेजंट ' वर उतरलें होतें येतां येतां ! "

" आणि तिथें जाऊन माझी न् माझ्या घराण्याची अप्रतिष्ठा करण्याचा विडा उचलून बसलेल्या त्या इसमासमोर माझ्या नांवानें पदर पसरून तूं प्रियासाठीं ए क्लास मिळविलास ! प्रियंवदे, काय केलंस तूं हें ? माझे आणि

नव्या गृहमंत्र्यांचे संबंध कशा प्रकारचे आहेत हें माहीत आहे तुला ! तरी सुद्धां तूं तिथें जाऊन दयेची याचना केलीस ! इतकीं वर्षं माझ्या सहवासांत राहूनाहि माझी ओळख पटली नाहीं तुला ! पुरुष धनासाठीं, सत्तेसाठीं, कीर्तीसाठीं किंवा ध्येयासाठीं जगतो आणि झगडतो ! पण स्त्री ही मात्र केवळ संसारासाठीं जगते आणि झगडते ! मायेनें आंधळ्या झालेल्या तिच्या डोळ्यांना मानहानीची खंत वाटत नाहीं किंवा ध्येयहानीचं दुःख जाणवत नाहीं. तूं सुद्धां अखेर स्त्रीजातीच्या या स्वभावावर गेलीस ! तुला हें कळायला हवें होतें कीं, प्रियाला जें सी क्लासांत डांबण्यांत आलें, तें कांहीं तुरुंगाचे नियम तसे आहेत म्हणून नव्हे तर, तर केवळ माझी मानखंडणा करण्यासाठीं ! त्याला झालेली ती कडक शिक्षा आणि नंतरचा हा उपमर्द !—तुला समजायला हवं होतं हा कुणाच्या खुनशी बुद्धीचा खेळ आहे तें ! आतां उद्यां पचमढींतल्या साऱ्या क्लबांतून अशी कंडी उठविली जाईल कीं मी तुला मुद्दाम भेटीला पाठवून माझ्या पुतण्यासाठीं ए क्लास मिळविला ! प्रियंवदे, काय केलंस तू हें ? मी हंगामी गव्हर्नर असतांना माझी नेमणूक बादशाही हुकुमानं झाली नसल्याचें कारण दाखवून कौन्सिलांत गव्हर्नर या नात्यानं बोलण्याचा हक्क मला नाहीं असा प्रश्न ज्या वेळीं त्यानें उपस्थित केला, त्या वेळीं तू लॉबींत हजर होतीस ! आणि मी गव्हर्नर म्हणून कौन्सिल हॉलमध्यें प्रवेश करतांच तो जेव्हां तावातावानें उठून बाहेर गेला, तेव्हां तो प्रकार तू प्रेक्षकांच्या गॅलरींतून आपल्या डोळ्यांनीं पाहिला होतास ! तरीसुद्धां माझा अकारण मत्सर करणाऱ्या त्या माझ्या वैऱ्याकडे जाऊन तू माझ्या नांवानं दयेची भिक्षा मागितलीस ! प्रियंवदे, काय केलंस तूं हें ? तुम्ही साऱ्यांनींच माझी या वृद्धापकाळांत सगळ्या बाजूनीं अप्रतिष्ठा करण्याचा कट केला आहे का ग ?—"

—ते शब्द उच्चारून सर महादेव एकदम थांबले.

त्यांचा श्वास जोरानें चालला होता.

पण क्षणार्धातच तो मंद होऊं लागला.

त्यांची दृष्टि त्या दोघींच्या चेहऱ्यावर स्थिर झाली होती.

त्या दृष्टींत शून्यता उत्पन्न होत आहे, त्यांचे ते आपल्याकडे पहात असलेले भेदक डोळे थिजत आहेत, असा भास कांताला झाला. आणि आपले दोन्ही हात पुढें करून ती अत्यंत आर्त शब्दांनीं उद्गारली,

" नका हो नका अशा रीतीनं आमच्याकडे पाहू ! अरे देवा ! कसे पहाताहेत हो हे ! "

हे शब्द ती करुण वाणीनें उच्चारीत आहे, तोंच सर महादेव धाडकन खालीं कोसळले.

१९

# उत्तरक्रिया

त्यानंतर चार दिवसांनीं सर महादेवांच्या अस्थींचें विसर्जन, त्यांच्या मृत्युपत्रानुसार, नर्मदेमध्यें करून ठाकूर मंडळी नागपुरास परत आली.

ते मरण पावल्याबरोबर कांतानें तार करून नागपुरच्या तुरुंगांत असलेल्या प्रियदर्शनला ती बातमी कळविली होती.

घरीं येतांच त्या तारेला उत्तर म्हणून त्यानें पाठविलेलें तुटक पत्र तिच्या हातीं पडलें त्या पत्रांत त्यानें लिहिलें होतें—

"तुझी तार मिळाल्यापासून मला सारें जग कसें अगदीं ओसाड आणि भयाण वाटत आहे. दद्दांचें तें भव्य आणि गौरवर्ण मस्तक पाहिलें, म्हणजे युरोपांत असतांना बघितलेल्या दिग्विजयी रोमन सम्राटांच्या पुतळ्यांची मला आठवण होत असे. त्यांच्या मृत्यूमुळें या प्रांताच्या राजकारणांतील सारा रुबाब, सारी मुत्सद्देगिरी आणि सारा उदात्तपणा अस्तप्राय झाला आहे.

या आपत्तीमुळें आपलें कौटुंबिक नुकसान किती झालें आहे, याची मला कल्पनाहि करवत नाहीं. कांता, त्यांची उज्वल परंपरा, या बदललेल्या परिस्थितींत, आपआपल्या मतानुसार कायम ठेवण्याचा प्रयत्न आपण केला, तरच त्यांच्या आपल्यावरील उपकारांचें कांहीं सार्थक झालें, असें म्हणतां येईल."

तिला अपेक्षा होती, अनुतापाचा एक तरी शब्द, आपल्या वर्तनामुळें त्यांचें मरण जवळ आलें अशा जाणिवेचें एकादें तरी वाक्य त्या पत्रांत आढ-

ळेल. पण, जणुं कांहीं, वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करावयाला पाठविण्यासाठींच त्यानें तें पत्र तिला लिहिलें होतें.

तिच्या मनांत आलें, बुद्धीला स्तिमित करणारा जो संगमरवरी कठोरपणा दद्दांच्या ठिकाणीं होता, तो त्याच्याहि वृत्तींत आहे.

पण त्याच्या त्या पत्राविषयीं फार वेळ विचार करण्याइतका निवांतपणा कांहीं तिला लाभला नाहीं. सर महादेवांच्या मरणाच्या दुःखापेक्षां दारुण असं संकट ठाकूर मंडळीपुढें लवकरच दत्त म्हणून उभें राहिलें.

सरसाहेबांच्या मृत्यूनंतर पहिल दोन तीन दिवस दुखवट्याच्या तारांचा आणि पत्रांचा असा कांहीं वर्षाव राधामोहनवर झाला कीं, त्यांना उत्तरें पाठविण्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि कामाकडे लक्ष द्यावयाला त्याला फुरसत झाली नाहीं. सरसाहेबांचें मृत्युपत्र त्यांच्या इच्छेनुसार यादवरावांनीं फोडलें; व नागपुरला गेल्यावर त्याप्रमाणें व्यवस्था करू, असें राधाला सांगून ते पुढें निघून आले.

ठाकूर मंडळी नागपूरला आल्यावर तिथेंहि त्यांचे पहिले तीन चार दिवस दुखवट्याच्या भेटी घेण्यांत आणि नंतरचे उत्तरक्रियेच्या विधींत गेले. त्यांतून मोकळा झाल्याबरोबर राधामोहनला मृत्युपत्राची आठवण झाली; व यादवरावांजवळ तें त्यानें वाचावयाला मागितलें.

त्यावर ते म्हणाले, "दद्दांची इच्छा अशी आहे कीं, कुटुंबांतल्या सगळ्या मंडळींच्या समोर तें वाचलें जावें; व नंतर त्याप्रमाणें व्यवस्था करण्यांत यावी. तेव्हां मी तें उद्यां सायंकाळीं तुमच्याकडे येऊन वाचून दाखवीन सगळ्यांना एकदमच ! तूं कांताली बोलावून घ मोटार पाठवून-"

"तिचा काय संबंध आहे यांत ?—"

"तें तुला मृत्युपत्र ऐकल्यावर समजेल !—अरे, दद्दांनीं जरी प्रियाची स्वतंत्र व्यवस्था करून दिली होती, तरी त्याला मुलाप्रमाणेंच मानीत असत ते. म्हणून कांता हजर रहायला हवी उद्यां ! बाहेरच्या माणसांपैकीं फक्त मला न् प्रियंवदाबाईंना हजर रहायचं आहे.—म्हणून त्यांना तूं निरोप पाठव न् कांताला आणायला मोटार जाऊं दे !—"

" तुम्ही घेऊन या येतांना तिला आपल्या मोटारींतून !—पण प्रियंवदा-बाईंना जर बोलवायचं तर मग बॅ. गुप्तांनीं काय पाप केलंय ?—"

" अरे, हा कांहीं पापपुण्याचा प्रश्न नाहीं कुणाच्या, राधा ! पण मृताच्या इच्छेला आपण मान द्यायचा आहे. मृत्युपत्र प्रथम फोडून तें अमलांत आणण्याची जबाबदारी जशी दद्दांनीं माझ्यावर सोंपविली आहे, तशीच त्याच्या वाचनाच्या वेळीं कोणी हजर रहावें याचीहि यादी त्यांनीं प्रास्ताविक भागांत दिली आहे. त्याप्रमाणें वागायला नको का आपण ?—"

राधा यावर कांहीं बोलला नाहीं; व दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं पांच वाजतां मृत्युपत्र वाचावयाचें असें ठरवून यादवराव निघून गेले.

त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं सर्व मंडळी ' सागर व्हिला 'तील प्रशस्त दिवाणखान्यांत जमा झाली. सर महादेवांच्या मृत्यूनंतर त्यांच्या त्या आवडत्या प्रासादांत आणि त्यांतील त्या अनेक राजकीय घडामोडी पाहिलेल्या भव्य दिवाणखान्यांत एकत्र बसण्याच्या त्यांच्या कुटुंबांतील मंडळीचा तो पहिलाच प्रसंग होता. त्यामुळें तिथें आल्यावर प्रियंवदा, कांता, मालिनी आणि ऊर्मिला यांच्या डोळ्यांत अश्रु आल्याशिवाय राहिले नाहींत. राधाची मुद्रा मात्र त्रस्त दिसत होती; व डोळे किंचित् तारवटून लाल झालेले होते.

यादवरावांचा चेहरा अत्यंत गंभीर होता. एखाद्या बिकट आणि नाजूक शस्त्रक्रियेच्या प्रसंगीं कुशल अशाहि धन्वंतऱ्याच्या मुद्रेवर ज्या प्रकारचें जबाबदारीचें गांभीर्य येतें, त्या प्रकारचा गंभीरपणा होता तो.

पण त्या प्रसंगाचें कारुण्य आणि गांभीर्य हीं दोन्हीहि राधानें टिकूं दिलीं नाहींत. इतर कोणाला कांहीं बोलणं त्याला शक्य नव्हतें. पण ऊर्मिलचे हुंदके जेव्हां लवकर थांबेनात, तेव्हां तिच्या अंगावर वसकन् ओरडून तो उद्गारला—

" किती वेळ रडशील ऊर्मी, तूं आतां ? आपण इथं कांहीं रडण्यासाठीं नाहीं जमलों आहोंत आज ! गेला सबंध पधरवडा रडण्यांत घालवूनसुद्धां तुमच्या डोळ्यांतल पाणी संपलंलं दिसत नाहीं मला ? तूं जग बागेंतून फिरून ये वाटल्यास ! मृत्युपत्र वाचायच्या वेळीं तूं हजर नसलीस, तरी काका कांहीं रागावणार नाहींत तुझ्यावर—"

" राधा! अरे, तिच्यावर एवढं रागवायला काय झालं तुला? तूं आईच्या प्रेमाचं सुख भोगलेलं असल्यामुळं तुझ्या मनावर परिणाम होऊं नये दद्दांच्या मृत्यूचा फारसा हें ठीक आहे. पण तिचं तसं नाहीं. दद्दा हेच तिला वडिलांप्रमाणं आईच्याहि ठिकाणीं होते. तेव्हां तिला आज निराधार झाल्यासारखं वाटून इथं बसल्याबरोबर त्यांच्या आठवणीनं रडूं कोसळलं, तर तूं सांत्वन करायला हवं होतंस तिचं गोड शब्दांनीं—"

" निराधार कशानं झाली ती, माई? मी आहे ना तिचा थोरला भाऊ तिची काळजी घ्यायला जिवंत अजून! शिवाय आणखी दोन महिन्यांनीं लग्न करून देतों तिचं म्हणजे तोहि भक्कम आधार होईल तिला!—"

तो कदाचित् आणखीहि कांहीं अप्रशस्त बोलला असता. म्हणून प्रियंवदा यादवरावांना म्हणाली—

" तुम्ही थांबूं नका आतां, यादवराव! ती लहान पोर आहे अजून! तुम्ही वाचायला सुरवात केलीत, म्हणजे थांबेल रडं तिचं आपोआप—"

तिच्या सूचनेचें मर्म यादवरावांच्या लक्षांत आलें; व त्यांनीं घसा साफ करून मृत्युपत्र वाचावयाला सुरवात केली.

मृत्युपत्राच्या प्रारंभीं ठाकूर घराण्याचा वृत्तांत थोडक्यांत देऊन आपली सर्व मालमत्ता स्वसंपादित असल्याचें सरसाहेबांनीं नमूद केलें होतें. नंतर राधा-मोहन आणि प्रियदर्शन यांनीं आपल्या इच्छेविरुद्ध कसें वर्तन केलें, याची हकीकत दिली होती; व त्या दोघांचा आपल्या मालमत्तेवर कोणत्याहि प्रकारचा हक्क राहूं नय, असें म्हणून मग मिळकतीच्या व्यवस्थेचीं कलमें दिलीं होतीं.

या कलमांनुसार कांता आणि ऊर्मिला यांना प्रत्येकीं वीस हजार रुपये दिले होते. 'सागर व्हिला' सुव्यवस्थित ठेवण्याकरितां कायम मुदतीच्या ठेवींतून तीनशें रुपये वार्षिक खर्चासाठीं मिळण्याची सोय केलेली होती; व राधा त्यांत रहात आहे तोंपर्यंत त्याच्या व्यक्तिगत खर्चासाठीं त्याला दरमहा दीडशें रुपये आणि एक गाडी वापरावयाला द्यावी, असें कलम त्याच्याविषयीं होतें. मिळकतीची सर्व मालकी मालिनी आणि राधामोहन यांची संतति व त्यांच्या अभावी

कांता आणि प्रियदर्शन यांची संतति यांच्याकडे जाण्याची कायदेशीर व्यवस्था केलली होती.

मृत्युपत्राच्या शेवटच्या कलमानुसार मालिनीला सर्व इस्टेटीची मालक ठरवून यादवरावांना तिचे सल्लागार नेमले होते.

निरनिराळ्या संस्थांना देणग्या देण्यासाठीं पंचवीस हजार रुपये वेगळे काढून ठेवले होते.

मृत्युपत्राचें वाचन संपल्यावर क्षणैक कोणीच कांहीं बोललें नाहीं.

नंतर राधानें विचारलें, " हें मृत्युपत्र तयार करण्यापूर्वी दद्दांनीं तुमच्या-शिवाय आणखी कोणाचा सल्ला घेतला होता, काका ?–"

" मला वाटतं, सुभेदार आणि किनखेडे यांचा घेतला असावा पचमढीला जाण्यापूर्वी त्याचा शेवटचा मसुदा तयार करून त्यांनीं मला दाखविला–"

" बरं, मी जाऊं आतां ?––मला वाटतं, झाला आपला आजचा कार्य-क्रम पूर्ण ?–"

त्यांच्या शेवटच्या वाक्याकडे दुर्लक्ष करून राधा म्हणाला. त्याच्या त्या बोलण्यांतली तुच्छतेची झाक यादवरावांच्या ध्यानांत आल्याशिवाय राहिली नाहीं.

" मला एवढंच म्हणायचं आहे शेवटीं कीं, या मृत्युपत्राप्रमाणं व्यवस्था करण्याच्या कामीं तुम्ही सर्वांनीं सहाय्य केलं पाहिजे मला मनापासून–"

" मी सहाय्य करण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं, काका !–"

" कां बरं !–"

" मला दद्दांनीं नुसता पेन्शनर करून टाकलाय आपल्या मृत्युपत्रांत !–तुम्ही मालकिणीच्या सल्ल्यानं काय करायचं तें करा !––"

तो उपरोधानें हसून म्हणाला आणि लगेच तिथून उठून गेला.

त्याच्या त्या हास्यानें दिवाणखान्यांतील वातावरण मात्र अत्यंत गंभीर झालें. क्षणभर सर्वच मंडळी अगदीं स्तब्ध होती.

नंतर मालिनी म्हणाली, " मृत्युपत्राप्रमाणं व्यवस्था नाहीं केली, तर चालणार नाहीं का, काकासाहेब ?–"

“ हें काय भलतंच बोलतेस तूं, मालू ? दद्दांनीं केलंय तें पूर्ण विचारांतीं न् दूरवर दृष्टि देऊनच केलंय—”

“ त्यांनीं दूरवर दृष्टि दिली हें खरं. पण ती देतांना पायांखालचा विस्तव त्यांना दिसला नाहीं. तुम्ही ऐकलांत ना आतांचा टोमणा, माई ? आजपर्यंत दद्दांचं छत्र डोक्यावर होतं, म्हणून या घरांत दिवस निभले माझे कसे तरी ! पण पचमढीहून परत आल्यापासून घर कसं खायला उठलंय मला !—”

बोलतां बोलतां तिच्या डोळ्यांतून टिपें पडूं लागलीं.

“ असा धीर सोडून चालणार नाहीं तुझं आतां, मालू ! दद्दांनीं तुझ्यावर टाकलेली जबाबदारी लक्षांत घेऊन यापुढं कणखरपणानं वागलं पाहिजे तुला.—”

“ माझ्यापेक्षां त्यांनीं बाईवर जर ही जबाबदारी टाकली असती तर बरं झालं असतं, माई ! त्या माझ्यापेक्षां जास्त शिकलेल्या आहेत, कर्तबगार आहेत न् कणखरहि आहेत—”

“ नवऱ्याला आवरण्याच्या बाबतींत कांता तुझ्याइतकीच कमकुवत आहे, हें सिद्ध झालंय आतां ! दद्दांनीं केलंय तें कायद्याच्या न् चालीरीतीच्या दृष्टीनं अगदीं बरोबर केलंय, मालू ! तूं थोडी चातुर्यानं न् कणखरपणानं वागलीस तर आपोआपच निभेल सगळं ! फार तर प्रथम कांहीं दिवस त्रास होईल थोडासा—”

“ पण तुमचं सगळ्यांचं पाठबळ मिळालं पाहिजे मला ! बाई, तुम्हीं आतां इथंच राहिला या उद्यांपासून म्हणजे तितकाच धीर वाटेल माझ्या मनाला—”

“ खरंच कांता, तुला इथं येऊन राहायला कांहीं हरकत दिसत नाहीं प्रियदर्शन सुटेपर्यंत !—तुम्ही दोघी असल्यात म्हणजे तितकाच वचक वाटेल राघाला !—”

“ ही तुमची समजूत व्यर्थ आहे, माई ! भाऊजींना दद्दांशिवाय कुणाचाच वचक कधीं वाटला नाहीं न् त्या दृष्टीनं मी इथं राहायला येऊन कांहीं उपयोगहि नाहीं ! शिवाय, मी इथं येऊन राहिलें, म्हणजे एव्हांपासून मी माझा हक्क शाबीत करायला आलें असं वाटायचं त्यांना आणखी ! त्यापेक्षां चार पावलं

दूर असलेलं बरं.—त्यांतूनहि मी आलें असतें. पण उमाला घरीं एकटा सोडून येणं इष्ट नाहीं होणार मुळींच—"

"मग त्यालाहि इथं घेऊन या—"

"मी पुष्कळ आणीन! पण तो इथं यायला कबूल झाला पाहिजे ना?"

"खरं आहे तुझं म्हणणं, कांता!" यादवराव मध्येंच म्हणाले. "मालू, तुला इतकी धास्ती वाटण्याचं कारण नाहीं. राघा किती झालं तरी बॅरिस्टर आहे. तो मघांशीं म्हणाला तें कांहीं खोटं नाहीं. मृत्युपत्रानं परिस्थिति बदलून टाकली आहे सगळी! तो तुला बहुधा आतां त्रास देणार नाहीं पूर्वींसारखा.—शिवाय त्यानं गडबड केलीच, तर तूं केव्हांहि बोलावूं शकशील आम्हांला—"

"मलाहि बरोबर वाटतं यादवरावांचं म्हणणं! सध्यांच्या स्थितींत बाहेरच्या कोणत्याहि माणसानं इथं येऊन रहाणं चांगलं दिसणार नाहीं! वाटल्यास थोडा अनुभव घेऊन मग ठरवूं काय तें.—तूं मात्र जबाबदारीनं न् धीरानं वागलं पाहिजेस मालू, आतां!—"

"तें कसं काय जमतं मला तें पहायचं, माई!" मालिनी म्हणाली.

त्यानंतर अर्ध्या तासानें कांता घरीं परत आली.

पण, राघानें तुच्छतेनें केलेलें तें तिरस्कारक हास्य आणि मालिनीच्या डोळ्यांत आलेले ते असहाय अश्रु कांहीं केल्या तिच्या मनांतून जाईनात.

तिला वाटलें, उमा आल्यावर आपल्याला विसर पडेल या गोष्टींचा. तो अलिकडे दिवेलागणीलाच घरीं येत असे. पण त्या दिवशीं तो उशिरा आला आणि आला तोहि अगदीं विचित्र मनःस्थितींत.

कांता व्हरांड्यांत त्याची वाट पहातच बसली होती. तो दृष्टीस पडल्याबरोबर तिनें त्याला विचारलें, "का रे, उशीर कां झाला आज तुला इतका?"

तिच्या त्या प्रश्नाला उत्तर न देतांच त्यानें म्हटलें, "ताई, मला भूक नाहीं आज! तुझं जेवण झालं नसलं, तर जेवून घे तूं—"

आणि तो मुकाट्यानें आपल्या खोलीकडे जाऊं लागला.

त्याबरोबर कांता उठून त्याला म्हणाली, "अरे, इतका वेळ मी वाट पहात बसलें होतें तुझी न् माझ्याशीं कांहीं न बोलतां आपल्या खोलीकडे

चाललास तूं! उमा, पाठचा भाऊ घरांत रहात असतांनासुद्धां त मला अगदीं ओसाड वाटावं अशा रीतीनं वागायचं ठरवलं आहेत का तूं ? ”

तिचे ते उद्गार कानांवर पडतांच तो एकदम मागें फिरला आणि तिला म्हणाला—

“ तूं असं भलतंच कांहीं तरी बोलून माझ्या काळजाला घरं पाडूं नकोस, ताई. तुला जशीं तुझीं दुःखं आहेत, तशींच मलाहि माझीं आहेत !–”

“ पण तुझं दुःख तूं सांगशील तेव्हांच ना मला कळणार, उमा ? खरें सांग मला, आज तुला भूक नसायला काय झालं आहे ? ”

“ कांहीं नाहीं. माझी भूक मरून गेली आहे आज अगदीं ! ”

“ माणसाची भूक कधीं सुखासुखी मरत नसते, उमा ! त्यांना अटक झाली त्या दिवशीं रात्रीं तूं म्हणाला होतास मला, ‘ मी माझ्याकडून तुला शक्य तितकी साथ देईन, ’ म्हणून ! अशीच का रे साथ देणार तूं मला ? तुझ्या मनांतलं दुःख चोरून ठेवून तूं जर उपाशीं पोटीं आपल्या खोलींत जाऊन कुढत बसलास, तर मला तरी जेवण कसं गोड लागेल, उमा ?–”

“ ताई काल की नाहीं आमच्या एका मित्राला अटक झाली ग !–”

तो तिच्या अगदीं जवळ येऊन दुःखानें उद्गारला.

“ कोणता मित्र हा ? कायदेभंगांत भाग घेतला होता का त्यानं !–”

“ नाहीं ग ! कायदेभंगाशीं कांहीं सुद्धां संबंध नव्हता त्याचा–”

“ पण हा कोण मित्र तुमचा ? नांव तर कळूं दे मला त्याचं आधीं–”

“ जयंत चितळे ! मुंबईला अटक झाली त्याला—”

“ तुमच्या या मित्राचं नांव पूर्वीं कधीं ऐकलं नव्हतं मी, उमा ! कशाबद्दल पकडण्यांत आलंय त्याला ?—”

“ पांच दिवसांपूर्वीं चितागांगला सरकारी शस्त्रागारावर हल्ला केला क्रांतिकारकांनीं ! त्याच्याशीं संबंध असल्याच्या आरोपावरून पकडण्यांत आलं आहे त्याला ! आजच्या संध्याकाळच्या टाईम्समध्यें बातमी आली आहे–”

त्यानें सांगितलेली ही हकीकत ऐकतांच ती मटकन् खुर्चीवर बसली. तेव्हां तो घाबरून जाऊन आश्चर्यानें तिला म्हणाला, " ताई, असं काय करतेस तूं ? काय झालं ग तुला एकदम ?—"

क्षणार्ध ती कांहीं बोलली नाहीं. नंतर तिनें त्याचा हात एकदम घट्ट धरून म्हटलें, " उमा, खरं सांगशील तूं मला ?—"

तिचा आवाज इतका कांहीं संथ आणि खोल येत होता कीं ती नुकतीच कसल्या तरी जबर मूर्च्छेतून सावध झाली होती.

" ताई, तूं असं काय विचारतेस ? मी कधीं तरी खोटं बोललों आहे का तुझ्याशीं ?—"

तो तिच्या पायाजवळ बसून भीतीनें तिच्याकडे पहात उद्गारला.

तिनें त्याच्या खांद्यावर आपले दोन्ही हात ठेवले; व त्याच्या दृष्टींत आपली दृष्टि मिसळून ती त्याला म्हणाली, " उमा, खरं सांग मला !—तुझा कांहींहि संबंध नाहीं ना या भानगडीशीं ?—त्यांची शपथ घे न् खरं सांग—"

" नाहीं, नाहीं. माझा कांहींहि संबंध नाहीं या भानगडीशीं. तूं विनाकारण घाबरलीस ताई—"

" कुणाला ठाऊक विनाकारण कीं सकारण तें ! मला आतांशा पुढच्या क्षणीं काय होईल याचा भरंवसा वाटेनासा झाला आहे—"

हे शब्द तिच्या तोंडून बाहेर पडतात न पडतात, तोंच दद्दांची मोठी मोटार कमानीखालीं येऊन उभी राहिली—

आणि तिच्यांतून उडी टाकून धांवत वर आलेली ऊर्मिला घाबऱ्या घाबऱ्या म्हणाली—

" ताई ग, घरीं चल आधीं तूं माझ्या बरोबर ! राघा कीं नाहीं अगदीं बेफाम झाला आहे आज ! जें हातीं लागेल तें फेंकून मारतोय सगळ्यांना ! मी काकांकडे गेलें होतें आधीं.—पण ते एकाएकीं एक्सप्रेसनं मुंबईला गेल्याचं कळलं ! म्हणून तशीच इथं आलें. वहिनी बिचारी रडते आहे सारखी ! आणि तो तर कुणाला आवरत नाहीं !—"

कांता उठून मुकाट्यानें तिच्या मागोमाग मोटारींत येऊन बसली; व उमा पुढच्या बाजूला ड्रायव्हरजवळ बसला.

मोटार चालूं होतांच ऊर्मिलेनें तिला घट्ट मिठी मारून रडत रडत म्हटलें, " ताई, कसं व्हायचं ग आपलं ?—"

" मी सुद्धां त्याचाच विचार करतें आहे, ऊर्मी ! दद्दांनीं बाईना आपल्या इस्टेटीचे मालक केलें. पण त्यांच्या हें लक्षांत आलं नाहीं कीं, पुरुष हा कर्णाच्या कवचकुंडलांप्रमाणं, सगळ्या प्रकारचे स्वयंभू हक्क बरोबर घेऊन जन्माला येत असतो !—पण ऊर्मी, असं धीर सोडून न् रडून चालणार नाहीं आतां. दगडासारखं घट्ट मन करून आपल्याला तोंड द्यावें लागणार आहे या परिस्थितीला—"

" कसं करायचं ग घट्ट मन, ताई ? तूं आजचा त्याचा अवतार पाहिला नाहींस अजून ! घरांतल्या सगळ्या सुंदर वस्तूंची नासधूस चालवली आहे त्यानं !— "

" ज्यांनीं स्वतःच्या आयुष्याची आणि संसाराची नासाडी केली, त्यांना दुसऱ्या कोणत्या वस्तूंची मातब्बरी वाटणार आहे आतां ? दद्दांनीं एवढ्या हौसेनं बांधलेला आणि त्यांच्या कर्तृत्वाचं एका परीनं स्मारक असलेला ' सागर व्हिला'च काय तो सुटला होता त्यांच्या तावडींतून ! दद्दाचं वैभव त्यांच्या मागोमागच जावं असं जर विधिलिखित असलं, तर तें थोडंच टळायचं आहे !"

" पण दद्दांना जाऊन अद्याप तीन वार सुद्धां झाले नाहींत ग !— "

" अग, ज्यांनीं आपल्या अविचारी वर्तनानं त्यांचं मरण जवळ ओढवून आणलं, त्यांना काय वाटायचं आहे त्याबद्दल ?— "

मोटार ' सागर व्हिला 'च्या आवारांत शिरल्याबरोबरच बंगल्याच्या दुसऱ्या मजल्यावरच्या आपल्या खोलींत राधामोहन मोठमोठ्यानें करीत असलेली बडबड कांताच्या कानांवर आली; व मोटारीचा आवाज ऐकतांच त्यानें खिडकींत येऊन आपल्याकडे बघितल्याचेंहि तिला दिसलें.

मालिनी तिची वाट पहात व्हरांड्यांत उभीच होती. सरसाहेबांचे म्हातारे

चपराशी आणि इतर नोकर पटांगणांत उभे राहून एकमेकांशीं हळुहळू कुज-बुजत होते.

कांता आणि ऊर्मिला वर आल्याबरोबर मालिनी म्हणाली, "मृत्युपत्राचा सूड घेणं चाललंय आज घरीं आल्यापासून!"

तोंच राधा तणतणत खालीं आला आणि तावातावानें ओरडून म्हणाला, "हिला कोणी आणलं बोलावून इथं?"

"मी बोलावून आणलं–"

"तूं? तूं कोण हिला बोलावणार?"

"या घराच्या मालक आहेत न् त्याच नात्यानं त्यांनीं मला बोलावून आणलंय इथं!–"

"तुझा काय हक्क आहे या घरांत येण्याचा?–"

"हाच प्रश्न उलट तुम्हांलाहि विचारतां येईल मला!"

"कांता, तूं माझा अपमान करूं नकोस! मी फार भयंकर मनुष्य आहे!––"

"तें दिसतंच आहे आम्हांला! तुमचा अपमान करावा अशी कोणा-चीच इच्छा नाहीं. पण तुम्ही मात्र आपला अपमान करून घ्यायचा निश्चय केलेला दिसतोय–"

"संध्याकाळीं वाचलेल्या मृत्युपत्राची धुंदी आहे तुमच्या डोळ्यांवर!–"

"आमच्या डोळ्यांवर कसलीच धुंदी नाहीं!–"

"—पण लक्षांत ठेवा, माझी इस्टेट मी कोणालाहि पचूं देणार नाहीं! तुम्हांला जर वाटत असेल कीं, त्या मृत्युपत्राच्या जोरावर तुम्ही या घरांत मला पेन्शनर करून ठेवाल, तर ती तुमची चूक आहे! तें मृत्युपत्र चुकीचं न् खोटं आहे. मी गुप्तांशीं साऱ्या गोष्टी बोलून आलों आहे संध्याकाळीं! दद्दांनीं मृत्युपत्र केलं त्या वेळीं डोकं ठिकाणावर नव्हतं त्यांचं! नाहीं तर असलं बेकायदेशीर मृत्युपत्र कधीं केलं नसतं त्यांनीं! मला माहित आहे तूं इथं कां आली आहेस तें!––दद्दा जिवंत असतांना प्रियानं दावा साधला माझा माझ्या-विरुद्ध त्यांचे कान भरून! आणि आतां तूं आली आहेस या मूर्ख बायकोला

चिथावणी द्यायला ! तुम्हा नवराबायकोचा पहिल्यापासून इस्टेटीवर डोळा आहे आमच्या— ”

“ राधा, तूं काय बोलतो आहेस हें ?—”

“ उमा, तूं कशाला मध्यें बोलतोस ? त्यांना काय समजत नाहीं का आपण खोटं बोलतों आहोंत हें ?— ”

“ मी खोटं बोलतों ? माझ्या घरीं येऊन माझा अपमान करतेस ? बाहेर हो आधीं घराच्या !— ”

“ तुम्ही कितीहि थैमान केलंत तरी मी हलणार नाहीं इथून, भाऊजी ! दादांची पुढच्या व्यवस्थेबद्दल काय इच्छा आहे, हें कळलेलं आहे तुम्हांला आज ! तेव्हां तुम्हांला जर या घरांत राह्यचं असेल, तर गुण्यागोविंदानं राह्यलं पाहिजे ! तुमच्या खोलींत बसून तुम्ही काय वाटेल तें करा ! पण असले प्रकार यापुढं चालूं देणार नाहीं आम्हीं !– ”

“ तुम्ही कोण ? मी तुम्हांला ओळखीत नाहीं कुणाला ?– ”

“ तुम्ही ओळखीत नसाल ! पण जग आम्हांला ओळखतं, कायदा आम्हांला ओळखतो !– ”

“ कायद्याच्या गोष्टी तूं मला सांगतेस ? थांब, मी शिकवतों तुला कायदा ! कायदा माझ्या मनगटांत आहे !– ”

असें म्हणून त्यानें व्हरांड्यांतील टेबलावर असलेलें मोठें थारलें पुष्पपात्र उचललें—

आणि, तें तो कांताच्या अंगावर भिरकावणार, तोंच ती म्हणाली—

“ ठेवा तें फ्लावरपॉट होतं तिथें ! आपण काय करतों आहोंत याचं कांहीं भान आहे का तुम्हांला, भाऊजी ? तुमच्या असल्या आततायीपणानं कुणीहि दबून जाणार नाहीं यापुढें ! या घरांत तुमची काडीचीहि सत्ता नाहीं हें आज कळून चुकलं आहे सगळ्यांना !—”

“ माझी सत्ता नाहीं ? मग कुणाची सत्ता आहे ?—”

" तें माहित आहे तुम्हांला ! न् मघांशीं तुम्हीं आपल्या तोंडानं कबूलहि केलं आहे तें ! "

" खोटी गोष्ट ! मी कोणाचीहि मालकी कबूल केली नाहीं न् करणार नाहीं ! मला माझ्या बायकोचा पेन्शनर बनवायला पाहतां काय तुम्हा ? थांबा, तुम्हांला आठ दिवसांच्या आंत दाखवतों या घरावर कोणाची सत्ता आहे तें ! ज्या दिवशीं मीं तुम्हांला घराबाहेर काढीन, त्याच दिवशीं पाऊल ठेवीन पुन्हा या घरांत !—"

तो तसाच व्हरांड्यांतून खालीं उतरला; गॅरेजमधून त्यानें आपली मोटार बाहेर काढली; व कोणाशीं एक शब्दहि न बोलतां तो चालता झाला.

तो जाईपर्यंत सर्वच मंडळी अगदीं गप्प होती.

त्याची मोटार दृष्टिआड झाल्यावर मालिनीनें म्हटलें, " हें काय केलंत तुम्हीं, बाई ? लोक काय म्हणतील आपल्याला ? ते कुठं जातील अशा अपरात्रीं ?—"

" लोक जें म्हणायचं तेंच म्हणतील, बाई ! ज्यांचा त्यांनीं सल्ला घेतला म्हणून ते सांगत होते, त्यांच्याकडेच जातील ते ! मला वाटलं नव्हतं संध्याकाळीं ते आज असा प्रकार करतील म्हणून ! गुप्तासाहेब चांगलेच जागले म्हणायचे दद्दांच्या उपकारांना ! काय अनुभव येताहेत माणसांचे एक एक या दोन तीन आठवड्यांत !—"

ती रात्र त्यांनीं जवळ जवळ जागूनच काढली.—

कारण, त्यांना सारखें वाटे कीं राधामोहन कोणत्या क्षणीं परत येईल आणि काय धिंगाणे करील कोण जाणें !

सकाळीं मालिनी कांताला म्हणाली, " कदाचित् येतील ते जेवणाच्या वेळेपर्यंत ! गुप्तांकडे चौकशीला माणूस पाठवूं का ?—"

" कांहीं कुणाला पाठवूं नका ! आले, तर घर त्यांचंच आहे !—"

" मग तुम्ही तरी जाऊं नका संध्याकाळपर्यंत. एकदां काय तड लागते आहे ती कळूं द्यां न् मग जरूर वाटलं तर जा तुम्ही !—"

कांतानें त्या दिवशीं तिथें राहण्याचें कबूल केलें.

पण, दुपारीं अकरा वाजले, तरीहि राधा आला नाहीं.

अखेर बारा वाजून गेल्यावर त्या दोघी कंटाळून जेवावयाला बसल्या.

त्या पहिला घास घेतात न घेतात, तोंच उमा घाईघाईनें आंत आला—

—आणि त्यांना म्हणाला. "गुप्तेवाकूनीं आज राधाचा तक्रारअर्ज दाखल केला कोर्टांत इस्टेटीचा कबजा मिळण्याबद्दल !—"

ती बातमी ऐकतांच कांताच्या हातांतील घांस गळून पडला.

आणि पाण्याचा घोट घेऊन ती उद्गारली, "आपली उत्तरक्रिया अशा रीतीनं करण्यांत येईल हें स्वप्नांतहि आलं नसेल दद्दांच्या !—"

# २०

# जीवनाची सफलता

" तुझ्या मनांत आहे तरी काय आज, जया ?—"

" कांहीं नाहीं. मी तुझ्यावर रागावलों आहे आज, श्यामा ! तूं मला फसवलंस; अठरा तारखेला काय होणार हें तुला माहित असतांना सुद्धां तूं माझ्यापासून तें लपवून ठेवलंस—"

" पण जया, मला माहित होतं हें आधीं खरं नाहीं तुझं म्हणणं—"

" खरं नाहीं ? आतां मला फसवणं शक्य नाहीं तुला, श्यामा ! जयंताचें जें पत्र मला आज दुपारीं मिळालं, त्यांत स्पष्टच लिहिलंय त्यानं—"

" काय लिहिलंय त्यानं ? आल्याबरोबर दाखवायला हवं होतंस तूं तें पत्र मला—"

" कां म्हणून ? तूं मला दाखवतेस तुला आलेलीं जयंताचीं पत्रें ?—"

" पण जया, तीं बंगालींत लिहिलेलीं नसतात का ?—"

" मी जर मला आलेल्या मराठी पत्रांचा अनुवाद तुझ्यासाठीं करूं शकतों, तर तुला नाहीं करतां येत का माझ्यासाठीं बंगालीचा हिंदी ?—"

" पण जया, असा भलताच समज करून घेऊन अडवूं नकोस तूं मला ! सांग ना मला जयानं काय लिहिलंय तें—"

" पत्रांत तसं विशेष कांहींच नाहीं ! तूंच वाचून पहा. तुला सहज समजेल—"

त्यानें खिशांतून काढून पत्र तिच्यापुढें टाकलें आणि तो उठून खिडकी-जवळ जाऊन उभा राहिला.

श्यामानें तें पत्र पुन: पुन्हा वाचलें.

कृष्णा बिल्डिंग, परळ
२१।४।३०

प्रिय जया,

तुला हें माझें बहुतेक शेवटचेंच पत्र. मी कोणत्या क्षणीं पकडला जाइन याचा कांहीं नेम नाहीं, श्यामा तुला सांगेल सर्व कांहीं.

मजजवळ असलेलीं तुमचीं सर्व पत्रें मी जाळून टाकलीं आहेत आणि तुमच्याजवळ असलेलीं माझीं सर्व पत्रेंहि तुम्हीं जाळून टाका. तुम्हांला बहुतेक कांहीं त्रास होण्याचा संभव नाहीं. जर कदाचित् झालाच तर त्या रिव्हॉल्वर्समुळें ! कारण ते कलकत्त्याहून आणलेले होते. पण, जया, तूं तो रिव्हॉल्वर खरोखरीच नाहींसा केलास ना ? उमानं मला कळवल्याप्रमाणें जर त्याला तूं जलसमाधि दिली असशील, तर मग तुम्हांला फारशी भीति नाहीं.

माझें काय होईल हें कांहीं मला सांगवत नाहीं. पण मला एकाच गोष्टीचा अभिमान वाटतो. गुप्त कटांच्या मार्गावरला माझा विश्वास अलिकडे कमी कमी होत चालला होता. पण त्यांची उपयुक्तता मला अद्यापिहि जाणवते; व चितागांगच्या या यशस्वी प्रयत्नामुळें त्या उपयुक्ततेची एक नवीन बाजू माझ्या प्रत्ययाला आली आहे. चित्तागांगचें यशस्वी अपयश हें अनेक दृष्टींनीं स्फूर्तिदायक आहे.

जया, ती स्फूर्ति तुम्हांलाहि कार्यप्रवृत्त करील, अशी मला आशा आहे.

सोबत नखाचित्र आहे, तें श्यामाला दे. तिला म्हणावें, ही माझी तुला शेवटची भेट.

सदैव तुमचा
जयंत

त्या पत्राचा अर्थ नीट कळलासा वाटल्यावर श्यामा उठली आणि जयाच्या जवळ आली.

तो सिगारेट ओढीत खिडकींतून बाहेर पहात होता.

ती त्याच्या खांद्यावर हात ठेवून आर्जवयुक्त स्वरांत म्हणाली, "जया, तूं जयंताचं पत्र मला पुरतं नाहीं दाखवलंस!——"

त्यानें आपल्या खांद्यावरून तिचा हात काढला; व कोटाच्या खिशांतून कार्डाच्या आकाराचा एक जाड कागद काढून तिला दिला.

तिनें उत्सुकतेनें त्या कागदाकडे बघितलें.

त्याच्यावर तिचें नखचित्र कोरलेलें होतें.

तें आपलें नखचित्र पाहतांच तिचे डोळे भरून आले आणि ती मुकाट्यानें खुर्चीवर येऊन बसली.

जया तिच्यामागें जाऊन उभा राहिला आणि त्यानें हळूच तिला हांक मारली—

"श्यामा—"

तिनें मागें वळून त्याच्याकडे पाहिलें आणि तिला जोराचा हुंदका आला.

तो क्षणैक थांबला. नंतर अगदीं गंभीरपणानें म्हणाला, "जयंताच्या हृदयावरसुद्धां तुझं चित्र असंच कोरलेलं असेल नाहीं? तुला इतकी चांगली देणगी दुसरी देतां आली नसती त्याला! तें चित्र पाहिल्यावर मला माझी चूक कळून आली—"

"कसली चूक, जया?——"

तिनें त्याचा हात आपल्या हातांत घेऊन विचारलें.

"मी तुझ्यापासून प्रेमाची अपेक्षा करण्यांत चूक झाली माझी. जयंता-सारखा मी शूर न् गुणी नाहीं. तुझ्या प्रेमाला मी लायक नाहीं, श्यामा!—"

"तुझं हें म्हणणं बरोबर नाहीं, जया! लायकी आणि नालायकी ही नेहमीं सापेक्ष असते. जयंताच्या परिस्थितींत जर तूं वाढला असतात, तर कदा-चित् त्याच्यापेक्षां जास्त साहसं तुझ्या हातून घडलीं असतीं. जयंतावर त्याच्या

वडिलांच्या आयुष्याचा फार परिणाम झाला. त्याच्या वडिलांनीं टिळकांचें शिष्यत्व पत्करल्यामुळें त्यांच्या कुटुंबाची जी वाताहत झाली, तिनें त्याला क्रांतिवादी बनविला! पारतंत्र्याच्या आंचेनं ज्यांचीं जीवितं होरपळून जातात, त्यांनाच त्याचा उच्छेद करण्याची आवश्यकता तीव्रतेनं जाणवते! जया, तुला पारतंत्र्याची जाणीव होण्याचं कांहीं कारणच नव्हतं मुळीं! उलट इतर बड्या सरकारी अधिकाऱ्यांच्या मुलांप्रमाणं तूं पारतंत्र्याचा पुरस्कर्ता झाला नाहींस याचंच मुळीं आश्चर्य वाटतं मला! राजकीय चळवळींत पडल्यामुळं एखाद्याच्या आयुष्याचा किंवा कुटुंबाचा नाश झाल्याबद्दल जेव्हां लोक हळहळतात, तेव्हां मला नवल वाटतं त्यांचं! त्यांना ही साधी गोष्ट कळत नाहीं कीं, नाश पावलेल्या त्या प्रत्येक व्यक्तीच्या आणि कुटुंबाच्या मागें पारतंत्र्याचा सूड घेण्याच्या ईर्ष्येनें प्रेरित झालेलीं अनेक माणसं निर्माण होत असतात. साहस हें ईर्ष्येशिवाय होत नसतं! वंगभंगाच्या चळवळींत जर अनेक कुटुंबांची राखरांगोळी झाली नसती, तर क्रांतिवादाचा पवित्र अग्नि बंगालमध्यें आजपर्यंत उफाळत राहिला नसता! जया, मुलांचं आयुष्य त्यांचे आईबाप, त्यांची कौटुंबिक परिस्थिति बनवीत असते नेहमीं—"

"श्यामा, तुला माहीत होतं ना अठरा तारखेला शस्त्रागारावर हल्ला होणार म्हणून? मग तूं तें लपवून कां ठेवलंस माझ्यापासून? मी तुझ्या प्रेमाला लायक असतों, तर तुला अशा रीतीनं वागण्याचं धैर्य झालं नसतं माझ्याशीं!—"

"जया, तूं लहान मुलासारखं बोलतो आहेस खरोखरी! अठरा तारखेला कांहीं तरी होणार आणि तें चितागांगलाच होणार एवढीच कल्पना होती मला फक्त! यापेक्षां जास्त कांहीं माहीत नव्हतं—"

"पण हें तरी तूं कां नाहीं सांगितलंस मला?—"

"तें सांगून काय उपयोग होता, जया?—"

"मी गेलों असतों जयंताच्या मागोमाग डाकचाला!—"

"आणि त्याला संकटांत घातला असतास!—"

"तें कसं काय?—"

" तूं डाक्क्याला गेला असतास तर तुझ्या वडिलांना संशय आल्या-शिवाय राहिला असता का ?—"

" खरंच श्यामा, आज साहेबांना तार आली संध्याकाळीं एकाएकीं आणि ते मुंबईला गेले—"

" मुंबईला गेले ? त्यांचं या वेळीं मुंबईला जाणं मोठं सूचक आहे, जया !—"

" ते रिव्हॉल्वर नडणार आहेत आपल्याला असं वाटतं मला, श्यामा !—"

" पण उमानं साहेबांच्या खोलींतून आणलेला तो रिव्हॉल्वर तुम्हीं तेलं-खेडींत टाकून दिला ना रे ?—"

" नाहीं ! मजजवळ आहे तो अद्याप ! मी फक्त जयंताला उगाच काळजी वाटूं नये म्हणून उमाकडून त्याला पत्र लिहवलं तसं ! ते रिव्हॉल्वर जर आतां आपल्याला नडणारच असतील, तर नडण्यापूर्वी उपयोग तरी कां करूं नये त्यांचा ?—"

" पण तो कसा करणार ?—"

" काल सायंकाळीं 'पत्रिकें'त आलेली शस्त्रागारावरील हल्ल्याची सविस्तर हकीगत वाचल्यापासून एक कल्पना घोळते आहे सारखी माझ्या मनांत ! सध्यां पचमढीहून येथें बड्या अधिकाऱ्यांच्या येरझारा सुरू आहेत ! आपण जर मनांत आणलें, तर आपल्याला तामियाच्या जंगलांत उपयोग करतां येईल त्या रिव्हॉल्वरचा !—"

" जया, काय म्हणतोस तूं हें ? तुझी खात्री आहे ?—"

तिनें आनंदानें त्याचे हात घट्ट धरून विचारलें.

" पण तुला कल्पना पसंत आहे का ही ?—"

" हो. पण हें शक्य आहे ? आपल्याला साधेल हें ? मला फार इच्छा आहे तुमच्याबरोबर यायची !—"

" न साधायला काय झालं ? तूं, मी न् चारु तिघांनींच फक्त जायचं. मोटार आहेच आमची. आपल्याला कोणी तरी साहेब खात्रीनं भेटेल तामियाच्या डाकबंगल्याजवळ !—"

" पण अशी कोणाची तरी शिकार करण्यांत स्वारस्य नाहीं, जया! तूं नक्की पत्ता काढ आणि व्यवस्थित काम करूं या—"

" साहेब मुंबईहून परत यायच्या आंत सारं कांहीं पार पडलं पाहिजे—"

" होय, तें तर आहेच. नाहीं तर खजिना लुटण्याची आपली जुनी कल्पना आहेच—"

" पण जयंताला अटक झाल्याचं ऐकल्यापासून त्या कल्पनेचं आकर्षण मला उरलं नाहीं आतां फारसं! आतां पैसे मिळाले तरी त्यांचा उपयोग काय? आपला मार्गदर्शक तर गेला! आजच्या 'पत्रिकें'त मी जेव्हां त्या चितागांगच्या हल्ल्याचं रोमांचकारी वर्णन वाचलं, तेव्हांपासून माझ्या मनांत सारखं येत आहे कीं आपणहि असंच कांहीं तरी केलं पाहिजे! आणि आज जयंताबद्दलची बातमी वाचल्यावर तर तो विचार पक्का झाला माझा! त्याला अटक झाल्यावर मी मोकळं रहावं हें बरं नाहीं वाटत माझ्या मनाला—"

" पण, जया, हा बेत पार पडेल अशी खात्री आहे ना तुझी? मला फार भीति वाटते तुझ्या साहेबांची! जयंताच्या पत्रांतलं तें रिव्हॉल्वर्ससंबंधींचं वाक्य वाचल्यापासून मला कससंच वाटतंय! सी. आय. डी. जवळ खात्रीनं नंबर टिपलेले असतील त्या रिव्हाल्वर्सचे—"

" तुझी भीति अगदीं रास्त आहे, श्यामा! साहेब मुंबईला गेले त्याच वेळीं मला वाटलं कीं जयंताच्या उद्योगाचे धागेदोरे कोठपर्यंत पसरलेले आहेत याचा तलास लावण्यासाठींच त्यांना बोलवण्यांत आलं असलं पाहिजे—"

तो हें वाक्य बोलत असतांनाच ती एकदम उठली आणि त्याच्या अगदीं जवळ जाऊन म्हणाली—

" जया, मी आजपर्यंत तुझ्यापासून लपवून ठेवलेली एक गोष्ट सांगणार आहे तुला—"

" कोणती गोष्ट?—"

" डाक्क्याच्या कमिशनरच्या ज्या खुनाबद्दल भाई फांसावर गेला, तो खून त्यानं केलेला नव्हता—"

" मग कोणी केला होता?—"

" गोळ्या दोघांनींहि झाडल्या, पण जयंताच्या गोळ्यांनीं काम दिलं. तुला आठवत असेल कदाचित् त्या वेळीं वर्तमानपत्रांतून दुसरा आरोपी फरारी झाल्याची बातमी आली होती ! दोघांपैकीं कोणीतरी एक फांसावर जाणार हें नक्की ठरलेलंच होतं. म्हणून भाई फांसावर गेला—"

तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले.

" किती विलक्षण स्वार्थत्याग !—"

" स्वार्थत्याग नाहीं त्यांत ! केवळ सोय पाहिली दोघांनींहि ! तुझे वडील मुंबईला गेल्याचं मघाशीं कळल्यापासून माझ्या मनांत सारखी कल्पना येते आहे कीं, जयंताच्या पूर्वेतिहासाचा आतां छडा लावला जाईल न् कदाचित् माझ्या-पर्यंत हें प्रकरण येऊन पोंचेल—"

" पण त्या दोघांनीं वेषांतर केलं होतं ना त्या वेळीं !—"

" होय. आणि त्यानंतर जयंताच्या चेहऱ्यांत फरकहि पडला आहे आतां पुष्कळ. शिवाय कानपूरच्या त्या आगींत होरपळल्यामुळं तर तोच हा माणूस असं पोलिसांना ठरवणं अशक्यच होईल ! पण त्याचा काय नेम सांगावा ? म्हणून मला वाटतंय कीं, या अटकेंतून आणखी कांहीं भानगड उत्पन्न होण्या-पूर्वीं माझ्या जीवनाचं सार्थक व्हावं ! जया—"

तिनें खालीं बसून त्याचे हात एकदम घट्ट धरले; व आपले अश्रुपूरित नेत्र त्याच्या चेहऱ्यावर स्थिर करून ती म्हणाली—

" मी—मी फक्त एकट्यानं त्या रिव्हॉल्वरचा उपयोग करीन !—"

तो कांहीं बोलला नाहीं. त्याच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले आणि त्यानें खालीं वाकून तिच्या दोन्ही भुवयांच्या मधल्या भागाला ओठांनीं स्पर्श केला.

" जया, तूं कबूल केलं पाहिजेस, वचन दिलं पाहिजेस मला ! भाईच्या मरणापासून मी वाट पहातें आहें या संधीची ! आतां जयंताला अटक झाली, —माझं या जगांत काय उरलं आहे ? म्हणून या संधीचा पूर्ण फायदा तूं मला दिला पाहिजेस. माझ्या जीवनाचं सार्थक झाल्याचं, भाईच्या मरणाचा मोबदला घेतल्याचं समाधान मला लाभूं दे ! पहिल्यांदा रिव्हॉल्वर मला चालवूं द्या. मला

जमत नाहीं असं जर तुम्हांला वाटलं, तर मागाहून तुम्हीं चालवा.—जया, तूं बोलत कां नाहींस ?—"

"श्यामा, मी वचन देतें तुला ! पण तें मागतांनासुद्धां मर्मावर डागण्या दिल्यास तूं माझ्या ! जयंताला अटक झाल्याबरोबर जग तुला शून्य वाटलं ! माझ्या प्रेमाला कांहींच का किंमत नाहीं तुझ्या दृष्टीनं ?—"

"जया, खरं प्रेम, उत्कट प्रेम हें आयुष्यांत फक्त एकदांच करतां येतं ! त्यांतल्या उत्कटतेचा उन्माद नंतर दुसऱ्या कोणत्याहि प्रेमसंबंधांत अनुभवाला येत नाहीं. मनुष्याचा हा स्वभावच आहे कीं, एक प्रेमविषय नाहींसा झाला, म्हणजे दुसरा प्रेमविषय तें हुडकून काढतें आणि हृदयाचा रितेपणा कायम राहूं देत नाहीं आपल्या ! पण त्या नंतरच्या प्रेमामुळं मनाला केवढाहि विरंगुळा वाटला, तरी पहिल्या प्रेमाचा उन्माद आणि आनंद त्यांत कधीहि नसतो. जया, मी हें स्वतःच्या अनुभवानें सांगतें आहे तुला. केवळ कविकल्पना नव्हे. जयंतापेक्षां तूं किती तरी अधिक मोहक आहेस आणि किती तरी वेळां तुझ्या त्या मोहकतेनं माझं मन भारून टाकलं आहे ! पण मला हें त्याच क्षणीं जाणवत आलं आहे,—हा मोह आहे, प्रेम नव्हे. प्रेम मी एकावरच केलं; माझं हृदय मी एकालाच दिलं. दुसऱ्याला तें देणं मला अशक्य आहे आतां, जया, मी तुझ्या मर्मावर डागण्या दिल्या नाहींत. फक्त माझ्या हृदयाची जखम तुला उघडी करून दाखविली—"

"श्यामा ! श्यामा ! —"

"नको, नको जया ! तुझ्या शब्दांनीं आणि अश्रूंनीं पिळवटून निघालंय माझं अंतःकरण ! तूं आज मला वचन देऊन माझ्यावर एवढे उपकार केले आहेस कीं, तुला जरी माझं सर्वस्व दिलं, तरी उतराई होतां येणार नाहीं मला या तुझ्या उपकारांतून ! —"

तिनें त्याला जवळ ओढला आणि त्याचें मस्तक कुरवाळून त्याच्या कपाळाचें पुनः पुन्हां चुंबन घेतलें.

त्यानंतर तीं दोघेंहि कांहीं वेळ अगदीं स्तब्ध होतीं.

नंतर त्याचे डोळे आपल्या पदरानें पुसून तिनें हळूच त्याला म्हटलें, " पण, जया, आपला हा बेत तडीस जाईल ना ?–"

" मीं सुद्धां त्याचाच विचार करतों आहे मघांपासून. उद्यां साहेबांचं पत्र किंवा तार कांहीं तरी येईल. माझा अंदाज असा आहे कीं, ते बहुधा स्पेशल ड्यूटीवर मुंबईला गेले असले पाहिजेत; न् तसं जर असेल, तर ते लवकर परत येण्याचा संभव नाहीं फारसा. निदान आठ दिवस तरी मोडतील त्यांचे. तेवढ्या अवधींत आपल्याला उरकला पाहिजे आपला कार्यभाग—"

" त्याबरोबरच पचमढीहून कोण केव्हां येत आहे याचीहि माहिती मिळविली पाहिजे तुला–"

" ती मिळूं शकेल सहज. पण आपण तिघांनींच जायचं ना ?–"

" हो. मला वाटतं आपल्या या नव्या बेताची वाच्यता करणं इष्ट नाहीं मुळींच. का ? तुझ्या मनांत उमाला घ्यायचा आहे ?—"

" छे, छे ! माझ्या मनांत निशी आणि छगन यांना घेण्याची कल्पना आली होती ! पण जितके रिव्हॉल्वर्स तितकीं माणसं हा हिशोब बरोबर आहे तुझा ! आपल्याजवळ उमानं साहेबांच्या खोलींतून आणलेला एक आणि चारूनं मिळविलेले दोन असे सध्यां तीनच रिव्हॉल्वर आहेत मुळीं ! तेव्हां आपण फक्त तिघांनींच गेलेलं बरं–"

" मोटार घरचीच घेणार तूं ?—"

" हो. ती घेणं सर्वच दृष्टींनीं सोईचं आहे. माला वाटेल मी पारड-शिंग्याला जातो आहे नेहमींप्रमाणं. शिवाय ती चालविण्याची मला संवय असल्यामुळं न् तिच्या मेकचीहि सर्व माहिती असल्यामुळं वाटेंत कांहीं विघ्न येण्याचा संभव नाहीं. तामियाच्या जंगलांत शिरल्याबरोबर नंबराची पाटी काढून टाकली म्हणजे झालं !–"

" आपला हा बेत सर्व ठीक जमला–"

" आणि तो तडीलाहि जाईल नीट—"

इतकें बोलून तो एकदम उठला आणि जायला निघाला. तो दारापर्यंत गेला नाहीं, तोंच श्यामानें त्याला हांक मारली—

" जया—"

तो मागें वळला.

" तुझ्या मनांतून गेलेली दिसत नाहीं मवांचची गोष्ट ?—"

" श्यामा, कांहीं जखमा जन्मभर वहात राहतात न् जीवनाचे सर्व रस शोषून घेतात !—"

तो दाराशीं उभा राहूनच बोलत होता. दिव्याच्या उज्ज्वल प्रकाशांत त्याची गव्हासारखी सांवळी कांति खुलून दिसत होती. हाफशर्ट आणि हाफपँट यांनीं अर्धवट आच्छादिलेल्या त्याच्या शरीराची सुदृढता तिच्या मनाला त्याच्या कांतीपेक्षांहि आकर्षक वाटली. त्याचें उंच कपाळ, अस्ताव्यस्त झालेले किंचित् रांठ केंस, तिच्या मनाचा ठाव घेत असलेले भावपूर्ण डोळे, कडेला पीळ भरलेली टोंकदार मिसरूड आणि शरीराची सुदृढता दर्शविणारे मानेचे ताठ स्नायु—त्याच्याकडे पहातां पहातां तिच्या मनांत विचार आला कीं, आतां जगांत एवढाच एक आधार आपल्याला उरला आहे. जयंताचें भवितव्य तिला स्पष्टच दिसत होतें. तिच्या भाईच्या मृत्यूनंतर गेलीं चार पांच वर्षें तोच खरोखरी तिचा जीवनाधार होऊन बसला होता; व नागपुरास आल्यावरहि मामाची इतकी माया तिच्यावर असतांनासुद्धां, जयंताविषयींची तिची आसक्ति यत्किंचितहि कमी झाली नव्हती.

त्यामुळें आज त्याच्या अटकेची बातमी कळल्यापासून तिला एकदम आपलें जीवित शून्य झाल्यासारखें वाटलें, जीवनाचा झरा सुकल्यासारखा वाटला. त्या क्षणापासून ती सारखा विचार करीत होती, आतां आपलें भवितव्य काय आहे ? आपल्या आवडत्या भाईच्या हत्येचा सूड घेण्याची जी आकांक्षा आजवर आपण मनांत बाळगली, ती विफल होणार कीं काय ? आपण आतां कशासाठीं आणि कोणासाठीं जगणार !

या नैराश्यपूर्ण विचारांत तिचें मन चांचपडत असतांनाच जया आला आणि रिव्हॉल्वर्सचा उपयोग करण्याचा तो आपला नवा बेत सांगून त्यानें तिला सूड घेण्याची संधि दाखवून दिली !

बनारसच्या त्या प्रसंगाची तिला आठवण झाली. तिथें असतांना तिनें एकंदां जयंताला सहज म्हटलें होतें कीं, भाईच्या हत्येचा सूड तुझ्याकडून घेतला जाण्यापेक्षां तो मी माझ्या हातांनीं घ्यावा अशी माझी इच्छा आहे! ते तिचे उद्गार ऐकून तो किंचित् उपहासानें हंसला आणि तिला म्हणाला, "श्यामा, तुझे कोमल हात रक्तानें भिजावेत असें मला वाटत नाहीं. स्त्री ही जन्म देण्यासाठीं आहे. तिनें मृत्यूला कारण होणें म्हणजे तिच्या जीवनहेतूची विकृति होय. तूं महाभारताचा अभ्यास भक्तीनें केला आहेस. अश्वत्थाम्याला ज्या वेळीं कृष्णार्जुनांनीं पकडून द्रौपदीपुढें आणला, त्या प्रसंगाची आठवण कर. आपल्या पोराबाळांची झोंपेंत कत्तल करणाऱ्या त्या नराधमाचा अर्जुन शिरच्छेद करावयाला तयार झाला होता. पण द्रौपदीनें त्याला जीवदान दिलें! स्त्री ही जननी आहे. तिनें केव्हांही हत्या करतां कामा नये. ती ज्या दिवशीं हत्या करील, त्या दिवशीं तिच्या हृदयांतील सारी कोमलता, सारा स्त्रीभाव नष्ट होऊन जाईल! महिषासुराच्या वधानंतर रणावेशानें बेफाम होऊन काली जेव्हां प्रेतांच्या राशी तुडवीत नृत्य करूं लागली आणि तिच्या त्या कठोर पदाघातां-खालीं त्रिभुवनाचा चक्काचूर होण्याचा जेव्हां प्रसंग आला, तेव्हां स्वतः महादेवा-नें प्रेतरूप धारण करून तिच्या शरीरांतील तेज शोषून घेतलें आणि तिला शांत केली, हें तुला माहितच आहे. स्त्री ही जीवनदात्री शक्ति आहे; संहार करणारी नव्हे!—"

त्या नंतर मुंबईला गेल्यावर जयंताच्या मतांत बदल होऊन तो कम्यु-निस्ट विचारसरणीकडे झुकूं लागला. तरी सुद्धां तिनें स्वतः सूड घेण्याची कल्पना त्याला कधींहि पसंत पडली नाहीं.

स्त्रीजातीला कमी लेखण्याची, दुर्बल मानण्याची जी पुरुषाची पिढ्यान् पिढ्या चालत आलेली प्रवृत्ति, तिचा तर हा परिणाम नसेल?—

पण तेंच जयानें मात्र आढेवेढे न घेतां आपल्याला चटकन् वचन दिलें; ज्या संधीसाठीं आपलें मन गेलीं चार वर्षें सारखें तळमळत होतें, ती त्यानें आपल्याला तत्परतेनें मिळवून दिली! जयंत आणि जया या दोघांचेंहि आपल्या-वर उत्कट प्रेम आहे. पण दोघांच्या वृत्तींत केवढा हा फरक!

जयंतानें आपल्यावर प्रेम केलें; पण त्या प्रेमाच्या जोरावर आपल्यावर सत्ता गाजविली. जयाचेंहि आपल्यावर प्रेम आहे; पण त्या प्रेमामुळें आपण त्याच्यावर सत्ता गाजवीत आहों. मग या दोहोंत कोणतें प्रेम श्रेष्ठ, कोणतें प्रेम अधिक लोभनीय? सत्ता गाजविणारें कीं गाजवूं देणारें?

जयंता म्हणाला तें एका अर्थानें खरेंच होतें. स्त्री ही देण्यासाठीं आहे, घेण्यासाठीं नाहीं आणि नाकारण्यासाठीं तर नाहींच नाहीं. स्त्री ही दानशील आहे, आक्रमशील नव्हे. स्त्रीचा जन्म हा प्रेम करण्यासाठीं आहे, प्रेम करून घेण्यासाठीं नव्हे. जगांतले सगळे दयेचे झरे आणि सगळ्या प्रीतीच्या सरिता स्त्रीच्या विशाल हृदयांतून उचंबळून बाहेर पडल्या आहेत!

मग मी जयाचें प्रेम तरी कां नाकारूं? मला त्यानें शुद्ध भावानें अर्पण केलेलें हृदय मी कोणत्या अधिकारानें लाथाडूं? माझें जीवित सफल होण्याची शक्यता ज्या प्रेमामुळें उत्पन्न झाली आहे, त्या प्रेमाचा अव्हेर करून मी त्याला कसा अन्याय करूं?

जयंताचा भास म्हणून मी प्रथम त्याच्यावर प्रेम केलें असेन. पण पुढें पुढें त्या प्रेमाला जी स्थिरता आली, ती काय केवळ त्या भासावर भाळल्यामुळें? मी तुझ्यावर जें प्रेम करितें, तें तूं जयंताचा भास उत्पन्न करतोस म्हणूनच केवळ करितें, असें जें उत्तर मी जयाला दिलें, तें देऊन मी त्या वेळीं स्वतःची फसवणूक केली! कोणत्याहि भासावर चिरकाल प्रेम करणें शक्य नाहीं. जयाकडे प्रथम भास म्हणून माझें मन ओढलें गेलें; नंतर तो सहकारी म्हणून मला प्रिय झाला आणि आज माझ्या आयुष्यांतील या दारुण निराशेच्या क्षणीं माझ्या जिवाची तळमळ तृप्त करण्याची संधि मिळवून देणारा, माझें शून्य झालेलें जीवित सफल करण्याच्या कामीं मला सहाय्य करणारा म्हणून तो मला प्रियतम झाला आहे.

मघांशींच ती म्हणाली होती त्याला, "तुला जरी मी आतां माझें सर्वस्व दिलं, तरी तुझ्या ऋणांतून मुक्त होतां येणार नाहीं मला!—"

—आणि तरीहि त्याच्या प्रेमाचा तिनें अव्हेर केला होता—

सांप्रदायिक नीतीच्या मनावर न कळत असलेल्या दडपणामुळें तर नव्हे ? —ती धांवतच त्याच्याजवळ गेली आणि तिनें त्याच्या कमरेला विळखा घातला.

ती कांहीं बोलली नाहीं; फक्त तिनें करुण नेत्रांनीं त्याच्याकडे पाहिलें.

त्याबरोबर तो खालीं वांकला; त्यानें तिचें मस्तक दोन्ही हातांनीं घट्ट धरलें आणि त्याचा श्वास तिच्या श्वासांत सांद्रतेनें मिसळला.

त्याच्या केंसांनीं तिचें कपाळ झांकलें, अश्रूंनीं तिच्या मुखावर वर्षाव केला.

जणुं कांहीं ग्रीष्मांतील तापलेल्या भुईवर प्राजक्ताचीं फुलें आणि दंवबिंदु यांचा सडा पडला.

त्या अवस्थेंत किती क्षण गेले, हें त्यांना कळलें नाहीं. त्या प्रणयमूर्च्छेनेची तंद्रा थोडी कमी झाल्यावर त्याच्या तोंडून उद्गार निघाला—

" माझी जन्मजन्मांतरींची तृषा आज शांत झाली, श्यामा ! "

ती स्तब्ध होती.

त्या अवस्थेचा आस्वाद आणि उन्माद यांनीं तिचें शरीर आणि मन जणुं कांहीं भारून टाकलें होतें.

*

# २१

# महाराष्ट्र मागें कां पडला ?

कांता ‘ सागर व्हिला ’ मधून परत आली, त्या वेळीं पंडितजी जयसिंगाशीं बोलत व्हरांड्यांत बसले होते.

त्यांना पाहून तिला आश्चर्य वाटलें.

तोंच ते पुढं येऊन म्हणाले, “ प्रियाची अटक न् नंतर ओढवलेलीं दुःखें यांनीं कांहीं म्हणण्यासारखा परिणाम झाला नाहीं तुझ्यावर असं जया आतांच सांगत होता मला. पण तूं फार रोड झालेली दिसतेस, ताई !—”

“ आपण केव्हां आलांत, पंडितजी ? ”

“ आतांच एक्प्रेसनं आलों. वास्तविक प्रियाला अटक झाल्याचं कळल्याबरोबरच यायला हवं होतं मी—”

“ काय मुद्दाम येण्यासारखं होतं त्यांत एवढं ? आपण केव्हां पाहुणचार घ्यायला जाणार आहांत सरकारचा ?—”

“ सध्यां तर पांच सहा दिवस तुझा पाहुणचार घ्यायला आलों आहे मी ! खेड्यापाड्यांतून सारखं तीन आठवडे हिंडल्यामुळं थकवा वाटायला लागला मला न् तुला भेटायचंहि होतं म्हणून यायचं ठरवलं मी—”

“ फार बरं झालं आपण आलांत हें ! मी कंटाळलें होतें या घरांत एकटी रहायला ! जया, तूं केव्हां आलास ?—”

“ मला येऊन अर्धा तास झाला असेल फार तर. पण उमा कुठं आहे, ताई ? तो तुझ्या बरोबर रहायला गेला होता ना तिकडे ?—”

" रहायला म्हणजे फक्त जेवायला ! इतर सारा वेळ तो मला वाटतं तुमच्याकडेच असतो ना ? पण काय रे, काकासाहेब केव्हां परत येणार आहेत मुंबईहून ?–"

" आजच तार आली. त्यावरून पांच सहा दिवस तरी येत नाहींत असं वाटतं–"

" असं ?–पण पंडितजींना तूं चहा वगैरे दिलास का आल्याबरोबर ? "

" नाहीं. मी आल्यापासून आम्ही बोलतों आहोंत सारखे ! त्यामुळं मला आठवण राहिली नाहीं त्यांना चहाबद्दल विचारायची–"

" अरे, पण ते गाडीवरून आलेले आहेत ना ? बरं, मी करून आणतें चहा लवकर–"

" खरंच आण ! गाडींत घेतला होता मी तसा. पण घरच्या चहाची गोष्ट कांहीं निराळी आहे–"

ती आंत गेली आणि पंडितजी जयसिंगाशीं पुन्हा बोलूं लागले.

" टिळकांच्या नंतर महाराष्ट्राकडे तीन पिढ्या असलेलं राजकारणाचं नेतृत्व गेलं आणि फक्त गांधींच्या टीकाकाराची भूमिका त्याच्याकडे आली—"

" पण पंडितजी, जें राजकारण बुद्धीला पटत नाहीं त्यांत भाग घ्यायचा कसा ?—"

" भाग घ्या असं म्हणतो कोण ? गांधींचं राजकारण जर तुमच्या बुद्धीला पटत नसेल, तर त्यापेक्षां प्रभावी असा तुमचा कार्यक्रम काढा ना तुम्ही ! फक्त त्यांचे दोष तेवढे दाखवून लोकांचा बुद्धिभेद न् कार्यकर्त्यांचा तेजोभंग करूं नका, एवढंच माझं म्हणणं ! महाराष्ट्र राजकारणांत मागें पडला याबद्दल जळफळून काय उपयोग ? महाराष्ट्र मागें पडायला कांहीं गांधींचं पुढारीपण हेंच केवळ एक कारण नाहीं. इतरहि अनेक कारणं आहेत—"

" तीं कळूं द्यात तरी एकदां ! गेलीं पन्नास वर्षं जो महाराष्ट्र राजकारणांत इतर सर्व प्रांतांच्या आघाडीला होता, तो टिळक वारल्यावर पांच वर्षांच्या आंतच मागं पडावा, याला दुसरीं कोणतीं कारणं सांगतां आपण ?—"

"ती कारणं शोधायला फार लांब किंवा खोल जायला नको, जया! कोणत्याहि राष्ट्राचा किंवा समाजाचा दृष्टिकोन विकसित होऊन त्यांच्या हातून पराक्रम घडायला त्यांच्यापुढें विशाल प्रतिभेचा ध्येयद्रष्टा असावा लागतो! रानडे, गोखले आणि टिळक यांच्या स्वभावांत, विचारांत आणि कार्यपद्धतींत एरवीं फरक कितीहि असला, तरी ते तिघेहि आपआपल्या परीनें महान् ध्येयद्रष्टे होते, यांत शंकाच नाहीं. रानड्यांचें भारताच्या सर्वांगीण पुनरुज्जीवनाचें स्वप्न, गोखल्यांची देशसेवेचें व्रत घेतलेल्यांचा मठ काढण्याची तळमळ आणि टिळकांची स्वातंत्र्यासाठीं सर्वस्व पणाला लावून झगडण्याची तयारी हे ध्येयविशेष इतके लोकोत्तर होते कीं, त्यामुळें साऱ्या हिंदी राष्ट्राचें नेतृत्व आपोआप त्यांच्याकडे आलें! आज तशा प्रकारचा ध्येयद्रष्टा महाराष्ट्रांत कोणी नसल्यामुळेंच त्याचा दृष्टिकोन संकुचित होत चालला आहे आणि कर्तृत्व खुरटत चाललें आहे. व्यक्तीच्या काय, समाजाच्या काय किंवा राष्ट्राच्या काय कर्तृत्वाची उंची वाढायला त्यांच्यापुढें उच्च ध्येय आणि उच्चतर आदर्श असावे लागतात. ही ध्येयांची आणि द्रष्ट्यांची परंपरा टिळकांबरोबर संपली आणि महाराष्ट्रांतले टिळकांचे अनुयायी आज इतरांच्या ध्येयांचे नुसते व्यावहारिक टीकाकार होऊन बसले आहेत—"

"पंडितजी, ही आपली मीमांसा बरोबर आहे अगदीं. पण, हा केवळ एकट्या महाराष्ट्राचाच नव्हे, तर आपल्या सर्व हिंदु समाजाचाच दोष नाहीं काय?"

"होय. अगदीं योग्य बोललास तूं, जया! हिंदु समाजाच्या अधोगतीचें बीज त्याच्या संकुचित दृष्टिकोनांतच आहे. इंग्रज मनुष्य जेव्हां स्वत:च्या भवितव्याविषयीं विचार करूं लागतो, तेव्हां त्याला आपल्या महत्त्वाकांक्षी डोळ्यांपुढें सर्व जग दिसूं लागतें. कारण त्याच्या राष्ट्राचें साम्राज्य सर्व जगभर पसरलेलें आहे. त्यामुळें त्याचा दृष्टिकोन साहजिकच जगड्व्याळ होतो; त्याला साहजिकच वाटतें कीं, पृथ्वीच्या पाठीवर कुठेंहि जाऊन आपण आपल्या कर्तबगारीची चमक दाखवूं! मुसलमान मनुष्य ज्या वेळीं आपल्या भवितव्याचा विचार करतो, त्या वेळीं त्याच्याहि दृष्टीपुढें सर्व जग असतें. कारण, दिल्लीपासून कॉन्स्टँटिनोपलपर्यंत आणि कराचीपासून कैरोपर्यंत जुन्या जगांतील बहुतेक

रहदारीचे राजमार्ग मुसलमान राष्ट्रांनीं व्यापलेले आहेत आणि त्यांच्या दिग्विजयाचीं स्मारकें आजहि त्या राजमार्गावर त्यांच्या अचाट कर्तृत्वाची साक्ष देत दिमाखानें उभीं आहेत! त्यामुळें इस्लामच्या या पडत्या काळांतसुद्धां मुसलमान जिहादाची भाषा बोलूं शकतो आणि मक्केकडे तोंड करून प्रार्थना करीत असतांना त्याच्या मिटलेल्या डोळयांपुढें आशिया, युरोप आणि आफ्रिका या तिन्ही खंडांत पसरलेलें मुस्लिम जग दिसत असतें! उलट हिंदु मनुष्य जेव्हां आपल्या भवितव्याविषयीं विचार करूं लागतो, तेव्हां उत्तरेकडली ती बर्फाची अजस्र भिंत आणि दक्षिणेकडील तो अनुल्लंघनीय महासागर यांनीं त्याची दृष्टि रोखली जाते. हिंदुस्थानाच्या बाहेर पृथ्वीच्या पाठीवर त्यानें कुठेंहि नजर टाकली, तरी त्याला स्वतःच्या राष्ट्रीय कर्तबगारीचें जागतें स्मारक दिसणार नाहीं; स्वतःच्या रक्ताचें किंवा धर्माचें जिवंत राष्ट्र आढळणार नाहीं. ज्यांच्या धार्मिक, राजकीय किंवा आर्थिक उलाढालींचे व्याप सर्व जगभर पसरलेले असतात, त्या राष्ट्रांचा आणि समाजांचा दृष्टिकोन आपोआपच अत्यंत विशाल होतो; व जागतिक उलाढालींतील स्वतःचें स्थान आणि महत्त्व लक्षांत घेऊन तें वाढविण्याच्या ईर्ष्येनें ते स्वतःच्या भवितव्याचा विचार करतात. अशा तऱ्हेचा विशाल दृष्टिकोन हिंदु समाजाला कशाच्या जोरावर येणार? ज्यांचा धर्म परवां परवांपर्यंत जगाला पाठमोरा होता, ज्यांची दिग्विजयाची ईर्ष्या सिंधु नदीची सीमा ओलांडावयाला सहसा धजली नाहीं आणि परदेशगमन निषिद्ध मानल्यामुळें ज्यांना जगाची बाजारपेठ काबीज करणें अशक्य झालें, त्या हिंदु समाजाची दृष्टि स्वतःच्या भवितव्याचा विचार करतांना जगभर कशी खेळणार?—"

"मग यावर उपाय काय?—"

"उपाय अगदीं साधा आहे. आपल्या भवितव्याचा विचार जागतिक दृष्टीनें करणें! जोंपर्यंत आपल्यापुढील सर्व प्रश्नांचा विचार आपण जागतिक दृष्टीनें करीत नाहीं, तोंपर्यंत जगांतील प्रगत राष्ट्रांच्या प्रणालिकेंत आपल्याला स्थान मिळणें अशक्य आहे, जया! फार कशाला? अरे, आपल्या महाराष्ट्राचेंच उदाहरण घे! रानडे, गोखले आणि टिळक हे कर्तृत्ववान् खरे. पण ते

कांहीं जागतिक कीर्तीचे पुरुष नाहींत. उलट बंगालमध्यें रवींद्र, जगदीशचंद्र, अरविंद यांच्यासारखे जागतिक कीर्तीचे पुरुष एकामागून एक निर्माण झाल्यामुळें बंगालमधील साहित्यिक आणि शास्त्रज्ञ हे आपल्या भवितव्याचा विचार करितांना सर्व जगावर नजर टाकतात! गुजराती किंवा मारवाडी हा महाराष्ट्रीयाइतका शिकलेला बहुधा नसतो. पण तो सट्टेबाजारांत जाऊन बसला, म्हणजे साऱ्या जगाच्या बाजारभावांचे आंकडे त्याच्या डोळ्यांपुढें नाचूं लागतात आणि समईपुढें कीर्दखतावण्या लिहीत बसणारा हा बनिया लंडन आणि न्यू यॉर्क यांच्याशीं आपल्या मोडक्या तोडक्या इंग्रजींत बिनदिक्कत वाटाघाटी करितो. बी. कॉम्. झालेल्या पण जगाच्या बाजारपेठेंतील घडामोडींची बिलकूल ओळख नसलेल्या महाराष्ट्रीय पदवीधरांनीं फक्त नोकरी करावी त्याच्या हाताखालीं! महायुद्धाच्या काळापर्यंत जग हें एकंदरींत विलग आणि तुटक होतें. पण महायुद्धानंतर लागलेल्या शास्त्रीय शोधांमुळें हा विलगपणा आणि तुटकपणा नाहींसा होऊन टेबलावर ठेवलेल्या भूगोलासारखी जगाची अवस्था झाली आहे आज! त्यामुळें कोणत्याहि प्रश्नाचा विचार करतांना आपण जगाचे घटक आहोंत, ही जाणीव ठेवून विचार करावा लागतो! तसा विचार जें राष्ट्र करणार नाहीं, तें मरेल; जो समाज करणार नाहीं, तो मागें पडेल. तुर्कस्थान, इराण, अफगाणिस्थान हीं जुनाट राष्ट्रें जागतिक दृष्टीनें आपल्या भवितव्याचा विचार करून आघाडीला आलीं. उलट आपला महाराष्ट्र मात्र टिळकांच्या मृत्यूपासून जास्त जास्त जातीय आणि प्रांतीय बनत चालला आहे. गांधींचा मोठेपणा हा आहे कीं, तो हिंदी राजकारणाचा विचार करितांना जागतिक भाषेंत बोलतो, जागतिक परिस्थिति लक्षांत घेऊन वागतो. त्याच्या अहिंसेला तुम्ही कितीहि हंसा, पण विल्सनच्या राष्ट्रसंघाच्या आणि शस्त्रसंन्यासाच्या कल्पनेनंतर जगाच्या राजकीय विचारसंपत्तींत त्यानें ती महनीय भर घातली आहे, यांत शंकाच नाहीं. त्याच्या त्या विश्वात्मक दृष्टिकोनानें गुजरातला वर आणला. आपला महाराष्ट्र मागें पडला. याला कारण आज आपल्यामध्यें असे महान् ध्येयांचे द्रष्टे नाहींत, हें आहे. **Where there is no vision, the people perish** हें मॅझिनीचें सुभाषित आज अगदीं भयंकर रीतीनें अनुभवाला येत आहे आपल्या!—”

पंडितजींचें तें अस्खलित वक्तृत्व आणखी किती वेळ चाललें असतें कोण जाणें. पण ते बोलण्याच्या अगदीं ऐन भरांत असतांनाच कांता चहाचा ट्रे घेऊन बाहेर आली; व तिच्या मागोमाग पंडितहि फराळाचे पदार्थ घेऊन आला. त्याबरोबर पंडितजी एकदम थांबले; व खुर्चीवरून उठून त्यांनीं ट्रेमधील निरनिराळ्या पदार्थांच्या बशा टेबलावर मांडण्याच्या कामांत पंडितला मदत केली.

पण कांतानें त्यांचें बोलणें येतां येतां अर्धवट ऐकलें होतें.

तिनें कपांतून चहा तयार करीत असतांना त्यांना विचारलें, "कोणता भयंकर अनुभव येत आहे आज आपल्याला, पंडितजी ?–"

"कसला नाहीं. आमची आपली तात्त्विक चर्चा चालली होती, ताई !–"

पंडितजी टोस्टचा खमंग तुकडा तोंडांत टाकीत हंसून म्हणाले. जयाचें लक्ष त्या चहाकडे, खाद्यांकडे किंवा कांतानें त्यांना विचारलेल्या त्या प्रश्नाकडेहि नव्हतें. पंडितजींनीं महाराष्ट्राच्या पिछेहाटीची जी मीमांसा आपल्या वक्तृत्वपूर्ण वाणीनें केली होती, तिच्यांतच त्याचें मन अद्याप गुंगलेलें होतें. म्हणून त्यानें मध्येंच एकदम त्यांना विचारलें—

"पंडितजी, चितागांगच्या शस्त्रागारावरील हल्ल्याची हकीकत वाचली का आपण ? काय वाटलं आपल्याला ती वाचून ?–"

"मला अभिमान वाटला त्या तरुणांच्या शौर्याचा आणि साहसाचा ! सरकारी शस्त्रागारावर इतक्या पद्धतशीर रीतीनें हल्ला करणं हें खरोखरीच लोकोत्तर बुद्धीचं आणि कर्तृत्वाचं काम आहे !—"

"पण हें काम तुमच्या अहिंसेच्या कर्मकांडांत बसत नाहीं याची वाट काय ?–"

"नसेल बसत ! आपल्या या नेभळ्या आणि दुबळ्या राष्ट्रांत ईर्ष्येची, आकांक्षेची आणि पराक्रमाची ठिणगी जेथें जेथें म्हणून दिसेल, तेथें तेथें ती फुंकर घालून चेतविली पाहिजे ! निव्वळ गुप्त कटांच्या मार्गानं स्वातंत्र्य मिळविणं अशक्य आहे हें तर खरंच. अशा प्रकारच्या हल्ल्यामुळें आपल्या राष्ट्राचें गुदमरून आणि गंजून गेलेलें जें क्षात्रतेज उफाळून प्रगट होतें, त्याचं महत्त्व

मला फार वाटतं ! शिवाय, कम्युनिस्टांची चळवळ फोफावून जर हिंदुस्थानांत कधीं राज्यक्रांती झालीच, तर तिला गुप्त संघटनेची जोड ही यावीच लागेल ! रशियांतील क्रांतीचें आणि आयर्लंडांतील सिनफेनांच्या चळवळीचें उदाहरण आपल्या डोळ्यांपुढें आहेच– ”

“ मग गांधींच्या कार्यक्रमांपेक्षां प्रभावी असा कार्यक्रम हाच ठरूं शकेल असं नाहीं वाटत आपल्याला ?– ”

या त्याच्या प्रश्नाला पंडितजी उत्तर देणार, तोंच तें संभाषण उत्सुकतेनें ऐकत असलेली कांता एकदम मध्येंच म्हणाली–

“ जया, पंडितजींच्या तोंडून भलभलत्या कबुल्या काढण्याचा प्रयत्न करूं नकोस अशा रीतीनं !– ”

तेव्हां पंडितजी हंसून म्हणाले, “ माझ्या लक्षांत आला त्याच्या प्रश्नाचा रोख, ताई ! त्यावर मला एवढंच म्हणायचं कीं, सशस्त्र क्रांतीच्या प्रयत्नाला माझी तत्त्वतः हरकत नाहीं. कारण स्वातंत्र्य हें अहिंसेपेक्षांहि मला प्रिय आहे, व तें संपादन करण्यासाठीं कोणत्याहि मार्गाचा अवलंब करायला मी कचरणार नाहीं. पण, सशस्त्र क्रांति ही अशा रीतीनें घडवून आणली पाहिजे कीं ज्यामुळें देशांतील बहुजनसमाज तींत जास्तींत जास्त भाग घेऊं शकेल. त्या दृष्टीनं कम्युनिस्टांचं क्रांतीचं तत्त्वज्ञान मला अधिक सोईचं वाटतं–”

“ पण चितागांग सारख्या तुरळक प्रयत्नांनासुद्धां आपण महत्त्व देतांना ?–”

“ हो. ती ठिणगी आहे, न् असली प्रत्येक ठिणगी आपल्या क्षात्रवृत्तीचा वन्हि अद्याप पुरता विझलेला नाहीं याची साक्ष देत असते. लोकांत तेज आणि स्फूर्ति उत्पन्न करायला हे स्फुलिंग कारण होत असतात—”

जया यावर कांहीं बोलला नाहीं. त्यानें मुकाट्यानें चहा घ्यावयाला सुरवात केली.

त्याचा प्रत्येक प्रश्न कांता कुतूहलानें ऐकत होती, प्रत्येक हालचाल बारकाईनें बघत होती. पंडितजींचें तें उत्तर ऐकून त्याच्या मुद्रेवर एकदम जें गांभीर्य आलें, तें तिला मोठें चमत्कारिक वाटलें; व तिनें त्याच्याकडे भेदक दृष्टीनें पहात त्याला हळूच विचारलें,—

" जया, काय आहे मनांत तुझ्या ?— "

अंधारांत गुपचुप वावरत असलेल्या माणसाच्या तोंडावर टॉर्चचा प्रकाश अचानक टाकला असतां तो जसा दचकतो, तसा तिचा तो प्रश्न ऐकतांच जया दचकला; व त्यानें तिची नजर टाळून किंचित् चांचरत म्हटलें—

" कांहीं नाहीं ! —कां वरं ?— "

पण तो प्रश्न उलट तिलाच विचारीत असतांना त्याचें गडबडलेलें मन सांवरलें; व हंसण्याचा प्रयत्न करून तो पुढें म्हणाला—

" नेहमीं नेहमीं कसा ग संशय येतो तुला आमचा, ताई ?— "

पण तिनें त्याच्या त्या प्रश्नाला उत्तर न देतां पंडितजींकडे वळून एकदम गंभीरपणानें म्हटलें—

" जयानं एक गोष्ट सांगितलेली नाहीं अद्याप आपल्याला, पंडितजी !— "

" कोणती ग ?— "

त्यानें पुन्हा एकदम बावरून विचारलें.

" चितागांगला जो हा अत्याचार झाला, त्यांत सामील असल्याच्या संशयावरून यांच्या एका मित्राला अटक झाली आहे परवां— "

" कोणता रे हा मित्र तुझा, जया ? ही बातमी तर तूं आल्याबरोबर सांगायला हवी होतीस मला— "

" माझा मित्र ? मी तर नवीनच ऐकतों आहे हें !— "

" जया, उगाच आतां लपवाछपवी करूं नकोस ! मी सांगतें याच्या मित्राचं नांव—जयंत चितळे— "

" हो. वाचलं खरें परवां टाइम्समध्यें.—जया, कुठें जमला या चितळेशीं तुझा स्नेह ?— "

पंडितजींनीं एकदम गंभीर होऊन विचारलें.

जयाचें तोंड घामानें डबडबलें होतें.

त्यानें तोंड पुसण्याचें निमित्त करून आवंढा गिळला.

आणि नंतर अगदीं सावकाश म्हटलें—

" तें सांगणं कठीण आहे, पंडितजी !— "

" तुझी इच्छा नसेल, तर सांगूं नकोस. माझा आग्रह नाहीं तुला. पण ताईनं ज्या अर्थी मला कल्पना दिलीच आहे, त्या अर्थी एक गोष्ट तुला स्पष्ट सांगणं हें कर्तव्य समजतों मी माझं—"

" अवश्य सांगा आपण—"

" स्वतःचें मन पोलादी असल्याची खात्री झाल्याशिवाय पाऊल टाकतां कामा नये या मार्गावर ! मी स्वतः होरपळलेला आहे, जया !—"

" मान्य आहे मला आपलं म्हणणं, पंडितजी !—"

त्यानें अगदीं शांतपणानें उत्तर दिलें.

पंडितजींच्या तात्त्विक चर्चेला कांतानें दिलेली ही कलाटणी इतकी कांहीं अनपेक्षित आणि विलक्षण होती कीं, जयानें तें उत्तर दिल्यावर कांहीं वेळ अगदीं अबोल स्थितींत गेला.

नंतर कांता पंडितजींच्या कपांत पुन्हा चहा ओततांना म्हणाली, "आपण मघांशीं म्हणालांत तें अगदीं खरं आहे, पंडितजी ! सध्यां एकापेक्षां एक भयंकर अनुभव येत आहेत मला ! आणि उद्यां जर जयाला न् उमाला एखाद्या गुप्त कटांत सामील असल्याच्या आरोपावरून पकडण्यांत आलं, तर नवल वाटणार नाहीं मला त्या गोष्टीचं—"

तिनें आपल्या डोळ्यांत येत असलेले अश्रु निग्रहानें आवरले. तिचा तो मनःक्षोभ पंडितजींच्या लक्षांत आला; व चहाचा घोट घेऊन ते म्हणाले—

" ताई, तूं शहाणी आहेस. इतर संसारकरू बायकांप्रमाणंच तूंहि जीविताकडे पहावंस याचं आश्चर्य वाटतं मला. सध्यां आपल्या देशाची स्थिति लढाईला उभ्या राहिलेल्या राष्ट्रासारखी आहे. त्या राष्ट्रानें हांक फोडतांच ज्याप्रमाणें देशांतील प्रत्येक व्यक्तीनें आपल्यापुढलं भरलेलं ताट लाथाडून रणांगणावर धांव घेतली पाहिजे आणि आपल्या शक्त्यनुसार त्या युद्धांत भाग घेतला पाहिजे. आपल्या देशाच्या सांप्रतच्या स्थितींत ज्याला जो मार्ग सुचेल त्यानें त्या मार्गानें हा देश स्वतंत्र करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आज देशांतील प्रत्येक व्यक्तीचें पहिलें कर्तव्य हें आहे.—इतर सर्व कर्तव्यं मागाहून !—"

" होय. मला हें सारं समजतं,पंडितजी ! उच्च ध्येयें आणि त्यांच्यासाठीं करावा लागणारा स्वार्थत्याग यांचें महत्त्व मला कळतें. सामान्य संसारकरू स्त्रीच्या दृष्टीनं मी जीविताकडे पहात नाहीं. नाहीं तर त्यांची कड घेऊन मी दद्दांना दुखवलें नसतें ! पण, जयाला जें अप्रत्यक्ष प्रोत्साहन आतां आपण दिलेंत, तें मात्र मला पसंत नाहीं मुळींच. असल्या अविचारी मुलांच्या कृत्यामुळं देशाचं कल्याण होईल कीं नाहीं कोण जाणें ! पण त्यांचा आणि त्यांच्या कुटुंबाचा नाश मात्र खात्रीनं होईल—"

" हरकत नाहीं झाला तरी ! मी तुला आतांच सांगितलें—आज आपण युद्धाच्या परिस्थितींत आहों ! राष्ट्राच्या आयुष्यांत केव्हां केव्हां असा काळ येत असतो कीं, ज्या वेळीं देशांतील प्रत्येक जाणत्या व्यक्तीला त्याच्या कल्याणासाठीं आपल्या कल्याणाचा बळी द्यायला स्वेच्छेनें पुढें यावें लागतें ! मी 'बळी' हा शब्द मुद्दामच वापरला आहे, ताई ! तो काळ आज आपल्या राष्ट्रांत आला आहे; व या वेळीं वैयक्तिक स्वार्थाच्या लालचीनें जो जो माणूस आपल्या कर्तव्याला चुकेल, त्याला त्याला भावी पिढ्या गुन्हेगार लेखल्याशिवाय रहाणार नाहींत. आपण आईच्या पोटांत असतांना आपले वडील न् मामा हे स्वातंत्र्ययुद्धांत भाग घेतल्यामुळें तुरुंगांत डांबले गेले होते असें जेव्हां तुझ्या मुलाला उद्यां कळेल, तेव्हां केवढा अभिमान वाटेल त्याला आपल्या घराण्याचा आणि किती उदात्त संस्कार होतील त्याच्या मनावर या स्वार्थत्यागाचे ! ताई, या द्वंद्वमय जगांत प्रत्येक गोष्टीची किंमत ही द्यावीच लागते. शतकानुशतकें अधोगतीच्या गर्तेत पिचत पडलेल्या या दुर्बळ आणि पतित राष्ट्राच्या उद्धारासाठीं आज देशांतील प्रत्येक व्यक्तीवर स्वतःच्या रक्तानें न्हाऊन निघण्याचा प्रसंग आला आहे. त्या प्रसंगाबद्दल आनंद वाटला पाहिजे तुला खरोखरी! आपल्या राष्ट्राची ही निकड लक्षांत न घेतां तूं बोलतेस म्हणून मी तुला म्हणतों कीं एखाद्या सामान्य संसारकरू स्त्रीप्रमाणें तूं या प्रश्नाचा विचार करूं नकोस !—"

" माफ करा, पंडितजी, मी स्पष्ट बोलतें याबद्दल ! स्त्रीची जीविताकडे पहाण्याची दृष्टि आहे, ती आपल्याला कधींही कळणें किंवा पटणें शक्य नाहीं. कारण स्त्रीहृदय ही काय चीज आहे याची मुळीं आपल्याला कल्पनाच

नाहीं ! स्त्रीच्या साहचर्याशिवाय पुरुषाच्या जीविताला पूर्णता येत नाहीं, तें अपुरें आणि उणें रहातें, असें मी समजतें. आपण ‘ संसारकरू ’ हें विशेषण स्त्रीला तुच्छतेनें लावतां; मी तें अभिमानानें लावतें ! स्त्रीच्या या संसारकरू वृत्तीमुळेंच समाजाची धारणा होत असते. आपल्या राष्ट्राची निकड मला कळते; व त्याच्या उद्धारासाठीं स्वतःच्या घरांतील माणसांचाच काय, पण स्वतःचा जरी बळी द्यायचा प्रसंग आला, तरी मी मागें पहाणार नाहीं. पण गांधीचा कार्यक्रम बुद्धीला पटत नसतां ते जिद्दीनें तुरुंगांत गेले हा त्यांचा त्याग नव्हे. मला ही निव्वळ लोकाराधना, निव्वळ आत्मवंचना वाटते. गांधींच्या तत्त्वज्ञानावर विश्वास नसतांनासुद्धां त्यांनीं सुरू केलेल्या चळवळीच्या तावडींत सांपडून आपले वडील तुरुंगांत जाऊन बसले असें जेव्हां माझ्या मुलाला उद्यां कळेल, तेव्हां त्याला त्यांच्या त्या कृत्याविषयीं खाचित अभिमान वाटणार नाहीं, पंडितजी ! आणि उमाविषयीं मी काय बोलूं ? स्वतःची कुवत न ओळखतां या जयाच्या नादानं उमा जर उद्यां पेंचांत आला—”

“ उमा पेंचांत येणार नाहीं अशी हमी देतों मी तुला, ताई !—”

इतका वेळ निमूटपणें तिचें बोलणें ऐकत असलेल्या जयानें मध्येंच एकदम म्हटलें.

“ तूं हमी देऊन काय उपयोग, जया ? उमाच्या हातून कदाचित् कांहीं न घडतांच तो तुरुंगांत जाईल अशी सारखी भीति वाटते मला !——”

तिच्या डोळ्यांतील आवरलेले अश्रु आतां अनिर्बंध वाहूं लागले.

“ नाहीं ताई, मी पुन्हां सांगतों तुला.—माझं काय व्हायच असेल, तें होईल. पण तुझ्या उमाच्या केंसाला सुद्धां धक्का लागणार नाहीं याबद्दल पक्की खात्री बाळग तूं !——”

त्याच्या त्या आश्वासनानें ती किंचित् शांत झाली आणि म्हणाली:——

“ जया, ‘ तुझा उमा ’ हा शब्दप्रयोग तूं वापरायला नको होतास ! उमा आणि तूं यांच्यांत मी फरक केला नाहीं कधीं. पण तुझ्या ठिकाणीं जो एक कणखरपणा आहे, तो उमाच्या ठिकाणीं नसल्यामुळेंच माझें मन त्याच्या बाबतींत इतकें घाबरतें ! स्वार्थत्याग हा एक प्रकारचा यज्ञ आहे, जया ! तो

यज्ञ पूर्ण जाणिवेनं आणि प्रामाणिकपणानं करण्यांत आला पाहिजे. स्वार्थत्याग म्हणजे कांहीं होळी नव्हे, स्वतःचें जीवन बेजबाबदारपणानं बेचिराख करणं नव्हे. ज्यांना स्वतःच्या मनाची ओळख पटलेली नाहीं आणि स्वतःच्या कुवतीचा अंदाज लागलेला नाहीं, त्यांनीं या फंदांत पडूं नये कधीं ! नाहीं तर सूर्याला कवटाळायला धांवल्यामुळें लोळागोळा होऊन पडलेल्या संपातीसारखी स्थिति व्हायची त्याची !–"

# २२

# तामियाच्या जंगलांत

ते डाक बंगल्याकडे जावयाला निघाले, त्या वेळीं वळवाची सर नुकतीच पडून गेली होती.

पण त्या थांबत्या सरीमुळें हवेंत गारवा न येतां एक प्रकारचा दमट उष्मा मात्र उत्पन्न झाला; व तिनें भिजलेल्या रानांतील पाचोळ्यांचा कुबट गंध हवेंत पसरून तीहि कुंद झाली होती. सूर्य अद्याप मावळलेला नव्हता. पण, त्याचें बिंब काळसर ढगांनीं आच्छादिलेलें असल्यामुळें पश्चिमेचें क्षितिज भयानक दिसत होतें; व ढगांनीं गिळलेल्या त्या सूर्यबिंबाचा परावर्तित प्रकाश झपाट्यानें क्षीण होत चालल्यामुळें सृष्टि काळवंडल्यासारखी दिसत होती. वारा अगदीं नव्हता. त्यामुळें क्षितिजाशीं समांतर असलेलीं स्तब्ध झाडें त्या अंधुक दृश्याच्या उदासीनतेंत भर घालीत होतीं.

त्या तिघांना बघून कोणाचीहि अशीच कल्पना झाली असती कीं, ते जंगलांत शिकार करावयाला चालले आहेत. आणि, गांवांतील ज्या शेतकऱ्याच्या गोठ्यांत त्यांनीं आपली मोटार ठेवली होती, त्याला खरोखरी तसेंच त्यांनीं सांगितलें होतें. कारण श्यामा आणि जया यांनीं शीख पेहराव केला होता; व चारूनें खाकी कपडे घातले होते. त्या रुबाबदार पोषाखांत मिसरूड न फुटलेल्या गोंडस शीख युवकासारखी श्यामा दिसत होती. उलट दाढीनें वेष्टिलेला जयाचा सांवळा, उग्र चेहरा आणि त्याच्या हातांतील हंटर पोलिस खात्यांतील

अधिकाऱ्याची आठवण देत होता. रानांतून लांकडांचा भारा घेऊन येणारा जो एखादा दुसरा खेडूत मधून मधून त्यांना भेटे, तो त्यांच्याकडे डोळे ताणताणून मोठ्या कौतुकानें बघत असे. पचमढीच्या नंदनवनांतील गंधर्वाप्सरांचें तामियाचा डाक बंगला हें अत्यंत आवडतें संकेतस्थान आहे. त्यामुळें त्या तिघां जवानांबरोबर एकहि स्त्री नसलेली पाहून गांवांतील खेडुतांना जसें आश्चर्य तसेंच भयहि वाटलें असावें.

त्या शेतकऱ्यानें त्यांना मोटार ठेवायला जागा दिली, तीहि खरोखरी भीतीनेंच; व "आम्ही शिकार आटोपून पहाटेपर्यंत केव्हांहि परत येऊं," असें जेव्हां जयानें करड्या आवाजांत त्या म्हाताऱ्या किसानला सांगितलें, तेव्हां त्यानें आपल्या मनाशीं त्या शिकारीचा अर्थ अगदीं वेगळाच केला.

त्यांचा प्रवास अतिशय मजेंत झाला होता व ज्या उद्देशानें ते घरून निघाले होते, तो सफल होण्याची पक्की खात्री वाटत असल्यामुळें, त्या जंगलाचा वाढता भयाणपणा त्यांच्या उल्लसित मनाला जाणवला नाहीं.

डाक बंगल्यावरून पचमढीकडे जाणाऱ्या रस्त्याला जें वांकण मध्येंच उताराजवळ लागतें, तेथें येऊन पोंचतांच त्यांनीं आसपासच्या जागेची काळजीपूर्वक पहाणी केली. मोटार खालून वर येत असतां शक्य तर एखाद्या झाडाआडून गोळ्या घालतां याव्यात आणि तावडतोब मागच्या मागें जंगलांत पसार होतां यावें, अशी जागा त्यांना हवी होती. त्या वांकणाजवळ चिंचेचें जें मोठें थोरलें झाड होतें, तेथेंच उभें राहून पोलिस खात्याचे इन्स्पेक्टर जनरल सर जेम्स स्ट्रँगमन यांच्या मोटारीची वाट पहाण्याचें त्यांनीं ठरविलें.

साहेबांचा मुक्काम आज रात्रभर डाक बंगल्यांत होणार असल्याची नक्की बातमी जयानें काढली होती. तामिया घाटाच्या तिन्ही बाजूंनीं बेलाग कड्यावर असलेला तो सुंदर बंगला हें साहेबबहादुरांचें मोठें आवडतें विलासस्थान होतें; व असें सांगतात कीं, त्या बंगल्याच्या मागच्या दरींत अपघातानें मेलेल्या म्हणून एका तरुण कोरकू स्त्रीचें जें प्रेत कांहीं दिवसांपूर्वी सांपडलें होतें, तो त्यांच्या शिकारीचाच खरोखरी प्रताप होता.

ते उताराची पहाणी करीत असतांनाच सूर्य मावळला; व आकाश अभ्रांनीं झांकोळलेलें असल्यामुळें संधिप्रकाशहि फार वेळ टिकला नाहीं. सूर्यास्त झाल्यावर काळ्या पांढऱ्या ढगांच्या मधल्या मोकळ्या जागेंतून जो लालभडक पट्टा वेडा वाकडा पसरला होता, तो अदृश्य होतांच काळोख झपाट्यानें वाढत गेला; व खालीं क्वचित् एकाद् दुसरा काजवा आणि वरती क्वचित् एकाद् दुसरा तारा यांच्या चमकण्याशिवाय प्रकाशाची दुसरी कोणतीहि खूण त्या काळोखानें व्यापलेल्या रानांत शिल्लक उरली नाहीं. नाहीं म्हणावयाला, जया आणि चारू यांच्या तोंडांतील सतत जळणाऱ्या सिगारेट्स् मात्र त्या अंधाराची भयाणता वाढवीत होत्या.

पण त्यांच्या उत्कंठित मनाला ती भयाणता जाणवली नाहीं. उलट आय्. जी. ची सूर्यास्ताच्या सुमारास येणार म्हणून ठरलेली मोटार अजून कां येत नाहीं, या शंकेनें जया अस्वस्थ झाला होता. सूर्य मावळून कांहीं फार वेळ झाला होता, असें नाहीं. पण, त्याला क्षणोक्षणीं वाटे, या वादळी हवेमुळें साहेबबहादुरांचा कार्यक्रम रद्द तर होणार नाहीं? त्या अस्वस्थतेच्या भरांत तो आपल्या अंगाला बिलगून बसलेल्या श्यामाला एकदां म्हणाला सुद्धां, "हा साहेब जर आज आला नाहीं, तर आपण जो कोणी येईल त्याच्यावर गोळ्या झाडूं! पण आज कांहीं आलों तसेच परत जाणार नाहीं!"

"असला कांहीं आततायीपणा करायचा नाहीं, जया! उगाच भलत्या-च माणसाच्या हत्येचें पाप डोक्यावर घ्यायला का आपण घरांतून बाहेर पडलों आहोंत?—"

ती हे शब्द उच्चारते आहे, तोंच चढणीला लागलेल्या मोटारीची घरघर त्यांच्या कानावर आली—

त्याबरोबर तीं तिघेंहि उठलीं; व तोंडांतील सिगारेट घाईघाईनें फेंकून देऊन जया म्हणाला—

"आतां नक्की साधणार आपली शिकार! तूं प्रथम गोळी झाडणार ना, श्यामा? नंतर आम्ही पाहून घेऊं—"

आणि ते हुशारीनें आडोशाला उभे राहिले.

मोटार वांकणापाशीं येत असतां तिचा वेग बराच कमी झाला होता. जयानें मोटार चालवीत असलेल्या इसमाकडे काळजीपूर्वक पाहिलें; व तो श्यामाचा दंड दाबून उद्गारला—

" अग, तोच तो ! टॉर्चनें पाहण्याची कांहीं सुद्धां गरज नाहीं. हं, आपट लवकर—"

त्याच्या तोंडून हे शब्द निघतात न निघतात, तोंच ती मोटार झाडाच्या अगदीं समोर आली—

त्याबरोबर प्रथम रिव्हॉल्वर झाडल्याचा आणि नंतर कांच खळकन् फुटल्याचा आवाज झाला.

त्या आवाजामागोमाग पुन्हां रिव्हॉल्वर झाडल्याचे आवाज झाले.

कांच फुटल्याबरोबरच मोटार एकदम थांबली, व ते रिव्हॉल्वर चालवीत असतांनाच टॉर्चचा झगझगीत प्रकाश त्यांच्या तोंडावर पडला.

त्या प्रकाशाच्या पाठोपाठच समोरून गोळी सणसणत आली—

—आणि जयाला आपल्या शेजारीं धप्पदिशीं कांहींतरी पडल्याचा आवाज ऐकूं आला.

त्याबरोबर तो तावडतोब मागें वळला.

तितक्यांत मोटार पुन्हां चालू झाली.

पण त्याचें लक्ष आतां मोटारीकडे नव्हतें. त्यानें एकदम टॉर्च लावला.

तेव्हां त्याच्या झगझगीत प्रकाशांत भुईवर पडलेली श्यामा त्याच्या दृष्टीस पडली.

चारू मात्र त्याला कुठेंच दिसला नाहीं.

म्हणून त्यानें त्याला सपाट्यानें दोन तीन हांका मारल्या आणि तो श्यामाला कुठें लागलें आहे हें पहावयाला खालीं वांकला.

तिनें आपल्या उजव्या कुशीवर हात ठेवला होता;—ती अगदीं निश्चेष्ट पडली होती.

त्यानें हळूच तो हात बाजूला केला,—त्याबरोबर त्याचा स्वतःचा हात रक्तानें भरला.

त्यानें तिच्या तोंडाजवळ आपलें तोंड नेलें;—तिचें श्वसन अगदीं मंदपणानें चाललें होतें.

तोंच टॉर्चचा प्रकाश त्याच्या अंगावर पडला.

त्याला वाटलें, कदाचित् मोटारींतील तीन इसमांपैकींच कोणी आला असेल—

म्हणून तो धडपडत उठला.

तोंच चारूनें त्याला विचारलें, "दिदीला लागली गोळी ? त्याचा नेम साधला आणि आपले मात्र सारे चुकले, जया !—"

जया कांहीं बोलला नाहीं. त्यानें चारूचा हात घट्ट दाबला.

पण, शब्दांनीं जी कधींहि व्यक्त होऊं शकली नसती, अशी विलक्षण आर्तता त्याच्या त्या स्पर्शाबरोबर चारूला जाणवली.

ते दोघे पुन्हा मुकाट्यानें तिच्याजवळ बसले.

क्षणैक दोघेहि तिच्या त्या निश्चेष्ट शरीराकडे, तिच्या कुशींतून वहात असलेल्या रक्ताकडे पहात होते.

नंतर जयानें त्याला म्हटलें, "हिला घेऊन आपण त्या शेतकऱ्याकडे जाऊं या, चारू ! आपल्याला कांहीं करतां येईल असं वाटत नाहीं मला ! जखम भलत्याच ठिकाणीं झाली आहे—"

जयानें तिला अलगत उचलून खांद्यावर घेतलें आणि चारू टॉर्चनें वाट दाखवीत पुढें चालूं लागला.

त्यांना त्या शेतकऱ्याच्या झोंपडींत पोंचावयाला अर्धा तास लागला.

टॉर्चचा झगझगाट दृष्टीस पडतांच तो शेतकरी धांवतच पुढें आला.

"मी सावजाला घातलेली गोळी चुकून लागली आमच्या या दोस्ताला, बुढ्ढेबाबा !—"

तो कांहीं विचारण्यापूर्वींच जयानें त्याला सांगून टाकलें.

त्यानें कांहीं न बोलतां जयाच्या खांद्यावरून तें ओझें हळूच उतरलें आणि झोंपडींत घातलेल्या एका अंथरुणावर तिला नीट निजविली.

त्याची बायको आणि मुलें बिचारीं बावरून उभीं राहिलीं.

जया निश्चल दृष्टीनें तिच्या निश्चेष्ट शरीराकडे पहात होता.

त्या म्हाताऱ्यानें तिच्या मस्तकाला घट्ट बांधलेला साफा सोडला आणि त्यावर थंड पाण्याचे हबके द्यावयाला सुरवात केली.—

ते देत असतांनाच त्यानें जयाला म्हटलें, "सरकार, अपने गोलीनें पूरा घात किया !—"

तिच्या जखमेंतून रक्त सारखें वहात होतें; आतां त्याच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले.

अखेर तिनें हळूहळू डोळे उघडले आणि जयाकडे बघून आपला हात हलविला.

त्याबरोबर तो जवळ आला आणि तिच्या तोंडाशीं त्यानें आपलें तोंड नेलें.

तिनें हळूहळू आपला हात उचलून त्याच्या गळ्यांत घातला आणि कांहीं तरी सांगण्याच्या अपेक्षेनें ओठ हलविले. तोंच तिची किंचित् वर उचललेली मान वांकडी झाली आणि ते ओठांवर आलेले शब्द बाहेर पडले नाहींत.

तिच्या त्या शांत, विवर्ण, नाजूक मुखावर जयाच्या डोळ्यांतील अश्रु-धारांचा वर्षाव झाला.

त्यानें तिच्या बोलण्यासाठीं किंचित् विलग झालेल्या ओठांचें, अर्धवट मिटलेल्या डोळ्यांचें आणि पाण्यानें भिजलेल्या कपाळाचें भराभर चुंबन घेतलें.

तो शेतकरी आणि त्याचीं तीं बायकामुलें तो सारा प्रकार भीतीनें आणि विस्मयानें पहात होतीं.

तिच्या डोक्याला गुंडाळलेला साफा सोडतांच त्या शेतकऱ्याच्या लक्षांत आलें होतें,—तो खरोखरी पुरुष नसून ती पुरुषवेष घेतलेली स्त्री आहे.

पण ती वेळ कांहीं विचारण्याची नव्हती, आणि नंतर जयाचा तो विलक्षण दुःखावेग पाहून तीं सारींच माणसें अगदीं गांगरून गेलीं.

त्याचा तो शोक लवकर आवरण्याचें चिन्ह दिसेना. तो पुनःपुन्हा तिचे ते अद्याप उष्ण असलेले हात दाबी, तिच्या छातीला स्पर्श करून पाही आणि तिच्या कानाशीं तोंड नेऊन कांहीं तरी कुजबुजे !

शेवटीं चारूनें त्याचा हात धरून त्याला आपल्याजवळ घेतला आणि त्याचे डोळे पुसून म्हटलें—

" जया, असं काय वेड्यासारखं करतोस तूं ? दिदीनं आपल्या आयुष्या-चं सार्थक केलं ! आतां अशा रीतीनं इथं वेळ घालवून चालणार नाहीं आपल—"

त्याच्या त्या सूचक शब्दांनीं जयाला परिस्थितीची जाणीव झाली; व त्याचा शोकावेग कमी होत गेला.

चारू त्याला पुन्हा थोड्या वेळानें इंग्रजींत म्हणाला, ' आपण पुढल्या व्यवस्थेला ताबडतोब लागलें पाहिजे. मी मघांशीं मोटारीच्या पाठोपाठ वर जाऊन बघून आलों सारं. त्या साहेबाच्या फक्त खांद्याला जखम झाली आहे. तो स्वस्थ बसायचा नाहीं. बहुधा उजाडतांच आपल्याला शोधायला पोलिस येतील. म्हणून पुढचं सारं आपण आतांच्या आतां उरकलें पाहिजे. पोलिस आल्यावर ते प्रत ताब्यांत घतील न् मग त्याची काय विटंबना होईल हें सांगणें कठीण आहे !—"

" पण आतांच्या आतां दहन करणं शक्य आहे, चारू ?—"

" शक्याशक्यतेचा प्रश्न नाहीं—केलंच पाहिजे ! आपण दोघे सारी तयारी करूं. मदतीला हा म्हातारा आहेच. त्याच्या हातावर भरपूर पैसे ठेवले, म्हणजे हवं तितकं इंधन देईल तो आणि वाटेल तें साह्यहि करील ! पण यापुढं एक क्षण सुद्धां वायां घालवतां कामा नये आपण—"

त्यानें त्या शेतकऱ्याला परिस्थितीची कल्पना करून दिली. त्याबरोबर तो उठून पुढील तयारीला लागला.

त्याचें घर गांवाच्या शिवेवर होतें व त्या घराच्या मागच्या बाजूला त्याचीं शेतें होतीं. त्यांपैकीं एका दूरच्या शेतांत त्यानें सांपडलें तें जळण गोळा करून सरण रचलें. त्या दोघांनीं तिला बाहेर आणून सरणावर ठेविली. तिच्या अंगावरील कपडे सर्व तसेच होते. फक्त जयानें तिचे पाण्यानें थबथबलेले सुंदर केस सोडून पुसून कोरडे केले; व तिला सरणावर निजविल्यावर त्यांचा गांठवलेला लांब सडक पेड तिच्या उजव्या कुशीला ठेवला. आकाश आतां

अगदीं स्वच्छ झालें होतें; व कृष्ण पक्षांतील अष्टमीची चंद्रकला पूर्व क्षितिजा-वर तळपत होती. तिच्या सौम्य प्रकाशांत श्यामाची ती शांत मुद्रा अधिकच मृदु आणि मनोहर दिसत होती. वाऱ्याच्या झुळकेनें जेव्हां तिचे केंस किंवा कपडे चाळवले जात, तेव्हां ती आतांच उठून बसेल कीं काय, असा भास होत असे.

तितक्यांत त्या शेतकऱ्यानें अग्नि आणला—

तेव्हां चारूनें गीतेचा दुसरा अध्याय म्हणावयाला सुरवात केली.

जयाच्या डोळ्यांतून मात्र पुन्हा अश्रुधारा वाहूं लागल्या. त्यानें तिच्या कपाळाचें चुंबन घेतलें; चारूनें तिची पद्धूलि आपल्या मस्तकावर घेतली; व नंतर त्या दोघांनीं मिळूनच चितेला अग्निसंस्कार दिला.

नंतर ते चितेपासून थोड्या अंतरावर येऊन बसले. तो शेतकरी मात्र ती जळती चिता ढांसळूं नये म्हणून सभोंवतीं हिंडून तिच्यांत कांहीं तरी टाकीत ती कशी तरी सारखी करीत होता.

कांहीं वेळ ते दोघे अगदीं स्तब्ध होते. जयाच्या डोळ्यांतून मात्र सारखे अश्रु ठिबकत होते. चारू मधून मधून त्याचा हात आपल्या हातांत घेई पण बोलत मात्र कांहीं नसे.

चिता चांगली भडकल्यावर जया एकदम चारूला म्हणाला "चारू, आपण कोणत्या उमेदीनं घरून निघालों आणि अखेर काय प्रकार झाला हा!—"

"या साऱ्या दुःखांत मला एवढंच सुख वाटतं कीं, दिदी पोलिसांच्या आटोक्यापलीकडे गेली! जया, मला या प्रसंगाचें कांहीं वाटत नाहीं फारसं! माझ्या आयुष्यांत मी तिसऱ्यांदा हें अपेश पहात आहे! पण तूं आपलं मन खचूं देतां कामा नयेस या प्रकारानं—"

"चारू, माझी सगळी ईर्ष्या मरून गेली मघांशीं मी तिला जमिनीवर पडलेली पाहिली तेव्हांच!—

"नाहीं जया, असं बोलून चालणार नाहीं. दिदीवर तुझं किती प्रेम होतं याची जाणीव आहे मला. पण तिच्यापेक्षां तुला आपलं ध्येय अधिक प्रिय नाहीं का? आणि तिच्या मरणामुळें खचून जाऊन तूं आपल्या ध्येयापासून

च्युत व्हावंस ही गोष्ट तिला तरी आवडली असती का? अरे, जिनें आपल्या भाईच्या हत्येचा सूड घेण्याच्या ईर्ष्येनं स्वतः आनंदानं मृत्यूला कवटाळलं, तिच्या चितेसमोर काय तूं असली निराशेची भाषा बोलणार?--छे. छे, जया, आपण उठल पाहिजे आतां! भोपाळ किंवा इंदूर यांच्या हद्दींत आपण एकदां जाऊन पोंचलों, म्हणजे आपल्याला भीति नाहीं मग कुणाची!-"

"मग खरोखरीच निघायचं आपण?—"

"हो. इथं यापुढं बसण्यांत घात आहे आपला—"

इतकें बोलून चारू एकदम उठून त्या शेतकऱ्याजवळ गेला; व त्याला म्हणाला—

"बुढ्ढेबाबा, चिता पुरती जळेपर्यंत तुम्ही थांबा इथं. आम्ही तळ्यावरून स्नान करून येतों—"

आणि ते दोघे झोंपडीकडे यावयाला निघाले.

तिथें येतांच जया एकदम आठवल्यासारखें करून म्हणाला, "चारू, मघांशीं मी श्यामाला उचलली, त्या वेळीं तूं रिव्हॉल्वर उचललास का तिच्या पायांजवळ पडलेला?—"

"नाहीं. तो तिथंच पडलेला असला पाहिजे अद्याप!—"

"मग तो आधीं जाऊन ताब्यांत घेतला पाहिजे आपल्या! उमानं साहेबांच्या खोलींतून आणलेला रिव्हॉल्वर आहे तो! तो जर आय्. जी. च्या हातीं सांपडला, तर साहेब आणि उमा दोघांच्याहि वर तोहमत आल्याशिवाय रहाणार नाहीं—"

"बरं, चल पाहूं या सांपडतो का—"

ते दोघे झपाट्यानं चालत त्या जागेपाशीं जाऊन पोंचले. पण तो रिव्हॉल्वर कांहीं त्यांना तेथें सांपडला नाहीं. त्यांनीं आसपास पुष्कळ शोध केला पण व्यर्थ.

तेव्हां चारूनें त्याला विचारलें, "तुला खात्री आहे रिव्हॉल्वर इथें पडला होता अशी?"

" हो रे! तिच्या पायांपाशींच रिव्हॉल्वर पडलेला होता. मला त्या घाईत उचलण्याची आठवण झाली नाहीं न् तुलाही सांगायला मी विसरलों. खात्रीनं कुणीतरी नेला असावा तो!-"

कांहीं क्षण ते दोघे एकमेकांकडे पहात स्तब्ध उभे होते.

" मग कसं करायचं आतां?-"

चारूनें शेवटीं विचारलें.

" माझी इच्छा नाहीं आतां कुठं जाण्याची! त्यामुळं कदाचित् आपण दोघे फार तर सुटूं. पण उमा खात्रीनं पकडला जाईल. मी सहाच दिवसांपूर्वी ताईला वचन दिलंय, माझं कांहींहि झालं तरी उमावर कसलंहि संकट येणार नाहीं म्हणून! - "

" मग आपण होऊन पोलिसांच्या स्वाधीन व्हायचं म्हणतोस?- "

चारूनें सिगारेट पेटवून तिचा झुरका घेत म्हटलें. त्याची मुद्रा विलक्षण गंभीर झाली होती.

" दुसरा उपाय दिसत नाहीं मला! उमाला संकटांत घालून, साहेबांची अप्रतिष्ठा करून स्वतःची सुटका व्हायला नको आहे मला, चारू! तुला मी मोकळीक देतों. तूं खुशाल जा इथून-"

" जया, मी एकटा जाऊं शकत नाहीं! तुला अटक झाल्याबरोबर पोलिस माझ्या तपासाला लागतील! त्यापेक्षां तुझ्याबरोबरच जें काय व्हायचं असेल तें होऊं दे माझं-"

" नाहीं चारू, चुकतोस तूं! तुला कोणींहि पाहिलेलं नाहीं माझ्याबरोबर येतांना. तूं वाटेल त्या युक्तीनें निसटून जाऊं शकशील. माझी इच्छा नाहीं तूं माझ्याबरोबर संकटांत सांपडावंस अशी-"

" हा तुझ्या इच्छेचा प्रश्न नाहीं आतां, जया!-"

" मग तूं नाहीं जात मला सोडून?-"

जयानें आपले दोन्ही हात त्याच्या खांद्यावर ठेवून विचारलें.

" नाहीं. तुझं म्हणणं बरोबर आहे एका अर्थानें. मी निसटून जाईनहि कदाचित्. पण तुला जर मी या वेळीं साथ दिली नाहीं, तर माझं मन जन्मभर

खात राहिल मला ! दिदीच्या मरणानं झालं नाहीं, एवढं आपलं नुकसान तो रिव्हॉल्वर इथं विसरून गेल्यामुळं झालं आहे, जया !—"

"जयंताच्या पत्रांतलं भाकित खरं ठरलं ! आपण दुर्दैवी आहोंत, चारू ! आपल्या हातून कांहीं न घडतां आपण गोत्यांत आलों—"

चारू यावर कांहीं बोलला नाहीं. त्यानें सिगारेटची डबी उघडून जया-पुढें धरली व जयानें तिच्यांतील सिगारेट घेतांच त्यानें काडी ओढून ती पेटवुनाहि दिली.

ते दोघे धूम्रपान करीत मुकाट्यानें झोंपडींत परत आले.

तो म्हातारा त्यांची वाटच पहात होता.

चारूनें त्याला विचारलें, "झालं सगळं व्यवस्थित ?—"

"हो. अजून जळतेय चिता. पण आतां कांहीं बसण्याचं कारण नाहीं तिथं. आपण पडा वाटल्यास थोडेंसें, सरकार !—"

"होय. तेंच मनांत आहे आमच्यासुद्धां—"

"पण चारू, आतां किती वेळ निजूं शकूं आपण— ?"

पूर्व क्षितिजावर तळमळत असलेल्या शुक्राच्या तान्याकडे पाहून जयानें विचारलें.

"स्वत: आय्. जी. येऊन आपल्याला उठवीपर्यंत !—"

त्याच्या त्या उत्तरामुळें त्या चमत्कारिक परिस्थितींत सुद्धां जयाला हंसूं आल्याशिवाय राहिलें नाहीं.

त्या म्हाताऱ्यानें झोंपडींतिल एका खोलींत त्यांच्यासाठीं अंथरूण तयार करून दिलें; व प्रवास आणि मन:स्ताप यांनीं बेसुमार थकलेलीं आपलीं शरीरें त्यांनीं लगेच त्या अंथरुणावर टाकलीं.

त्या गाढ झोंपेंतून सकाळीं नबाच्या सुमारास त्या शेतकऱ्यानें त्यांना उठविलें.

आणि सांगितलें कीं, बाहेर बडे साहेब आले असून ते तुम्हाला बोलावीत आहेत—

त्याबरोबर ते दोघेही बाहेर आले.

खांद्याला बँडेज बांधलेले साहेबबहादूर मोटारींत बसलेले होते; व झोंपडी भोवतीं पोलिसांनीं गराडा घातलेला होता.

काल जंगलांत विसरलेला तो रिव्हॉल्वर साहेबांच्या उजव्या हातांत होता.

त्यांच्या समोर आल्याबराबर जयानें सलाम करून म्हटलें, " गुड मॉर्निंग, सर !–"

त्याला पहातांच साहेब थक्क झाले; व आश्चर्यानें त्यांच्या तोंडून उद्गार निघाला—

" कोण जयसिंग ? तूंच गोळी झाडलीस माझ्या काल रात्रीं ?—"

" होय. मीच तो ! मीच गोळी झाडली आपल्यावर रात्रीं !–त्या वेळीं मी दाढी लावलेली होती म्हणून ओळखलं नाहीं आपण मला !–"

त्याचे ते शब्द ऐकतांच साहेब एकदम गाडींतून खालीं उतरले—

आणि जयाच्या अगदीं जवळ त्याच्या खांद्यांवर हात ठेवून म्हणाले–

" अविचारी पोरा ! मी काय अपराध केला होता तुझा तूं माझ्याशीं अशा रीतीनें वागायला ?–"

" आपण कांहींच अपराध केला नाहीं, सर जेम्स !–"

" मग तूं कां गोळी झाडलीस माझ्यावर ? बोल ! माझ्या स्नेह्याचा, माझ्या हाताखालच्या आवडत्या इमानी अधिकाऱ्याचा मुलगा तूं !–तुझ्या वृद्ध पित्याला काय वाटेल हा प्रकार कळल्यावर ! असा अविचार करण्याची बुद्धि तुला कशानं झाली ?–"

साहेबबहादुरांच्या त्या जिव्हाळ्याच्या शब्दांनीं जयाच्या हृदयाचें अगदीं पाणी पाणी होऊन गेलें. तो कांहींच बोलला नाहीं.

तेव्हां इतका वेळ निमूटपणानें त्यांचें संभाषण ऐकत असलेला चारू पुढें होऊन म्हणाला, " सर जेम्स, आम्ही आपल्यावर गोळ्या झाडल्या त्या आपण आमचा कांहीं गुन्हा केला म्हणून नव्हे; तर ज्या जुलमी सत्तेचे आपण एक घटक आहांत तिचा उच्छेद करण्याच्या हेतूनें !– "

त्याचें तें उत्तर ऐकून साहेब मनापासून हंसले; व आपले निळसर भेदक डोळे त्याच्यावर रोंखून म्हणाले–

" एका माणसावर गोळी झाडून कुठं उच्छेद होत असतो का बलाढ्य सत्तेचा ? तूं कोण ? तुझ्या चेहऱ्यावरून तूं बंगाली दिसतोस ?–"

" होय. आपला अंदाज बरोबर आहे, सर ! हा बंगाली आहे आणि माझा मित्र आहे–"

" आणि तो तिसरा तरुण कुठं आहे तुमच्या बरोबरचा ? ज्याच्यावर मी गोळी झाडली तो !–"

" त्याला पहायचं असेल, तर आपल्याला थोडं चालावं लागेल ! तो येऊं शकत नाहीं इथं ! "

" कुठं आहे तो ? त्याचा नेम थोडक्यांत चुकला माझ्या सुदैवानं ! " चालतां चालतां साहेब जयाला म्हणाले.

त्यानें साहेबांना त्यांच्या परिवारासह झोंपडीच्या मागच्या बाजूला असलेल्या शेतांत नेलें; व दूर अंतरावर अद्याप धगधगत असलेली ती चिता त्यांना दाखवून तो उद्गारला–

" तो पहा आपल्या गोळीला बळी पडलेला माझा मित्र ! "

# २३

# पितृऋणाची फेड

तामियाच्या जंगलांत घडलेल्या त्या प्रकाराची बातमी तीन दिवसांनीं नागपूरच्या वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाली; व झाली तीहि अगदीं त्रोटक आणि विपर्यस्त स्वरूपांत.

पहांटे आलेल्या 'महाराष्ट्रा'च्या पुरवणींत दिलेली त्रोटक बातमी कांतानें पाहिली, तेव्हां तिच्या लक्षांत त्या प्रकाराचें महत्त्व आलें नाहीं. पण आठाच्या सुमारास तिला "सागर व्हिलां"त नेण्यासाठीं म्हणून जेव्हां प्रियंवदा आली, तेव्हां तिनें आपल्या बरोबर पेन्सिलीनें खुणा करून आणलेला "हितवाद" तिच्या पुढें ठेवला.

"हितवाद"च्या पहिल्याच पानावर पांच कॉलमांचा मोठा थोरला मथळा देऊन ठळक टाइपांत पुढील बातमी दिली होती—

*आय्. जी. चा खून करण्याचा विफल प्रयत्न !*

*तामियाच्या डाक बंगल्याजवळ गोळीबार ! !*

*तीन बंगाली युवकांचें रोमांचकारी धाडस ! ! !*

पचमढी, मे ता. ४——मध्यप्रांत——वऱ्हाडच्या पोलीस खात्याचे आय्. जी. सर जेम्स स्ट्रँगमन हे ता. २ रोजीं रात्रीं तामियाच्या डाक बंगल्यावर मुक्कामाला जात असतां ८ च्या सुमारास तीन बंगाली तरुणां-

नीं त्यांच्या मोटारीवर गोळीबार केला. त्या गोळीबारानें मोटारीच्या पुढील बाजूची कांच फुटून सर जेम्स यांच्या ड्रायव्हरला जबर जखमा झाल्या. स्वत: सर जेम्स हे मात्र सुदैवानें बचावले. त्यांच्या फक्त खांद्याला निसटती गोळी लागून जखम झाली आहे.

मोटारीवर गोळीबार होतांच सर जेम्स यांनी तात्काळ गाडी थांबवून गोळीबार करणारांवर उलट हल्ला केला. या झटापटींत ते तिघेहि बंगाली तरुण जखमी झाले. त्यांपैकीं एक फरारी झाला. बाकीच्या दोघांना पकडून पचमढीला नेण्यांत आलें आहे.

या हल्ल्यांतील सर्वांत महत्त्वाची रहस्यमय गोष्ट म्हणजे सर जेम्स यांना सांपडलेला रिव्हॉल्वर. त्या रिव्हॉल्वरच्या अनुषंगानें पोलिस या अत्याचाराचा छडा कसोशीनें लावीत असून, चितागांग येथें नुकत्याच झालेल्या सरकारी शस्त्रागारावरील हल्ल्याचा हा लहानसा प्रतिध्वनि असावा, असा अंदाज या बाबतींत व्यक्त करण्यांत येत आहे.

त्यामुळें कदाचित् पकडलेल्या या दोघां तरुणांना कलकत्त्याला नेण्यांत येईल.

सर जेम्स यांची प्रकृति झपाट्यानें सुधारत आहे. त्यांच्या ड्रायव्हरची स्थिति मात्र कठीण दिसते.

कांतानें तें वर्णन वाचलें आणि उमाच्या बंगाली दोस्ताची मूर्ति तिच्य डोळ्यांपुढें उभी राहिली.

पण, लगेच तिच्या मनांत आलें, जयाचा या प्रकरणाशीं कांहीं संबंध दिसत नाहीं. आणि उमाचा तर नाहींच नाहीं. कारण तो गेल्या सबंध आठवड्यांत नागपूर सोडून कुठेंहि गेलेला नव्हता.

तथापि, उमाला ती बातमी दाखवावी आणि त्या बाबतींत त्याला कांहीं माहिती असल्यास बघावें, असेंहि तिला वाटलें.

म्हणून तिनें चपराश्याला हांक मारून उमाला खालीं बोलवायला सांगितलें.

त्यावर तो म्हणाला, " छोटा साब जिमखानेसे अभीतक आया नहीं–"

तिला आठवण झाली, उमा नेहमींप्रमाणें जिमखान्यावर टेनिस खेळावयाला गेला आहे आणि तिच्या मनाला बरें वाटलें.

" किती विलक्षण बातमी आहे ही, कांता ! आपल्या प्रांतांत, मला वाटतं, कितीतरी वर्षांत घडलेला नाहीं असा अत्याचार ! दद्दा नेहमीं म्हणायचे, मी गृहमंत्री असतांना कोणत्याहि युरोपियनाच्या केंसाला धक्का नाहीं लागायचा कधीं–"

" पण नागपूरशीं संबंध दिसत नाहीं या प्रकाराचा—"

पंडितनें टेबलावर आणून ठेवलेल्या ट्रेमधील सामान घेऊन चहा तयार करीत असलेल्या कांतानें म्हटलें.

" हो. ' हितवाद 'वरून तरी दिसतं खरं तसं ! तूं दुसरी एक बातमी वाचलीस का ' हितवादां 'तली ?—"

प्रियंवदेनें ' हितवादा 'चें शेवटचें पान कांतापुढें करून म्हटलें.

त्या पानावर 'सोशल अँड पर्सनल' या मथळ्याखालीं पुढील बातमी दिली होती–

" ॲडव्होकेट–जनरल बॅ. गुप्ता आणि मध्यप्रांतीय कौन्सिलचे मजूर सभासद बॅ. ठाकूर यांचा मुक्काम सध्यां पचमढीला असून, काल त्या दोघांनीं गृहमंत्र्याची बराच वेळ मुलाखत घेतली."

ती बातमी वाचतांच कांताची मुद्रा एकदम गंभीर झाली.

चहाचा घोट घेण्याच्या मिषानें तिनें आवंढा गिळून म्हटलें, " उद्यां निकाल आहे भाऊजींच्या तक्रारअर्जाचा—"

" हो. माझ्यासुद्धां तेंच मनांत आलं ती बातमी वाचल्याबरोबर ! प्रत्येक पिढीगणिक राजकारणाचं स्वरूप बदलत असतं, असं दद्दा म्हणत असत नेहमीं ! प्रिया आणि राधा या दोघांनींहि तें आपआपल्या परीनं खरं करून दाखवलं !–"

कांता खालीं मान घालून मुकाट्यानें चहा पीत होती.

" अगबाई, तुझ्या पायांवर आज सूज दिसते आहे, कांता ! " प्रियंवदेचें लक्ष एकदम तिच्या पायांकडे जाऊन तिनें म्हटलें. " काल तूं गेली होतीस ना दुपारीं मार्टिनकडे नेहमींप्रमाणं ?—"

" हो. गेल्या दोन तीन दिवसांपासूनच आहे ती. आज थोडी जास्त आहे एवढंच—"

" मग काय म्हणाली ती ? तिनं पाहिलीन् का सूज ?—"

" मध्यें जी दगदग झाली तिचा परिणाम आहे हा, असं म्हणाली ती ! मी अगदीं हालचाल करतां कामा नये असं सांगणं आहे तिचं—"

" मग आज येऊं नकोस तूं माझ्याबरोबर वाटल्यास—"

" कां बरं ? मोटारींतून फिरायला कांहीं हरकत दिसत नाहीं मला. उद्यां निकाल आहे. बाईंना काय वाटेल मी गेलें नाहीं तर ? काकासाहेब इथं असते तर फार बरं झालं असतं या वेळीं—"

" त्यांची काल पुन्हां तार आली, असं सांगत होती बिजू मला. ते बहुधा संध्याकाळीं येतील न् हजरहि राहतील उद्यां कोर्टांत. मग चलतेस तूं माझ्याबरोबर ?—"

चपराशानें आणलेल्या कांचपात्रांत त्या दोघींनीं आपले हात धुतले आणि त्या जावयाला निघाल्या.

तोंच विजया धांवत धांवत समोरून येत असलेली त्यांना दिसली.

आणि तिनें व्हरांड्यांत आल्याबरोबर एकदम कांताला मिठी मारून म्हटलें, " ताई, तूं अशीच्या अशीच घरीं चल आधीं ! आमच्या घराची झडती घेताहेत पोलिस आणि उमाला अटक केली आहे त्यांनीं !—"

" उमाला अटक ! उमाला अटक ! "

कांतानें खुर्चीचा आधार घेत जोरानें म्हटलें.

" हो, ताई. मा सारखी रडते आहे ! जया परवांपासून मोटार घेऊन कुठं गेला आहे, त्याचा पत्ता नाहीं !—"

कांता अगदीं स्तब्ध होती. आपल्याला भोंवळ येईल कीं काय असें तिला क्षणोक्षणीं वाटत होतें.

" आतां आपण वाचलेल्या बातमीचा संबंध दिसतोय या झडतीशीं—" प्रियंवदा अगदीं खिन्न आवाजांत म्हणाली.

" हो. मलाहि तसं वाटतं !—"

कांतानें भानावर येऊन अगदीं शांतपणानें उत्तर दिलें.

" माई, चला ना लवकर ! तुम्ही दोघी आलांत म्हणजे तितकाच धीर वाटेल माला—"

" चल बाई ! काय एक एक नशिबीं भोग आहेत कुणाला ठाऊक !—" प्रियंवदेनें म्हटलें.

आणि बिजूला घेऊन त्या मोटारींत बसल्या.

गाडी ' शिवनिवासा 'पाशीं आली, तेव्हां लोकांची तिथें इतकी गर्दी होती कीं, तिच्यांतून वाट काढतांना ड्रायव्हरची मुष्कील झाली. ए. डी. एस्. पी. च्या बंगल्याची झडती होण्याचा प्रसंग हा इतका कांहीं अपूर्व आणि अद्भुत होता कीं, अर्धी अधिक धंतोली तो प्रकार पहावयाला तिथें लोटली होती.

त्यांच्या मोटारी पाठोपाठच दुसरी मोटार आली.

कांतानें कर्ण्याचा आवाज होतांच मागें पाहिलें.

अभ्यंकर आणि खरे त्या मोटारींत होते.

दोन्ही गाड्या आंत येतांच सिटी सुपरिंटेंडेन्ट पुढें आले; व त्यांनीं आलेल्या मंडळीला अशी विनंती केली कीं, झडतीच्या कामाला अडथळा येईल अशा प्रकारचें वर्तन कोणीहि करूं नये.

" पण झडती कशाबद्दल घेतली जात आहे तें तर सांगाल कीं नाहीं ?—" अभ्यंकरांनीं आपली सिगारेट केस पुढें करून त्यांना विचारलें.

" नुसती झडतीच नाहीं चाललेली. त्यांनीं अटकहि केली आहे उमाला !—"

प्रियंवदेनें त्यांना मध्येंच सांगितलें.

" आम्ही कांहीं अडथळा करीत नाहीं तुम्हांला ! पण झडती आणि अटक कशाबद्दल आहे हें तर कळूं द्या आम्हांला—"

त्यांनीं तोंडांत धरलेली सिगारेट पेटवून देत असतांना अभ्यंकरांनीं म्हटलें.

सिटीसाहेबांनीं सिगारेटचा एक झुरका घेतला; व किंचित् हंसून नम्रतेनें पण निश्चयी आवाजांत म्हटलें—

“ माफ करा मला ! वॉरंट दाखविणं जरूर होतं त्यांना दाखविलीं आहेत तीं मी ! आपल्याला तीं दाखविण्याचं कांहीं कारण दिसत नाहीं मला !—”

तें संभाषण चालू असतांना कांता आंत गेली. जयाची आई झोपाळ्यावर बसली होती. कांताला पहातांच तिला एकदम रडूं कोसळलें आणि ती म्हणाली—

“ काय विचित्र प्रसंग आणला हा दैवानं, ताई ! ते घरीं नाहींत न् जया कुठं जाऊन बसला आहे याचाहि पत्ता नाहीं—”

“ काकू, तुम्ही भिऊं नका मुळींच ! मला तरी हें सगळं किटाळ संशयानें आलेलं दिसतंय ! जया कांहीं सांगून गेला होता का जातांना तुम्हांला ?—”

“ तो कधीं सांगून जातोय कुठं ? मी म्हटलं, पारडशिंग्याला गेला असेल नेहमींप्रमाणें ! पण काल संध्याकाळीं दिवाणजी आले, तेव्हां उलगडा झाला तो तिथं गेला नसल्याचा ! उमा वर त्याच्याच खोलींत आहे न् पोलीस बसले आहेत दाराशीं पहारा करीत ! तूं नीट चौकशी तर कर एकदां ही सारी गडबड कशाबद्दल चालली आहे याची !—”

“ थांबा, मी वर जाऊन येऊन सांगतें तुम्हांला—”

जयाच्या आईला जरी तिनें ती गडबड संशयानें चालली असल्याचें उत्तर दिलें, तरी तिची स्वतःची मात्र आतां मनांतून पक्की खात्री झाली होती कीं, तामियाच्या अत्याचाराशीं या झडतीचा संबंध असला पाहिजे; व म्हणूनच उमाला भेटून ती त्याच्याकडून माहिती काढून घ्यावयाला उत्सुक झाली होती.

ती वर गेली, त्या वेळीं जयाच्या खोलींत उमा आणि बिजू हीं दोघेंहि बसलेलीं तिला आढळलीं. खोलीची झडती होऊन गेलेली असल्यामुळें सारें सामान अस्ताव्यस्त पडलेलें होतें.

उमाचा चेहरा अगदीं उतरून गेला होता. कांताला बघितल्याबरोबर तो अगदीं वरमून गेला, व तिची दृष्टि टाळण्यासाठीं खिडकीजवळ जाऊन पाठमोरा उभा राहिला.

ती अगदीं त्याच्याजवळ गेली आणि त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाली—

" उमा, अरे मी भेटायला आलें आहे तुला !—"

उमाचे डोळे भरून आले.

कांतानें त्याचे डोळे पुसले, व बाहेर बसलेल्या शिपायांना आपलें बोलणें कळूं नये, म्हणून तिनें त्याला इंग्रजींत विचारलें—

" उमा, तुला अटक कशाबद्दल झाली हें कळलं पाहिजे मला—"

" वारंटांत माझ्यावर खुनाच्या कटांत सामील असल्याचा आरोप केलेला आहे !—"

" खरा आहे तो आरोप ?—"

तिचे ते तेजस्वी, कठोर डोळे आपल्या अंतःकरणाचा ठाव घेत आहेत, असें त्याला वाटलें.

" नाहीं. मला जया कुठं गेला, कशासाठीं गेला न् त्यानं काय केलं याची या घटकेपर्यंत कांहींसुद्धां कल्पना नाहीं आहे ! —माझ्या हातून फक्त एकच गोष्ट घडली आहे—"

" ती कोणती ?—"

" विजू सांगेल तुला ती !—"

विजूनें तिला रिव्हॉल्वरचा सारा इतिहास रडत रडत सांगितला.

" याच्यापेक्षां तुझ्या हातून कांहींहि अधिक घडलेलं नाहीं ना ? खरं सांग मला उमा आतां तरी !—"

" नाहीं. ताई, खरं सांगतों तुला. आतां तुझ्यापासून लपवून ठेवण्यांत तरी काय अर्थ आहे ?—"

त्यांचें हें बोलणें चाललें आहे, तोंच प्रियंवदा सिटीसाहेबांसह तिथें आली.

" गेले मोरूभाऊ न् डॉक्टरसाहेब ?—"

" हो ! उगाच थांबून काय करतील ? हे उमाला न्यायाला आले आहेत."

" झडती संपली ?—"

" हो—"

" कांहीं सांपडलं का पण तिच्यांत ?–"

तिनें प्रियंवदेकडे पहात पण सिटीसाहेबांनीं उत्तर द्यावें अशा अपेक्षेनें म्हटलें.

" प्रियंवदाबाई, आतां तुम्हांला सांगायला हरकत नाहीं इथं ! यादवराव-साहेबांच्या सुदैवानं कांहीं सांपडलं नाहीं झडतींत–"

" पण या झडतीचं कारण आतां इथं तरी सांगाल का आम्हांला ?–"

" तामियाच्या अत्याचाराशीं संबंध आहे या झडतीचा. जया आणि त्याचा एक बंगाली मित्र असे दोघे अटकेंत आहेत सध्यां पंचमढीला–"

" आणि तो तिसरा फरारी इसम कोण ?–"

कांतानें मध्येंच विचारलें.

" ती ' हितवादां 'तली बातमी बरोबर नाहीं. तिसरी व्यक्ति फरारी नाहीं झाली; मारली गेली ! ती एक स्त्री होती –"

" सुटली बिचारी !–"

कांतानें म्हटलें.

तिला एकदम श्यामासुंदरीची आठवण झाली, तिनें उमाकडे पाहिलें. तो खिडकींतून बाहेर पहात होता.

" काकासाहेबांना काय वाटेल मुंबईहून परत आल्यावर ?–"

तिनें अत्यंत खेदानें म्हटलें.

" त्यांना माहित आहे सगळं कांहीं ! जयाच्या सर्व हालचालींचं त्यांनीं स्वतः ठेवलेलं टिपण सी. आय. डी. जवळ आहे ! त्यांची संमति आगाऊ घेऊन मगच झडतीचं वॉरंट काढण्यांत आलं !–मग जाऊं आम्ही आतां ? आपल्याला कांहीं बोलायचं नाहीं ना यांच्याशीं ?–"

" फार उपकार झाले आपले–"

कांता म्हणाली.

" छे, छे ! उपकार कसले आले आहेत यांत ? किती झालं तरी यादवराव साहेबांच्या घरांत आम्ही आहोंत हें विसरूं शकत नाहीं आम्ही ! त्यांच्यासारख्या इमानी न् कर्तबगार अधिकाऱ्यावर या वयांत असा प्रसंग यावा

हें दुर्दैव आहे खरोखरी !–"

सिटीसाहेबांनीं त्यांचा निरोप घेतला, व उमाला बरोबर घेऊन ते खालीं गेले.

" उमानं कांहीं सांगितलं का तुला, कांता ?–"

" हो. त्याचा कांहीं प्रत्यक्ष संबध नाहीं तामियाच्या अत्याचाराशीं. चांगला बचाव दिला, तर तो सुटेल खात्रीनं–"

" मग आपण मोरूभाऊंकडे जाऊं या–"

" तें खरं. पण खालीं गेल्यावर काकूंना काय सांगायचं ?–"

कांताच्या डोळ्यांत आतां अश्रू उभे राहिले.

" तोच प्रश्न माझ्याहि पुढें आहे ! यादवराव जर या वेळीं इथं असते, तर फार बरं झालं असतं, कांता–"

" कदाचित् ते संध्याकाळींच येतील. पण जयाला खरोखरी कशाबद्दल अटक झाली आहे हें कळतां कामा नये काकूंना ! नाहीं तर त्या घाबरून जातील अगदीं ! विजू, तूं बोलूं नकोस खालीं कांहीं आतां ऐकलंस त्यांतलं ! मी सांगतें त्यांना काय सुचेल तें–"

त्या तिघी खालीं आल्या. जयाची आई त्यांची वाटच पहात होती. तिनें लगेच त्यांना झडतीबद्दल प्रश्न विचारला.

तेव्हां कांता म्हणाली, " काकू, सरकारी रिव्हॉल्वर्सची चोरी झाली कांहीं दिवसांपूर्वी, त्याबद्दल झडती घेण्यांत आली आहे ही. काकासाहेबांना मुद्दाम तार पाठवून त्यांची परवानगी घेण्यांत आली होती झडती घेण्यापूर्वी !– "

" अग पण आमच्याच घराची झडती काय म्हणून, ताई ? आमच्या घरांत का चोरलेले रिव्हॉल्वर लपवून ठेवले होते कोणी ?–"

" हो. त्याच संशयानं तर उमाला पकडण्यांत आलंय !– "

" मग जयाला सुद्धां पकडलं असेल ?–"

" सिटीसाहेब सांगत होते, आतां पंचमढीला त्यालासुद्धां अटक करण्यांत आली आहे म्हणून ! पण, काकासाहेब आले आज संध्याकाळीं म्हणजे सगळें कांहीं कळेल तुम्हाला, काकू !–"

" ते कांहीं तरी कधीं सांगतात का मला ? बापलेकांचा अगदीं एक प्रकार आहे ! त्यांच्या खिजगणतींत नाहीं मी ! बरं बाई, काय नशिबीं असेल तें भोगलं पाहिजे मुकाट्यानं ! पण तुम्ही कुठं निघालांत आतां ?—"

" आम्ही मोरूभाऊंकडे चाललों आहोंत. उद्यां वकील देण्याची व्यवस्था करायला— "

बॅ. अभ्यंकर यांच्याकडे त्या दोघीजणी गेल्या. पण बॅरिस्टरसाहेबांनीं त्यांना स्पष्टच सांगितलें कीं, खालच्या कोर्टीत कांहीं बचावाचा फारसा उपयोग होणार नाहीं, तथापि त्यांनीं जरूर ती सर्व व्यवस्था करण्याचें आश्वासन दिलें.

त्यांच्या त्या स्पष्टोक्तीमुळें कांताचा धीर खचल्यासारखा झाला. घरीं परत आल्यावर ती जेवावयाला बसली. पण तिला घांस गिळेना.

तिची ती अवस्था पाहून प्रियंवदेनें तिला म्हटलें, " तूं उगाच मनाला लावून घेऊं नकोस, कांता ! जर उद्यां मॅजिस्ट्रेटनें उमाला जामिनावर सोडलं नाहीं, तर मी लगेच पचमढीला जाऊन व्यवस्था करीन त्याच्या सुटकेची ! पण तूं आपल्या प्रकृतीची हेळसांड करतां कामा नयेस अशा रीतीनं——"

ती कांहीं बोलली नाहीं. पात्रांत जेवढें पहिल्यांदाच वाढलें होतें, तेवढें कसेंबसें संपवून ती उठली.

संध्याकाळीं त्या दोघी यादवरावांकडे गेल्या असतां विजूनें मुंबईहून नुकतीच आलेली तार त्यांना दाखविली. त्या तारेंत यादवरावांनीं असें लिहिलेलें होतें कीं, " भिण्याचें कांहीं कारण नाहीं मी उद्यां एक्सप्रेसनें येत आहे. "

ती तार वाचून कांताच्या मनांत अशी शंका येऊन गेली कीं, यादवराव नागपूरला येण्याचें बुद्धिपुरःसर तर टाळीत नसतील ना ? दुसऱ्या कोणासाठीं नव्हे, पण निदान आपल्या पत्नीसाठीं तरी त्यांनीं नागपुरास यावयाला नको होतें का ? स्त्रीच्या भावनांची कांहींच का पर्वा वाटत नाहीं पुरुषांना आपल्या प्रतिष्ठेपुढें ?

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठ वाजतां जेव्हां प्रियंवदा नेहमींप्रमाणें ' ठाकूरभवना ' मध्यें आली, तेव्हां कांताच्या पायांवरील सूज वाढल्याचें आणि डोळ्यांच्या खालचा भाग टापरून आल्याचें तिला दिसलें.

पण त्या तशा स्थितींतच उमासाठीं तुरुंगांत पाठवावयाच्या जेवणाची तयारी ती स्टोजवळ बसून करीत होती.

प्रियंवदेला बघितल्याबरोबर ती म्हणाली, " मग आपण मोरूभाऊंकडे जाऊन तिथून निघायचं कीं परस्पर जायचं कोर्टांत ?–"

" मला वाटतं कीं तूं आज कोर्टांत येऊं नयेस, कांता ! तूं कशाला बसलीस स्टोपाशीं ? पंडितनं केलं नसतं का उमाचं जेवण तयार ? तूं आज मुळींच येऊं नकोस कोर्टांत –"

" न येऊन कसं चालेल, माई ?–"

" न चालायला काय झालं ? उमाला माहित आहे तुझी प्रकृति किती खराब झाली आहे हें ! माझं ऐक, तूं आजच्या दिवस–"

प्रियंवदा इतक्या कळकळीनें बोलत होती कीं, कांताला तिला नाराज करण्याचा हिय्या झाला नाहीं.

शिवाय आज सकाळीं उठल्यापासून तिला इतका कांहीं थकवा वाटत होता कीं कोर्टांत कदाचित् आपल्याला भोंवळ येईल अशी भीति मनांत उत्पन्न झाल्यामुळेंच, तिनें आपला जाण्याचा बेत अखेर रहित केला.

प्रियंवदा अकराच्या सुमाराला कोर्टांत गेली, ती दुपारीं तीन वाजेपर्यंत परत आली नाहीं.

कांताला जेवण गेलें नाहीं आणि नंतर झोपहि आली नाहीं.

शेवटीं दोनच्या सुमाराला ती कंटाळून व्हरांड्यांत ठेवलेल्या वेताच्या आरामखुर्चीवर येऊन बसली.

तिला क्षणोक्षणीं वाटे, आपण कोर्टांत काय झालें आहे हें एकदां समक्ष जाऊन पहावें.

पण तिच्या त्या उत्कंठेबरोबर थकवाहि सारखा वाढत होता.

आणि त्याहिपेक्षां खरी नडणारी अडचण म्हणजे मोटार त्या वेळीं मिळण्यासारखी नव्हती.

त्यामुळेंच खरोखरी कोर्टांत जाण्याच्या बाबतींत तिचा निरुपाय झाला.

अखेर तीनच्या सुमारास प्रियंवदा परत आली.

कांतानें पाहिलें, तिच्या मोटारींत मालिनी आणि उर्मिला याहि होत्या.

त्या पायऱ्या चढून वर येण्यापूर्वींच कांतानें पुढें येऊन विचारलें, " काय झालं, माई ?–"

" मोरूभाऊंचा अंदाज खरा ठरला ! मॅजिस्ट्रेटनें उमाला जामिनावर सोडण्याचें नाकारलें–"

प्रियंवदेचे ते शब्द कानांवर पडतांच आपल्या भोंवतालचें जग गरगरा फिरतें आहे, असें कांताला वाटलें.

पण तिनें मन घट्ट केलें आणि ती कशीबशी पुन्हा खुर्चीवर येऊन बसली.

त्या मनःक्षोभाच्या भरांत राधामोहनच्या तक्रारअर्जाचा निकाल काय लागला, याची चौकशी करण्याचेंहि भान तिला राहिलें नाहीं.

पण ऊर्मीनें तिच्या खांद्यावर हात ठेवून म्हटलें, "ताई ग, आम्हीं इथंच राह्यला आलों आहोंत आजपासून !–"

तरीहि कांताच्या लक्षांत आलें नाहीं. तिनें फक्त शून्य दृष्टीनें ऊर्मिले-कडे पाहिलें.

तेव्हां मालिनी म्हणाली, " त्यांचा अर्ज मंजूर होऊन त्यांना कबजा मिळाला ' सागर व्हिला ' चा—"

" आणि हिमा मला कोर्टांत सांगत होती, उद्यां ना. नायडू नागपूरला यायचे असून, त्यांना घरीं पार्टी देण्याचा विचार आहे राघाचा !–"

प्रियंवदेनें मालिनीचें वाक्य पूर्ण केलें.

ती बातमी ऐकून कांता पूर्णपणें भानावर आली.

आणि ऊर्मीला जवळ घेऊन तिनें अगदीं शांतपणानें म्हटलें–

" भाऊजींनीं पितृऋण फार चांगल्या रीतीनं फेडलं, माई ! "

# २४

## दीपनिर्वाण

तिनें अतिशयच आग्रह धरल्यामुळें तिची खाट आज तिच्या त्या आवडत्या अशोकाखालीं आणून ठेवली होती.

शस्त्रक्रियेला आजचा चवथा दिवस होता. पहिल्या दिवशीं जरी तिला मनस्ताप फार झाला, तरी मृत गर्भ पोटांतून निघाल्यावर तिला पुष्कळच हुषारी वाटली.

पण ती हुशारी तिच्या खचत चाललेल्या मनाला सांवरून धरावयाला पुरी पडली नाहीं.

क्लोरोफॉर्मची गुंगी उतरून शुद्धीवर आल्याबरोबर आपल्या शेजारीं बसलेल्या प्रियंवदेला तिनें पहिला प्रश्न हा विचारला—

" माई, मुलगा होता ना ?—"

" होय, कांता ! पण आतां विचार करूं नकोस तूं त्याबद्दल ! आपल्या नशिबीं नव्हतं त्याला काय करणार ?—"

तिचें सांत्वन करण्यासाठीं म्हणून प्रियंवदेनें तें वाक्य उच्चारलें. पण स्वतःच्या डोळ्यांत आलेले अश्रु मात्र तिला आवरेनात.

कांताच्या डोळ्यांत मात्र एकहि अश्रु आला नाहीं. जणुं कांहीं तिच्या अंतःकरणांत जी भयंकर आग पेटली होती, त्या आगीमुळें तिच्या डोळ्यांतील साऱ्या सरिता आटून गेल्या होत्या.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं प्रियंवदेनें तिला विचारलें, " ना. नायडू आज

पुन्हां इथं यायचे आहेत. मी त्यांना भेटून प्रियाला न् उमाला घरीं आणण्याची खटपट करूं का ? त्या दोघांना पाहिल्यावर बरं वाटेल तुझ्या मनाला थोडं तरी !—"

" नको, नको, माई ! दद्दांच्या आत्म्याला दुःख होईल असं कांहींसुद्धां घडतां कामा नये माझ्या हातून ! पचमढीला जो प्रकार झाला, तो झाला. आतां पुन्हा कुणाकडे जाऊन पदर पसरावयाचा नाहीं आपल्याला—"

त्यानंतर एकदांहि तिनें पति किंवा बंधु यांची आठवण काढली नाहीं.

तिसऱ्या दिवशीं तिचें शरीर किंचित् काळवंडल्यासारखें दिसूं लागलें; व डॉ. खऱ्यांनीं जरी घाबरण्याचें कारण नाहीं असें म्हणून तिला थट्टा करीत करीत इंजेक्शन दिलें, तरी भोंवतालच्या मंडळीचा मात्र धीर सुटत चालला.

त्या दिवशीं दुपारीं तिनें प्रियंवदेला म्हटलें, " माई, पंडितजींना तार करा—"

त्या रात्रीं तिच्या अंगाची फार तलखली झाली.

आणि तिनें सारखा ध्यास घेतला कीं, मला अशोकाच्या झाडाखालीं चौथऱ्यावर नेऊन निजवा.

पण डॉ. खऱ्यांनीं प्रथम ती गोष्ट कबूल केली नाहीं.

सकाळीं मेलनें पंडितजी आले, व आल्याबरोबर तिला भेटून त्यांनीं तडक डॉक्टरसाहेबांची गांठ घेतली.

तेथून ते जे परत आले, ते मग हलले नाहींत तिच्याजवळून.

तिच्या अंगाची तलखली एकसारखी वाढत होती. उर्मिला, मालिनी आणि प्रियंवदा तिच्या जवळ बसून निरनिराळ्या प्रकारचे शीतोपचार तिला करीत होत्या. पण व्यर्थ.

संध्याकाळीं डॉ. खरे आल्याबरोबर तिनें त्यांना म्हटलें, " मला आतां तरी अशोकाखालीं न्यायला परवानगी द्या !—"

डॉक्टरसाहेब त्यावर कांहीं बोलले नाहींत

त्यांनीं आपल्या समक्षच तिची खाट अशोकाखालीं अलगत नेऊन ठेवविली.

काळोख जसजसा पडत गेला, तसतसें तिचें बोलणें वाढत गेलें. उर्मीशीं मालिनीशीं, प्रियंवदेशीं आणि पंडितजींशीं ती सारखी मधून मधून कांहीं कांहीं बोलत होती.

पण पतीच्या किंवा बंधूंच्या नांवाचा उच्चार मात्र तिनें एकदांही केला नाहीं.

उर्मीनें तिला आवडणाऱ्या रातराणीच्या फुलांचे तुरे तिच्या उशा-पायथ्याला आणून ठेवले.

तिनें आपला दिलरुबा मागून घेतला. त्याची गवसणी काढून उर्मीनें तिच्या उजव्या हाताजवळ आणून ठेवला.

बैठ्या विद्युद्दीपाचा निळसर सौम्य प्रकाश तिच्या अंगावर पडला होता.

पश्चिमेच्या क्षितिजावर तृतीयेची चंद्रकोर मावळण्याच्या बेतांत होती.

आणि वाऱ्याच्या मंदोष्ण झुळका हळुवारपणानें अंगाला येऊन भिडत होत्या.

" मला फार बरं वाटतंय आतां !—"

तिनें पंडितजींकडे बघून म्हटलें.

" मला स्वत:साठीं वाईट वाटत नाहीं. पण त्यांच्या हट्टापायीं साऱ्या कुटुंबाची वाताहत झाली—"

" ताई, तूं दोष देऊं नकोस प्रियाला ! आपल्या एकाच कुटुंबाच्या नाशानं काय झालं आहे ? अश अनेक कुटुंबांची जेव्हां वाताहत होईल, तेव्हांच कदाचित् झाला तर या अभागी राष्ट्राचा उद्धार होईल. स्वातंत्र्याची किंमत फार जबर द्यावी लागत असते आणि ती आनंदानं देण्यांतच खरा देशाभिमान आहे !- "

त्यांचे ते भावगंभीर उद्गार तिनें शांतपणानें ऐकून घेतले.

आणि थोड्या वेळानें ती त्यांना म्हणाली—

" माझा जीव त्यांच्यासाठीं घुटमळतो. ते कीं नाहीं अगदीं सरळ आणि भावनावश आहेत. त्यांना सांभाळून घ्यां तुम्ही ! "

ते शब्द तिनें अगदीं सावकाश उच्चारले आणि दिलरुब्यावर ठेवलेला तिचा हात एकदम कलंडला.

त्याबरोबर प्रियंवदेनें खालीं वांकून हळूच तिचे डोळे मिटले.

आणि तिच्या उशाशीं असलेला तो विद्युद्दीपहि मालवला.

**प्रारंभ** **समाप्ति**

७ ऑगस्ट १९३७ १९ फेब्रुवारी १९३९

# देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें

**कुसुमाग्रज**

१ दुसरा पेशवा — २
२ समीधा — २

**एस्. एम्. जोशी**

१ उर्मि — ३

**महात्मा गांधी**

१ तेजस्वी तरुणी — ४

**अ. रा. कामत**

१ नवें शिक्षण — ६

**ना. धों. ताह्मनकर**

१ तात्या भा. १ला (आ.दुसरी) — ४
२ तात्या भा. २ रा — ३
३ निवाडे भा. १ ला — २॥
४ निवाडे भा. २ रा — ४
५ संतु — २
६ चकमकी — १॥
*७ बच्चा नवरा — १॥
८ अनेक आशीर्वाद — ३॥
९ दाजी भा. १ला (आ. ति.) — ३॥
१० वहीणभाऊ — ·।।।·

**वा. म. जोशी**

१ स्मृति–लहरी — २
२ विचार–लहरी — २।
३ विचार–विहार — ४

**चिं. वि. जोशी**

१ आणखी चिमणराव (आ.२री) — ४
२ वायफळाचा मळा (,,) — ५
३ नवें भारूड — २
४ स्टेशनमास्तर — २
५ नटश्रेष्ठ — ·।।।·
६ गुंड्याभाऊ — २।

**दत्तु बांदेकर**

१ सख्या हरि (आ. दुसरी) — २
२ नवी आघाडी — १॥
३ तूं आणि मी — २
४ नजरबंदी — २।

**प्र. के. अत्रे**

१ साखरपुडा (आ. दुसरी) — २
२ ललित वाङ्मय — ३॥
३ दूर्वा आणि फुलें — २।

**ना. म. पटवर्धन**

१ हितपत्रें — ३
२ वा. म. जोशीचरित्र — ४

**वृ. र. कवठेकर**

१ अपुरा डाव — ३
२ रेशमाच्या गांठी — ३
३ आभाळाची सांवली — ८

**भाई बेके**

१ रॉयचरित्र— — १॥

**अनंत काणेकर**

१ धुक्यांतून लाल ताऱ्याकडे (आ. दुसरी) — ३
२ पिकलीं पानें (आ. दुसरी) — १॥
३ उघड्या खिडक्या — १॥

**काकासाहेब कालेलकर**

१ ब्रह्मदेशाचा प्रवास — १॥
२ भक्ति-कुसुमें — ३
३ सामाजिक प्रश्न — ३

**य. वि. पेण्ढरकर**

१ प्रापंचिक पत्रें — ३
२ घायाळ — २

## देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें

**ना. ह. आपटे**

१ फसगत १॥

२ साजणी ५

**पु. य. देशपांडे**

१ नवें जग ?— २॥

**आनंदीबाई जयवंत**

१ पारंब्या २

**रा. वि. फडतरे**

१ मृगया ४

**लक्ष्मणराव सरदेसाई**

१ ढांसळलेले बुरूज ३

**प्रो. वि. कुळकर्णी**

१ व्यक्तिचित्रें २॥

**शकुंतलाबाई परांजपे**

१ भिल्लिणीचीं बोरें ३

**कृष्णाबाई मोटे**

१ मीनाक्षीचें जीवन २।

**र. गो. सरदेसाई**

१ चलतीं नाणीं २

**संपादक आचार्य भागवत**

१ वर्धा शिक्षण योजना ४।

**रा. श्री. जोग**

१ सौंदर्यशोध आणि आनंदबोध ८

**वि. वि. बोकील**

१ बेबीची बहीण ३

**सत्याग्रही**

१ ग्रह आणि तारे ४॥

**वि. म. भुस्कुटे**

१ स्टॅलिन ३॥

२ आई ( मॅक्सिम गॉर्की ) ७

**कमलाबाई टिळक**

१ आकाशगंगा २॥

**रामतनय**

१ साखरगोटी ५

**ह. रा. महाजनी**

१ आपलें आर्थिक नियोजन ५

**पं. क्षमा राव**

१ देणगी २॥

**गोपीनाथ तळवलकर**

१ मंगलधाम ३॥

**श्री. किनरे**

१ प्रकृतिदर्शन ५

**प्रो. हेरॉल्ड लास्की**

१ राज्यशास्त्र प्रवेश २

**बाबुराव गोखले**

१ बारा फोफावला २

**प्रो. एम्. एल्. दांतवाला**

१ आपली राहणी १॥।

**बापू गोखले**

१ निवड ३

**अरविंद गोखले**

१ उन्मेष २।

**रमातनय**

१ समाजजीवन ५

**बिवलकर**

१ नाना पाटील चरित्र १

२ सुनीता ६

**एस्. एन्. आग्रवाल**

१ विद्यार्थ्यांसाठीं विधायक कार्यक्रम २

**कुसुमावती देशपांडे**

१ मोळी २॥

**सौ. मालतीबाई दांडेकर**

१ वज्रलेख ४॥

